**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# मराठीच्या जपणुकीसाठी...

**भाषा ही** ध्वनिरूप असते, ती श्राव्य असते. उच्चार हा भाषेच्या अस्तित्वाचा पुरावा आहे, हे जरी खरे असले, तरी ध्वनी हे क्षणभंगुर असतात. आपण बोलत असताना ते हवेत विरून जातात. आपले विचार, कल्पना, भाव चिरकाल टिकावेत, समकालीनांनाच नव्हे, तर पुढच्या पिढ्यांनाही ते कळावेत, या जाणिवेतूनच लेखनाचा जन्म झाला. लेखन हे चिरकाल, स्थिर स्वरूपाचे असते. ते प्रदीर्घ काळापर्यंत उपलब्ध होऊ शकते.

मराठी भाषेच्या संदर्भात विचार करताना हे लक्षात घेतले पाहिजे, की मराठी भाषक मराठीची कोणती तरी बोली बोलत असतात. त्या बोलींमध्ये विविधता असते; मात्र त्या अशुद्ध असतात, असे म्हणणे अयोग्य आहे. पण 'आपण बोलतो तसेच लिहिणार' असा आग्रह धरणे चुकीचे आहे. (औपचारिक लेखन म्हणजे वैचारिक, वैज्ञानिक, शास्त्रीय लेखन, ललितेतर साहित्य, रस्त्यावरच्या पाट्या, वर्तमानपत्रे (बातम्या, संपादकीय इ.), मासिके, शासकीय पत्रव्यवहार इ.) या लेखनात प्रमाणभाषेचाच वापर करणे आवश्यक आहे. प्रमाणभाषा ही एक संकल्पनाच आहे. मराठी भाषा बोलणारे प्रमाणभाषा बोलत नाहीत, मात्र औपचारिक लेखनात प्रमाणभाषेचाच वापर करायला हवा. या प्रमाणभाषेच्या लेखनात एकवाक्यता यावी, म्हणून तज्ज्ञ समितीने सुचवलेले आणि शासनाने मान्य केलेले नियम सर्व मराठी लेखकांनी पाळणे आवश्यक आहे. लेखनातील ही स्थिरता अत्यंत आवश्यक आहे, याचे भान आपण ठेवणे महत्त्वाचे आहे. औपचारिक लेखनात कोणालाही मनमानी करता येणार नाही.

मराठी आपल्या महाराष्ट्रातील लोकांची मातृभाषा आहे. तिचे संरक्षण, संवर्धन करणे मराठी भाषकांचे- विशेषतः सुशिक्षितांचे, मराठी भाषेवर प्रेम करणाऱ्या सर्वांचे कर्तव्य आहे. त्या भाषेचे जे प्रदूषण होत आहे ते दुःखदायक आहे. शब्द, वाक्यरचना, अर्थ या संदर्भात चुका होणार नाहीत, याची दक्षता आपण घ्यायला हवी, पण दुर्दैवाने आपणच आपल्या भाषेची मोडतोड करतो, बोलण्यात, लिहिण्यात होणाऱ्या चुकांकडे दुर्लक्ष करतो, इतकेच नव्हे, तर त्या स्वीकारतोही! भाषेचे हे हाल थांबवणे व तिची जपणूक करणे ही आपली जबाबदारी आहे. या दृष्टीने 'लोकसत्ता'ने भाषारक्षणाचा हा नवा उपक्रम या नव्या वर्षात करण्याचा निर्धार केला आहे.

**– यास्मिन शेख**





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# मराठी भाषेची सौंदर्यस्थळे

**वाक्प्रचार, म्हणी,** सुभाषिते, अलंकार ही आपल्या भाषेची अलंकारलेणी आहेत, ज्यामुळे मराठी भाषेला सौंदर्य प्राप्त होते. भाषा अधिक अमृतमयी, दळदार पद्धतीने सादर होते. आधीचा मराठी भाषेचा गोडवा हजार पटीनी द्विगुणित होतो.

माझी एक आजी होती. फार शिकलेली वगैरे नव्हती. तिच्याकडे जात्याच्या ओव्या, पारंपरिक गाणी, लग्न समारंभातील गाणी, उखाणे, भातुकली, हादग्याची गाणी, मंगळा गौरीची गाणी, अभंग, गौळणी, ओव्या, म्हणी, वाक्प्रचार यांचा फार मोठा संग्रह होता. आजी वेळ साधून म्हणी आणि वाक्प्रचार इ.चा अचूक उपयोग करायची, तिचे ते रसाळ बोलणे नुसते ऐकत राहावेसे वाटायचे. कधी निसर्ग, कधी समाजकारण, कधी लोकव्यवहारावर टिप्पणी म्हणून या म्हणींचा वापर होत असे. कधी अचूक, मार्मिकतेने जीवनाचे सारच या म्हणींमधून आपल्या समोर मांडले जायचे. खरे तर म्हणी आणि वाक्प्रचार ही आवळी जावळी भावंडे आहेत असे म्हणायला पाहिजे. पण दोन्हीतून मराठी भाषेचे आशयदृष्ट्या, रूपदृष्ट्या एक वेगळेच सौंदर्य प्रतीत होते. पण दोहोत एक सूक्ष्म फरक आहे. म्हणींमध्ये आंतरिक लय अनुस्यूत असते. जी कवितेच्या ओळीच्या जवळ जाणारी असते, वाक्प्रचारांचे तसे नसते. म्हण एकाच अर्थापाशी थबकून राहाते,




वाक्प्रचार कदाचित समाजप्रवाहाबरोबर, लोक रूढींबरोबर आशयदृष्ट्या बदलत बदलत, प्रवाही होत होत आपल्यापर्यंत येतात. पण यामुळे भाषेला सौंदर्य, गती, चमत्कृती, एक सुंदर लेहेजा प्राप्त होतो. बहिणाबाई चौधरींसारख्या प्रतिभावंत आपल्या भाषासामर्थ्याने नवीन म्हणी निर्माण करतात. वा. गो. आपटे, डॉ. द. ता. भोसले यांसारख्या विद्वानांनी म्हणींवर खूप अभ्यासपूर्ण लेखन केलेले आहे.

पण आज भाषेची ही सौंदर्यस्थळे विस्मृतीत जात आहेत. म्हणी, अलंकार, वाक्प्रचार इ.मराठी विषयाच्या प्रश्नपत्रिकातून समाविष्ट केलेली आहेत. पण भाषेची गोडी लागण्याच्या दृष्टीने इतके पुरेसे नाही. त्यासाठी अधिक जागृततेने काही करणे गरजेचे आहे. नाही तर आपण ही भाषिक श्रीमंती गमावून बसू अशी काळजी वाटते.

**-डॉ. माधवी वैद्य**
madhavivaidya@ymail.com





# सांस्कृतिक धन

कांचन कराई द्वारा संकलित

**मराठी भाषेला** अनेक शतकांची समृद्ध परंपरा आहे. या समृद्धीमध्ये वाक्प्रचारांचा मोठा वाटा आहे. बोलणे हे भाषेचे मूळ रूप असते, त्यामुळे वाक्प्रचार हे एकप्रकारे आपले सांस्कृतिक धन आहे. वर्षानुवर्षे प्रचारात असलेल्या वाक्प्रचारांमुळे बोलण्यातली सहजता आणि अर्थपूर्णता खुलते. वाक्प्रचारांत लयबद्धता आणि अलंकरणही आढळते. संक्षेप ही भाषेची मोठी शक्ती असते, हे वाक्प्रचारांमधून लक्षात येते. यामुळे वाक्प्रचारांविषयी अनेकांना मोठी उत्सुकता असते.

वाक्प्रचारांचा अर्थ उलगडताना भाषेच्या घडणीमागची काही रहस्ये उजेडात येत असतात. रामायण-महाभारत यातल्या गोष्टी, भाषा-भाषांमधले सांस्कृतिक आदानप्रदान, निसर्गसृष्टी, त्याचबरोबर कला, क्रीडा, इतिहास, धर्म, तत्त्वज्ञान असा समस्त जीवनव्यवहार यांतून विविध वाक्प्रचारांना संदर्भपूर्णता मिळालेली असते. बदलत्या परिस्थितीमुळे काही वाक्प्रचार विस्मरणात जमा होतात, कालबाह्य ठरलेले काही वाक्प्रचार दूर सारणे गरजेचेही असते; त्याचवेळी नवे वाक्प्रचार रूढही होत असतात! मुळात हे मौखिक धन असल्यामुळे कधी त्यात एखादा शब्द बदलतो, तर कधी त्यात अर्थांतरणदेखील घडते!

मराठीत अनेक प्रकारचे कोश आहेत. त्यापैकी 'महाराष्ट्र वाक्संप्रदाय कोश' ( संपादक यशवंत रामकृष्ण दाते, चिंतामण गणेश कर्वे ) या ग्रंथाचे दोन खंड म्हणजे भाषेसाठी महत्त्वाचे संदर्भसाधन आहे. यात शिष्ट व अशिष्ट अशा वाक्प्रचार व म्हणी यांचा समावेश आहे. संपादक म्हणतात की वाक्संप्रदायांचा एवढा मोठा कोश कोणत्याही भारतीय भाषेत नाही ! मान्यवर साहित्यिक अरुण खोपकर यांनी आपल्या 'अनुनाद' या पुस्तकात 'महाराष्ट्र वाक्संप्रदाय कोश' आणि फ्रेंच भाषेतील एक कोश यांच्यातील वाग्युद्धाची हकीकत रंगवून सांगितली आहे ! भाषिक व्यवहार असा खुमासदार होण्यासाठी आपल्याही भात्यात अनेक वाक्प्रचार असायला हवेत!

भाषेविषयी अनेकांना ममत्व असते, कारण भाषा ही 'सांस्कृतिक स्मृती' मानली जाते. अनेक वाक्प्रचार वाचताना याची प्रचीती येते. कित्येक वाक्प्रचार सांस्कृतिक संचिताशी आपले नाते राखायला मदत करतात. काही वाक्प्रचारांमधून आपल्याला सामाजिक स्थित्यंतराचे पडसादही ऐकू येतात. हे सर्व जाणून घेण्यासाठी हा लेख लिहून मी सदराचा ओनामा केला आहे !

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com

## साम्ययोग

## कुतूहल





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# वापरा नाही तर गमवा



“**बच्चा, हे** होमवर्क फिनिश केलं नाहीस तर मी तुला पनिश करेन.”, “सॉरी ममा, पण पहिलं मला लर्न करू दे. नंतर मी हे राइट करते, प्रॉमिस, पक्कावाला” हे संवाद अगदी सहज मराठी घराघरांत ऐकू यायला लागलेले आहेत. छोट्यांची ही तऱ्हा तर मोठ्यांची आणखी वेगळी. ‘लेट झाला’, ‘कॉल मिस झाले’, ‘मिस यू डिअर’, ‘एन्जॉय कर, डोन्ट वरी’, ‘ट्राय आऊट तर करायला पाहिजे यार’, ‘प्लीज’, ‘सॉरी’, ‘थँक्यू’सतत म्हणायला आम्ही सरावलो आहोत. व्यक्त होते ती व्यक्ती आणि ज्या पद्धतीने व्यक्त होते ते अभिव्यक्ती! मग आमची अभिव्यक्ती परभाषेतून व्यक्त का व्हावी? त्याची कारणे काय? परभाषेतून आलेल्या या शब्दांचं आदान आम्ही किती आणि कसं घ्यायला हवं? कोणत्याही भाषेची वाढ होण्यामध्ये इतर भाषांचे साहचर्य, प्रभाव यांचा हातभार लागत असतोच. मराठीनेही वेळोवेळी संस्कृतसह अरबी, फारसी, इंग्रजी अशा अनेक भाषांकडून काही शब्द तसेच्यातसे घेऊन तर काहींना मराठी अंगडी-टोपडी घालून आपलेसे केले आहे. एखाद्या भाषारूपी नदीने इतर भाषांचे प्रवाह स्वतःमध्ये सामावून स्वतःला विशाल करणे वेगळे आणि इतर प्रवाहांच्या लोंढ्यापुढे स्वतःचे अस्तित्वच गमावणे वेगळे. मराठीतून सोपे अर्थवाही शब्द वापरणं, त्याची सवय स्वतः करणं नंतर दुसऱ्याला लावणं, समाजाचा कान चांगला तयार करणं, ही जबाबदारी आपलीच आहे आणि आपणच ती पार पाडायची आहे.

म्हणूनच रोजच्या वापरातल्या परभाषेतील शब्दांऐवजी वापरता येण्याजोग्या जुन्या-नव्या मराठी धाटणीच्या शब्दांवर चर्चा करणे, काही शब्द सुचवणे आणि यानिमित्ताने नव्या शब्दघडणीवर काही मंथन करणे हा या सदराचा हेतू असणार आहे. अर्थात, यामध्ये वाचकांच्या प्रतिक्रिया आणि सूचना मोलाच्या असणार आहेत. कारण आपण सगळे मिळूनच हे शब्द स्वीकारणार आणि वापरणार आहोत. यात आम्ही सुचवलेले शब्दच योग्य असतील असा आमचा दावा मुळीच नसेल. तसेच काही शब्द इतर काही शब्दविषयक चर्चागटांमध्ये येऊन गेलेही असू शकतील. कदाचित वाचक नवे शब्द सुचवतील. सदर लेखिका मी व वैशाली पेंडसे-कार्लेकर आम्हा दोघींची भूमिका नेहमीच स्वीकारशील असेल. भेटू या मग दर आठवड्याला.

– डॉ. निधी पटवर्धन
nidheepatwardhan@gmail.com

मराठी | कांचन कराई द्वारा संकलित

# भाषिक देवाणघेवाण

**नदीचे मूळ** आणि ऋषीचे कूळ शोधू नये असे म्हणतात. कारण कालांतराने लाभलेल्या रूपाशी अगदी विसंगत असे ते असू शकते. शब्दांच्या बाबतीतही हे खरे आहे. पण आपली जिज्ञासा आपल्याला स्वस्थ बसू देत नाही. त्यातूनच व्युत्पत्तीशास्त्र विकसित झाले. भाषाशास्त्राचा एक भाग म्हणून ते महत्त्वाचे आहेच, पण आपली भाषा इतर भाषांच्या संपर्कातून कशी अधिकाधिक अर्थवाही आणि समृद्ध होत गेली याचीही जाणीव शब्दांची व्युत्पत्ती शोधताना होत जाते.

आजकाल भाषा हे अस्मितेचे फार मोठे वाहक बनले आहे. मराठीपुरता विचार केला तर ''मी मराठी''चा गजर एक सामूहिक अस्मिता आणि अभिनिवेश नक्कीच निर्माण करतो. मग इंग्रजी पाट्यांना काळे फासणे हा मराठीप्रेमाचा आविष्कार बनतो. हिंदीभाषक रिक्षाचालकांना मराठीत बोलायची सक्ती केली जाते. तमिळभाषकांची ''यंडू-गुंडू'' अशी कुचेष्टा केली जाते. या पार्श्वभूमीवर आपल्या भाषेतला एखादा शब्द मुळात आला कुठून याचा शोध या अभिनिवेशातील आक्रमकता कमी करतो. आपले अनेक शब्द इतर भाषांतून आले आहेत ही जाणीव इतर भाषांविषयी आदर वाढवते आणि आपल्या विविध भाषा हा आपला एक सामूहिक आणि काही प्रमाणात वैश्विकदेखील वारसा आहे याची जाणीव होते. अप्पा, अण्णा, अम्मा, ताई, अक्का ही आपलेपणा दाखवणारी संबोधने कन्नडमधून आपल्याकडे आली आहेत आणि ब्रेडसारखा इंग्लिश शब्द टाळून त्याला पाव म्हणण्यात आपले मराठीप्रेम सिद्ध होत नाही, कारण पाव हा शब्दही पोर्तुगीज भाषेतून आपल्याकडे आला आहे याची जाणीव आपल्या संकुचित विचारांना आळा घालते. परस्परसंपर्कातून होणारी ही भाषिक देवाणघेवाण स्वाभाविक असते.

एखादा शब्द कुठून आला याचा शोध कधीकधी इतिहास, भूगोल, विज्ञान, तंत्रज्ञान, राजकारण, अर्थकारण अशा अनेक अनपेक्षित घटकांना स्पर्श करतो. त्यातून आपले स्वतःबद्दलचे आणि इतरांबद्दलचे आकलन अधिकाधिक विस्तारत जाते. आपल्या दैनंदिन वापरातील अनेक शब्दांचा रंजक शोध, शास्त्रीय अभ्यासात येऊ शकणारी क्लिष्टता टाळून, आपण आगामी लेखांतून घेणार आहोत.

**-भानू काळे**

bhanukale@gmail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# चुकीच्या जागी अनुस्वार

**मराठी भाषेच्या** लेखनात आणि बोलण्यात वारंवार होणाऱ्या चुकांचा आणि त्या चुका का टाळाव्यात, त्या चुकांऐवजी योग्य शब्द, वाक्यरचना कोणत्या याचे दिग्दर्शन मी करणार आहे.

पुढील वाक्य पाहा- त्या समारंभाला खूप लोकं जमली होती. लोकं- 'क' वर अनुस्वार दिल्यामुळे त्या शब्दाचे खरे रूप लोके होते. मराठीत अकारान्त, नपुसकलिंगी नामाचे अनेकवचन एकारान्त होते. जसे झाड-नाम, नपुसकलिंगी एकवचन, झाडे-झाडं, अनेकवचन अनौपचारिक लेखनात आणि बोलण्यातही एकाराऐवजी शेवटचे अक्षर आघातयुक्त लिहिले व उच्चारले जाते. त्या शेवटच्या अक्षराचा - 'क'चा- आघातयुक्त उच्चार त्या अक्षरावर एकाराऐवजी अनुस्वार देऊन लिहिला जातो- म्हणजे शेवटच्या अक्षराचा उच्चार झाडं, बाळं, मुलं - अ चा पूर्ण उच्चार. लोकं (लोके) हा शब्दच मराठीत नाही. लोक (नाम पुल्लिंगी अनेकवचनी) हा खरा शब्द आहे. पण बहुतेक मराठी भाषक आणि मराठी लिहिणारेही हा शब्द 'लोकं' असाच उच्चारतात आणि लिहितात. 'लोकं' हा शब्द पुल्लिंगी, अनेकवचनी आहे, तो नपुसकलिंगी अनेकवचनी (लोके-लोकं) असा नाही. वरील वाक्य असे हवे- त्या समारंभाला खूप लोक जमले होते.

दुसरी एक चूक लिहिण्यात वारंवार होते, पण बोलताना तो शब्द आपण बरोबर उच्चारतो. तो शब्द आहे- अग, ग-ग चा उच्चार सर्वच मराठी भाषक आघातयुक्तच करतात, पण लेखनात 'अगं, गं अशी रूपे सर्वत्र आढळतात. 'ग' या अक्षराचा आघातयुक्त उच्चार म्हणजे लेखनात 'ग'वर अनुस्वार असा गैरसमज आपल्या मनात असावा. एक लक्षात घ्यावे, की हे शब्द अगं-अगे, ग-गे असे एकारयुक्त नाहीत. त्यामुळे लेखनात त्या अक्षरावर अनुस्वार देऊ नये. अग, ग असेच लेखन करावे.

यास्मिन शेख





# आयता मुठा, जावई बुवा उठा !

**एका गावात** एक बाई होती. तिला एकुलती एक लेक होती. लेक खूप लाडकी आणि जावई दीड लाडका ! सुरुवातीला त्या जावयाचे खूप लाड करावेसे वाटायचे तिला. खाण्याचे म्हणू नका, आगत स्वागताचे म्हणू नका, खूप लाड ! जावईही सुखावला होता. त्याला काय आयतेच सर्व मिळत होते. त्याने साहजिकच हातपाय पसरायला सुरुवात केली. जावयाची आजे सासू चाणाक्ष होती. तिच्या ध्यानी सर्व गोष्ट यायला वेळ लागला नाही.

एकदा जावई बापू बसले होते नाश्त्याला. सासूबाई करत होत्या नाश्त्यासाठी आंबोळ्या !

आंबोळ्या म्हणजे जावई बापूंच्या भलताच आवडीचा प्रकार ! त्यांनी आंबोळ्यांवर मस्तच ताव मारण्यास सुरुवात केली. हे आजेसासूबाईंच्या लक्षात आल्यावर त्यांनी आंबोळ्या करायचा ताबा स्वतःकडे घेतला. आंबोळ्या करता करता आंबोळ्यांचं पीठ संपायला आले, जावईबापूही खरे तर तृप्तीची ढेकर देत होते. पण आंबोळ्या इतक्या चविष्ट झाल्या होत्या की आंबोळ्यांची त्यांची मागणी काही थांबत नव्हती. शेवटी आजेसासूबाई चातुर्याने म्हणाल्या, ''जावई बापू ! करू चुर्र ? का पाणी पिऊन बघताय ?'' जावई बापूंच्याही झाली गोष्ट लक्षात आली आणि ते म्हणाले. ''धन्यवाद ! आजेसासूबाई ! थांबतो



आता. नाही तर तुम्ही नक्की म्हणाल, आयता मुठा, जावई बुवा उठा !'' जावयाने वेळीच स्वतःला सावरले.

'आयता मुठा' म्हणजे आयतीच मिळालेली कोणतीही मूठभर गोष्ट उपभोगणारा 'आयतोबा' ! उपभोगाचाही अतिरेक झाला की तोच जावई दोडका होतो. कुणी पाहुणचार करत गेले तरी त्याचा फायदा आपण किती घ्यायचा याचे तारतम्य हवे आणि करणाऱ्यानेही कुणाचे अगत्य, लाड किती करावे यालाही मर्यादा घालायला हवी. कोणत्याही गोष्टीचा अतिरेक वाईटच ! नाहीतर जावई बापू उठा आणि आता घर आपले गाठा ! म्हणण्याची वेळ येणारच. माणसाला शहाणपण शिकवणारी ही म्हण ...'आयता मुठा, जावई बुवा उठा !'

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# आहार आणि वाक्प्रचार

**वाक्प्रचारांना कोणताही** विषय वर्ज्य दिसत नाही .रोजचा आहार हा तर दैनंदिन जगण्याशी संबंधित विषय ! तो त्यात येणारच !

**१. ताकापुरती आजी :**

ताक हा रोजच्या जेवणातला पदार्थ ! मात्र तोही दुसऱ्याकडून मागायची वेळ काही वेळा येऊ शकते ! अशा वेळी एखाद्या बाईकडून ताक मागायचं असेल, तर त्याआधी तिच्याशी गोड बोलायला पाहिजे ! ती वृद्ध असेल तर तिच्यासाठी 'आजी' असे घरगुती प्रेमाचे, आदराचे संबोधन वापरले पाहिजे, म्हणजे ती खूश होणार ! त्यामागची खरी भावना केवळ व्यावहारिक लाभ साधण्याची असते ! त्यामुळे 'ताकापुरती आजी', म्हणजे गोड बोलून काम साधणे. या वाक्प्रचारात जीवनव्यवहाराचा मंत्रच जणू सांगितला आहे ! केवळ दोन शब्दांतून त्यात रोकडा नीतिबोध ठसवला आहे. एक जुने गाणे होते : ''कामापुरता मामा, ताकापुरती आजी, जोवरी पुरवी हट्ट तोवरी, पत्नी असते राजी !''

यातला 'कामापुरता मामा' हा वाक्प्रचारही याच अर्थाचा आहे . लघुरूप हे वाक्प्रचाराचे एक वैशिष्ट्यच असते . सूक्ष्म निरीक्षणातून आलेला हा वाक्प्रचार आपल्याला नक्कीच सावध करतो !

**२. दही खाऊ की मही खाऊ :**

या वाक्प्रचाराचा वाच्यार्थ आहे, दही खाऊ की ताक ( किंवा लोणी ) खाऊ ? मही म्हणजे मंथन करून आलेले ! याचा सुचवलेला अर्थ आहे, हे करू की ते करू ?- अशी दोलायमान मनःस्थिती होणे ! कवयित्री शांता शेळके यांनी मला एकदा सहज गप्पा मारताना सांगितलं होतं की आपण शहरी भागात 'तळ्यात मळ्यात' म्हणतो, त्याऐवजी ग्रामीण भागात 'दही खाऊ की मही खाऊ' असं म्हणतात ! शांताबाईंचे बालपण खेड - मंचर अशा तेव्हाच्या खेड्यांमध्ये गेले होते. त्यांची भाषेविषयीची जिज्ञासा तल्लख होती ! खरंच ! तळे आणि मळे, य अनुप्रासाने जोडलेल्या शब्दांमधून दोन भिन्न पर्याय सूचित होतात. अशा वेळी कोणता पर्याय निवडावा असा पेच आपल्याला काही प्रसंगांत पडतो ! हीच संभ्रमावस्था याही वाक्प्रचारातून व्यक्त होते. यातही दही आणि मही यामध्ये अनुप्रास वापरला आहे. त्यामुळे साधलेली लय अनुभवताना मनाचा झोक नेमकेपणाने सूचित झाला आहे.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





# खाणपिणं आणि बरंच काही

**'खाणपिणं' हा** मराठी माणसाचा अगदी 'जिव्हा'ळ्याचा विषय. आज आपल्या मराठी माणसांच्या स्वयंपाकघरात (किचनमध्ये नाही हो!) आणि पोटात पुरणपोळीबरोबर देशोदेशींच्या खाद्यपदार्थांनापण जागा मिळाली आहे. या पदार्थांबरोबर आणि अर्थातच इंग्रजीच्या संपर्कातून अनेक नवीन शब्द आपल्या खाण्यापिण्यातही आले. 'अगं, त्या रेसिपीमध्ये शिजवलेले बटाटे मॅश करून घ्यायचे आहेत की कटरवर चॉप करून?' यापेक्षा छान 'कुस्करून', 'लगदा करून' घ्या किंवा कटर म्हणजे 'चिरणी'वर चिरून घ्या ना. रेसिपीला 'पाककृती' असा छान शब्द आहेच. आमटीसाठी डाळ 'घोटून' घेता येते, तर शॅलोफ्राय, डीपफ्रायऐवजी अळूवड्या तेलावर 'परतून' किंवा 'तळून'ही घेता येतात. सॅलडला 'कच्चाहार' म्हणता येईल. जेवणातलं सूप आता 'सुपा'इतकं सवयीचं झालं असलं तरी त्याच्यासाठी 'सार', 'कढण' असे काही समानार्थी शब्दही वापरता येतील.

आज मी ब्रंच केल्यामुळे लंच स्कीप केलंय, असं म्हणण्याऐवजी 'भरपेट न्याहारी' केल्यामुळे दुपारचं जेवण घेतलं नाही असं म्हणता येईल. स्नॅक्ससाठी 'अल्पोपाहार' किंवा वेळेनुसार 'मधल्या वेळचं खाणं' आहेच. समारंभामध्ये लोकप्रिय असणारी बुफे पद्धती 'स्वरुचिभोजन' या शब्दाने अधिक रुचिपूर्ण होईल.

केकबरोबर आपल्याकडे बेक करणं आलं. बेक, ग्रील या क्रियांसाठी भाजणं, शेकवणं ही क्रियापदं वापरता येतील. मसाला किंवा इतर स्वाद हे पदार्थांमध्ये मुरण्यासाठी मॅरिनेट करणे किंवा मॅरिनेशन असा वाक्प्रयोग केला जातो. त्याला अनुक्रमे 'मुरवत ठेवणं किंवा मुरमाखवणं', 'मुरवणी' असंही म्हणता येईल. ग्रेव्हीला 'रस्सा', डिप करणे याला 'बुडूक', 'डुबूक', 'डुबकावणं' असंही म्हणता येईल.

जंकफूडचा शब्दशः अर्थ न घेता त्यातून ध्वनित होणाऱ्या अर्थाचे 'अरबटचरबट', 'सटरफटर', 'चुरडूमुरडू', 'चाऊम्याऊ', 'चाणाचुरा', 'चटकमटक' असे वेगवेगळ्या छटांचे अनेक शब्द आपल्याकडे आहेत. भूक लागल्यावर पटकन तयार होणारे फास्टफूड म्हणजे आपला 'झटपट खाऊ'.

शब्दांची ही खाद्ययात्रा हिंदू तेवढी रसपूर्ण वाटणार आहेच. पण महत्त्वाचं आहे ते - कोणतेही शब्द भाषेत रुळण्यासाठी सर्वांनी ते शब्द भरपूर प्रमाणात वापरणं.

चला तर मग, यासाठी प्रयत्न करू या.

–वैशाली पेंडसे-कार्लेकर
vaishali.karlekar1@gmail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# चित्रपटविषयक शब्दांची व्युत्पत्ती

**भारतात चित्रपट** आले तेव्हा त्या व्यवसायाशी संबंधित बहुतेक सर्वच शब्द इंग्रजी होते. आज मात्र चित्रपटविषयक लेखनात अनेक मराठी शब्द वापरले जातात, पण ते आले कुठून आणि कसे हे मात्र खूप जणांना ठाऊक नसते. यांतील अनेक शब्दांचे जनक स्वातंत्र्यवीर सावरकर हे आहेत. अंदमानातून १९२४ साली सुटका झाल्यावर सावरकर १३ वर्षे रत्नागिरीला स्थानबद्ध होते. मे १९३७ मध्ये ते निर्बंधमुक्त झाल्यावर त्यांच्या मुक्ततेसाठी झटणारे अनंत हरी गद्रे त्यांना भेटण्यासाठी निघाले. वाटेत कोल्हापूरला त्यांनी सत्यवादीकार बाळासाहेब पाटील यांची भेट घेतली. तेव्हा त्यांना समजले की आचार्य अत्रे हेदेखील त्या वेळी कोल्हापुरात आहेत. अत्रे यांचीही सावरकरांना भेटायची इच्छा होती. दुसऱ्याच दिवशी दोघे रत्नागिरीला गेले. तीन दिवस दोघांनी सावरकरांच्या घरीच मुक्काम केला आणि मुक्ततेनंतरचा सावरकरांचा पहिला दौरा दोघांनी कोल्हापूर येथेच आयोजित केला.

अत्रे त्या वेळी मास्टर विनायक यांच्या हंस पिक्चर्सच्या स्टुडिओत राहून तिथेच आपल्या 'प्रेमवीर' चित्रपटाचे चित्रण करत होते. सावरकरदेखील त्याच स्टुडिओमध्ये राहिले. दिवसाचा बराच वेळ तेथील काम बघत असताना




सगळ्यांच्या तोंडी इंग्रजी शब्द असल्याचे सावरकरांच्या लक्षात आले व ते त्यांना खटकले. आपल्या 'कऱ्हेचे पाणी' या आत्मकथनात अत्रेंनी लिहिलेल्या आठवणींनुसार त्यावेळी सावरकरांनी पटापट अनेक इंग्रजी शब्दांना पर्यायी मराठी शब्द घडवले. फोटोग्राफीला छायाचित्रण, टॉकिजला बोलपट, रेकॉर्डिंगला ध्वनिमुद्रण इत्यादी. चित्रपट, निर्माता, दिग्दर्शक, नेपथ्य, मध्यंतर, बाह्यचित्रण, पटकथा, ध्वनिमुद्रिका हेही सावरकरांचेच शब्द. पुढे सावरकरांनीच कार्यालय, सचिवालय, संसद, विधिमंडळ, महापालिका, महापौर, नगरपालिका, नगरसेवक, सेवानिवृत्त, निवृत्तिवेतन, परिपत्रक, कोषाध्यक्ष, नभोवाणी, हुतात्मा, दिनांक असे इतरही असंख्य शब्द घडवले आणि ते इतके सहजसोपे होते की ते आपण सर्वच सर्रास वापरत असतो. आज मात्र शासकीय पत्रकांमधील मराठीत इतके क्लिष्ट शब्द असतात की एका मुख्यमंत्र्यांनी ''याचे मराठीत भाषांतर करून मिळेल का?'' हा प्रश्न आपल्या सचिवांना गमतीने विचारला होता!

**-भानू काळे**
bhanukale@gmail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# उंडगं उठलं, पिठलं हाटलं…

**'उंडगा/ उंडगी'** या शब्दाचा अर्थ 'उनाड' असा आहे. या म्हणीच्या लक्षणकथेपुरता उनाड, गावभर फिरणारी स्त्री असा अर्थ घ्यायचा.

एका गावात एक एकत्र कुटुंब राहात होतं. घरात सासरेबुवा, सूनबाई, नवरा, दोन वाढत्या वयाची मुलं असा परिवार! घरातल्या सुनेचं म्हणजे या दोन मुलांच्या आईचं नाव सगुणा. सगुणाबाई खरंच गुणाच्या होत्या. सर्व कलांत प्रवीण होत्या. दिवसभरात अनेक कामे करण्यात त्या गुंतलेल्या असायच्या. या सर्व कामांमध्ये घरच्या कामांना कुठून वेळ मिळणार? असे त्यांचे व्हायचे खरे. मग जसा वेळ होईल तसं घरकाम, स्वयंपाकाचा बेत सांभाळायच्या. पण सुंदर दिसणं, पुढे पुढे करणं, नाचरेपणा हा त्यांच्या स्वभावाचा जणू स्थायिभाव. त्यामुळे त्यांच्यावर टीकाही व्हायची. कुणी त्यांची 'आली बघा उंडगी, नाचण मोर आहे नुसती!' अशा शब्दांत खिल्लीही उडवीत असे.

कुटुंबातल्या सगळ्यांच्या समाधानाचा मार्ग सर्वांच्या पोटातूनच जातो, या गोष्टीचा विसर सगुणाबाईंना पडलेला होता. रात्रीच्या जेवणासाठी गडबड करून घरी आल्यावर झटपट जेवण बनवण्यासाठी, कमी वेळ लागणारा पदार्थ त्या करू लागल्या. मग काय! आठवड्यातून दोनचारदा पिठलं सोय म्हणून पानात पडू लागलं. खरं तर



घरातले सारेच जरा नाराज होऊ लागले, सर्व जण वैतागले होते या पिठल्याला; पण बोलणार कोण? आणि मांजराच्या गळ्यात घंटी बांधणार कोण? शेवटी सासरेबुवांनी ठरवले, आता सूनबाईंना जरा ताकीद दिली पाहिजे. ते त्यांना ऐकू जाईल अशा बेतानी म्हणाले, ''सूनबाई! आज लवकर आलात? म्हणजे आज तरी रीतसर काही मिळेल जेवायला आम्हाला! का म्हटलं आजही पिठलं हाटणार? म्हणतात ना, 'उंडगं उठलं, पिठलं हाटलं' तसं चाललंय तुमचं हल्ली.'' सगुणाबाईंना आपली चूक लक्षात आली. त्यांनी ती सुधारण्याचा निश्चयही केला.

आधीच कामाचा उल्हास असणाऱ्या आणि नको त्या गोष्टींना प्राधान्य देणाऱ्या स्वभावाबद्दल ही म्हण मार्मिकपणे वापरली जाते.

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com

# वाक्प्रचार आणि मूल्यभाव

**काही वाक्प्रचारांमध्ये** व्यवहाराबरोबरच जगण्यातील मूल्यभावही वेगवेगळ्या पद्धतीने टिपलेला दिसतो. त्याची ही नमुनेदार उदाहरणे :

१) 'फुटकी कवडी जवळ नसणे' या वाक्प्रचाराचा अर्थ आहे, विपन्नावस्था/ दारिद्र्य असणे ! कवडी म्हणजे समुद्रात आढळणाऱ्या एक प्रकारच्या गोगलगाईचे कवच. एके काळी कवडी हे चलन म्हणून अस्तित्वात होते. फुटकी कवडी हे सर्वात कमी किमतीचे चलन होते. त्यानंतर कवडी, दमडी, पै, ढेला, पैसा, आणा व रुपया असा चलनाचा चढता क्रम होता. तीन फुटक्या कवड्या म्हणजे एक कवडी असे. त्यामुळे कवडीचुंबक असणे (कंजूष असणे), कवडीमोलाचा, कवडीची किंमत नसणे असे वाक्प्रचार रूढ आहेत. कवडीऐवजी कपर्दिक (मूळ संस्कृत शब्द कपर्दिका) हाही शब्द काही वेळा आढळतो. 'नाही खर्चिली कवडी दमडी, नाही वेचला दाम' या ग. दि. माडगूळकर यांच्या गाण्यात कवडीचा संदर्भ मार्मिकपणे टिपला आहे. आज कवडी हे चलन अस्तित्वात नसले तरी भाषेने, वाक्प्रचाराच्या माध्यमातून तिचे सांस्कृतिक मोल जणू जपून ठेवले आहे.



२) 'गंगाजळी' असणे म्हणजे श्रीशिल्लक असणे होय. गंगाजळी म्हणजे खर्च वजा जाता उरलेली रोकडी बचत, कायम शिलकीचा खजिना ! गंगा नदीला पुराणकथा, विविध भाषांमधल्या अनेक साहित्यकृती यांच्यामुळे एक प्रकारचे सांस्कृतिक वलय प्राप्त झाले आहे. त्यामुळे 'वाहिली ती गंगा आणि राहिले ते तीर्थ', 'वाहिले ते पाणी आणि राहिले ते गंगाजळ' अशा लोकोक्ती रूढ आहेत. जे उरले ते पवित्र आहे, मोलाचे आहे, असा त्याचा भावार्थ आहे. कवी गोविंदाग्रजांनी आपल्या कवितासंग्रहात म्हटले आहे 'जे जे ज्या समयी मनात भरले, स्वच्छंद नाना स्थळी/ ते ते त्या समयी जपून धरता, ही होय गंगाजळी' ! तसेच व्यासंगी ग्रंथपाल श्री. बा. जोशी यांनी आपल्या मराठी, बंगाली, हिंदी, गुजराती, संस्कृत, इंग्लिश अशा विविध भाषांच्या अफाट वाचनातून निवडक टिपणे संकलित केली आहेत, त्या पुस्तकाचे शीर्षक 'गंगाजळी' असे अगदी अर्थपूर्ण ठेवले आहे !

– डॉ. नीलिमा गुंडी

## भाषासूत्र

कांचन कराई द्वारा संकलित

# आपली माती... आपले शब्द

**महाराष्ट्रीय परंपरेत** (आणि म्हणून भाषेतही) न आढळणाऱ्या प्रथा वा संकल्पना यांना सुटसुटीत अर्थवाही शब्द वापरून त्यांना आपलंसं करणं सहज शक्य आहे. ड्रीमगर्लसाठी स्वप्नपरी, बॉयफ्रेंडसाठी 'प्रियसखा', गर्लफ्रेंडसाठी 'प्रियसखी', डेटिंगसाठी 'भेटीगाठी', एकत्र भेटल्यावर 'वेलकम ड्रिंक'साठी 'स्वागतपेय' हा पर्याय चांगला आहे. रिसेप्शनसाठी 'स्वागत समारंभ', हनिमूनला 'मधुचंद्र', मॅरेज ॲनिव्हर्सरीसाठी 'लग्नाचा वाढदिवस' हे शब्द वापरून त्याला देशी करताच येते. 'हेअर ॲण्ड मेकअप'साठी 'तयारी' हा शब्द सहज मराठी घराघरांत वापरतोच आपण. 'चल, मी तयार होतो वा होते', इथली तयारी समाहार द्वंद्व समासासारखी आहे... गालावर लाली लावता येते. ओठांवर ओष्ठशलाका लावता येते. केशरचनेत तऱ्हेतऱ्हेचे खोपे करता येतात. वस्त्रप्रावरणे नीट लेवून तयार होता येऊ शकते. ड्रेसकोडऐवजी 'पेहराव संकेत' पाळता येऊ शकतो. गिफ्टऐवजी भेटवस्तू देता येतात. 'रिटर्न गिफ्ट' ही संकल्पना चिमणपाखरांच्या वाढदिवसांना वा विवाह समारंभात बरीच वापरली जाताना दिसते. परतफेड करून ताबडतोब ऋणमुक्त होणं, हे कदाचित नव्या पिढीला बरं वाटत असेल, कदाचित असलेल्या सुबत्तेचे दर्शन महत्त्वाचं वाटत असेल, पण भेटवस्तूपेक्षा ही परतीची भेटवस्तू महाग असली तर घेणाऱ्यास कानकोंडं (ऑकवर्ड) करू शकते. 'अब्द' शब्द तर फक्त षष्ट्यब्दीत वा शताब्दीत आढळतो. अब्द म्हणजे वर्ष. 'ज्युबिली' प्रकरणासाठी २५ वर्षपूर्तीला रौप्य महोत्सव, ५० वर्षपूर्तीसाठी सुवर्ण महोत्सव, ६० वर्षपूर्तीसाठी हीरक महोत्सव, ७५ वर्षपूर्तीसाठी अमृत महोत्सव आणि १०० वर्षं पूर्ण झाली की शताब्दी समारंभ हे शब्द आपण स्वीकारलेले आहेत.

अनेक सांस्कृतिक संकल्पना अभाषांतरीय असतात, पण जशा त्या आपल्या मातीत रुळतात तसं त्यांचं अनुसर्जन शक्य असतं!




◂ बेंगळूरुच्या मराठीप्रेमींनी, करोनाकाळापूर्वीच्या एका २७ फेब्रुवारीस केलेला केकसोहळा!


– डॉ. निधी पटवर्धन
nidheepatwardhan@gmail.com

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# फारसीचा प्रभाव

**मराठी शब्दांच्या** व्युत्पतीचा विचार करताना फारसीकडे दुर्लक्ष करणे अशक्य आहे. साधारण पाच शतके महाराष्ट्रात मुख्यतः मुस्लिमांनीच राज्य केले. ते तुर्की, अफगाण, इराणी, पठाण, अरब, मुघल इत्यादी विभिन्न वंशांचे असले तरी सर्वांची राज्यकारभाराची भाषा कायम फारसी हीच राहिली. कारण इराणचे (पर्शियाचे) साम्राज्य त्या परिसरात सर्वाधिक सामर्थ्यवान होते व फारसी ही त्यांची भाषा होती. प्रदीर्घ संपर्कानंतर मराठीवर फारसीचा खूप प्रभाव पडणे स्वाभाविक होते. कारण शेवटी ती जेत्यांची भाषा होती. साहजिकच आवाज, इशारा, एल्गार, खंजीर, गर्दी, इमारत, इनाम, तारीख, परवाना, तहसील, तपास, अर्ज, मोबदला, मिळकत, बिदागी, गुलाम, आजार, इलाज, अत्तर, अंजीर, पैदास, नगारा, तमाशा, ख्याल असे असंख्य फारसी शब्द मराठीने पूर्णतः स्वीकारले. माधवराव पटवर्धन यांचा 'फार्शी-मराठी कोश' किंवा यू. म. पठाण यांचा 'फार्सी-मराठी अनुबंध' हा ग्रंथ याची साक्ष पटवायला पुरेसा आहे.

संस्कृतमधून आले असतील असे वाटणारे अनेक मराठी शब्दही मूळ फारसी आहेत. उदाहरणार्थ, 'जोष' आणि 'त्वेष'. संस्कृतात त्यांचा अर्थ अनुक्रमे 'आनंद' आणि 'चकचकित' असा आहे. फारसीतील 'जोश' आणि 'तैश' या शब्दांचा अर्थ मात्र मराठीप्रमाणेच 'आवेश' आणि 'त्वेष' हा आहे आणि त्याच अर्थाने ते फारसीमधून मराठीत आले आहेत.







‹ सुरेश खोपडे यांचे मराठी पुस्तक व आमिर खानचा चित्रपट यांतील 'दंगल'चा अर्थ निरनिराळा!

कधी-कधी फारसी शब्द अर्थबदल होऊन मराठीत आले. उदाहरणार्थ, 'दंगल' हा मूळ फारसी शब्द. या नावाचा चित्रपट आमिर खानने बनवला. लोकप्रियतेचे सर्व तत्कालीन विक्रम मोडणारा. हरयाणातील कुस्तीगीर फोगट कुटुंबाची ती कहाणी. तिला 'दंगल' हे नाव का दिले, असा प्रश्न अनेकांना पडू शकतो. कारण मराठीत दंगल हा शब्द 'दंगा' या अर्थाने वापरला जातो, कुस्तीशी त्याचा अजिबात संबंध नाही. पण मुळात दंगल हा फारसी शब्द असून 'कुस्तीचा आखाडा' असाच त्याचा अर्थ आहे व तोच आमिर खानने प्रमाण मानला.

– भानू काळे
bhanukale@gmail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# भारतीयत्त्वाचा 'गर्व' हिंदीत बाळगा; मराठीत नको...

**मराठी माणसे** बोलताना आणि लिहितानाही हिंदी भाषेतील काही शब्द जसेच्या तसे स्वीकारतात. हिंदीत त्या शब्दांचे जे अर्थ आहेत, ते मराठीतील त्याच शब्दांचे अर्थ असतात, असे मानणे चुकीचे आहे. अर्थ वेगळे असले, तरी त्या परभाषेतील अर्थानेच आपण मराठी बोलताना व लिहितानाही त्या शब्दांचा वापर करतो. असे करणे म्हणजे आपणच आपल्या भाषेला विद्रूप करतो.

आता पुढील वाक्य पाहा - 'मला गर्व आहे, की मी भारतीय आहे'. हिंदी भाषेत 'गर्व' या शब्दाचा अर्थ 'योग्य अभिमान' असा आहे. मराठीत तोरा, अहंकार, उद्दामपणा. मराठीत म्हण आहे - 'गर्वाचे घर खाली'. 'गर्विष्ठ' या विशेषणाचा अर्थ आहे - अत्यंत अहंकारी, उन्मत्त. 'ग'ची बाधा या शब्दप्रयोगात 'ग' म्हणजे गर्व. गर्व या दुर्गुणामुळे होणारी मानसिक बाधा. बाधा म्हणजे पीडा, त्रास, विकार. मराठीतील या शब्दाचे अर्थ लक्षात घेतल्यास वरील वाक्याचा अर्थ होईल - 'मला दुरभिमान, अहंकार आहे, की मी भारतीय आहे.' - म्हणजे अर्थाचा अनर्थ! हे वाक्य असे हवे - 'मला अतिशय अभिमान वाटतो, की मी भारतीय आहे'.

हे वाक्य वाचा - स्वर्गीय इंदिरा गांधी या भारताच्या पहिल्या स्त्री प्रधानमंत्री होत. स्वर्गीय हा शब्द. हिंदी भाषेत 'स्वर्गीय' हा शब्द मृत व्यक्तीचा उल्लेख करताना योजतात.

मराठीत 'स्वर्गीय' या विशेषणाचा अर्थ आहे - दिव्य, स्वर्गलोकातील. (हेवनली, डिव्हाइन) स्वर्गीय सुख, स्वर्गीय आनंद म्हणजे पृथ्वीवर न लाभणारे असे सुख, स्वर्गातच लाभणारा असा आनंद - आत्यंतिक सुख किंवा आनंद. मराठी शब्दाचा अर्थ डावलून हिंदीतील अर्थाचा स्वीकार करणे हे मराठी भाषेचे दुर्दैव!

हे वाक्य असे हवे. 'स्वर्गवासी (स्व.) इंदिरा गांधी या भारताच्या पहिल्या स्त्री प्रधानमंत्री होत.' स्वर्गवासीचे संक्षिप्त रूप स्व., कैलासवासी (कै). कै. हा शब्दही मृत व्यक्तीच्या संदर्भात योजतात. त्यामुळे वारंवार ऐकू येणारे आणि वाचनात आढळणारे वाक्य 'स्वर्गीय' इंदिरा गांधी... प्रधानमंत्री होत.

'स्वर्गीय' हा शब्द पूर्णपणे वगळणे, नष्ट करणे आवश्यक आहे.

मला मराठी भाषकांना अशी विनंती करायची आहे, की कृपा करून परभाषेतील शब्दांच्या चुकीच्या अर्थाचा स्वीकार करू नका. आपल्या भाषेवर आपणच असा अन्याय करणे योग्य नाही.

**- यास्मिन शेख**





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# कोंबडी लारगावली अन् म्हैस ओवाळली...



**एका गावात** एक पाटील राहात होता. गावात त्याला फार मान असे. त्याचा शब्द कोणी खाली पडून देत नसे. जणू सगळ्या प्रकारचे ज्ञान फक्त या पाटलालाच. त्याच्या जवळ पैसाही खूप असल्याने कोणतेही संकट आले की तो ते संकट निवारण करण्यासाठी विनाकारणच पैसा खर्च करीत असे. उदा. लेकाला जरा सर्दीपडसे झाले तरी लगेच मोठ्या डॉक्टरकडून दवापाणी कर, हॉस्पिटलमधे दाखल कर, असे चालायचे त्याचे. जेव्हा ते दुखणे गंभीर असे तेव्हा ही खबरदारी घ्यायलाच हवी. पण डॉक्टरही म्हणायचे "अहो ! अगदी मामुली सर्दी, पडसे आहे. कशाला दाखल करताय उगीच? काही गंभीर दुखणे नसेल तेव्हा इतके टोकाचे पाऊल उचलायची काही आवश्यकता नाही.'' पण पाटील ऐकतील तर ना!

हे त्यांचे वर्तन बघून गावातले एक अनुभवसमृद्ध वैद्य हसत हसत म्हणत असत, आता पाटील पडली मोठी आसामी ! मालदार गडी ! पण खरं सांगायचं तर त्यांचा एकंदर खाक्या बघून असं म्हणावंसं वाटतं, ''कोंबडी लारगावली अन् म्हैस ओवाळली.''

जुन्या म्हणींची गंमत असते. त्या म्हणीतून काही नवीन शब्द कळतात. जसा या म्हणीत 'लारगावली' हा शब्द येतो. 'लारगावली' याचा अर्थ 'भुताने झपाटली'. भुताने झपाटलेल्या कोंबडीसाठी पूर्वी मांत्रिकाचेच उपाय चालत असत. (आता तो जमाना गेला.) ते करायचे सोडून कोंबडीवरून म्हैस ओवाळून टाकायची? कारण कोंबडीची किंमत ती काय असणार? पण म्हशीची किंमत मात्र कोंबडीच्या कितीतरी पटीने जास्त असते! असे करणे म्हणजे अव्यवहार्य नाही का ?

या म्हणीचा लक्ष्यार्थ असा की क्षुल्लक कारणासाठी किंवा छोट्याशा लाभासाठी मोठे नुकसान करून घेणे. काही जुन्या म्हणी, काही जुने शब्द आता विस्मरणात गेलेले आहेत. काही विचारही आता कालबाह्य झालेले आहेत. पण म्हणींमधून लक्ष्यार्थ किंवा सूचितार्थ व्यक्त होत असतो. त्यातून मानवी व्यवहार, स्वभाव, वर्तणूक, यावर मार्मिक भाष्य, टिप्पणी केलेली असते. ती बघण्यासारखी असते.

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# कुस्तीशी नाते

**कुस्ती हा** आपल्याकडचा अस्सल देशी स्वरूपाचा लोकप्रिय मैदानी खेळ आहे. त्या खेळाशी संबंधित काही वाक्प्रचार वर्षानुवर्षे आपल्या भाषेत रूढ आहेत.

शड्डू ठोकणे हा त्यातलाच एक वाक्प्रचार आहे. शड्डू म्हणजे डावा हात कोपरापासून वर करून उजव्या हाताने काढलेला आवाज. शड्डू ठोकणे म्हणजे दंडावर किंवा मांडीवर हाताच्या खोंग्याने मारणे (खोंगा म्हणजे तळहाताचा पसा), दंड थोपटणे. या कृतीतून खेळाडूची ईर्षा व्यक्त होते. त्यामुळे याचा अर्थ 'आव्हान देणे' असा होतो. हा वाक्प्रचार विरोधकांना तोंड द्यायला सिद्ध असल्याची भावना व्यक्त करतो. त्यातून प्रतिकार करण्याची खुमखुमी लक्षात येते.

झोंबी घेणे ही कृतीदेखील वाक्प्रचार म्हणून वापरली जाते. प्रतिकूल परिस्थितीशी झुंज देणे, हा त्याचा अर्थ आहे. साहित्यिक आनंद यादव यांच्या आत्मचरित्राचे नाव 'झोंबी' असून त्यात त्यांनी शिक्षणासाठी बालपणी परिस्थितीशी केलेला संघर्ष वर्णन केला आहे.

धोबीपछाड, टांग मारणे हे कुस्तीमधले डावपेचदेखील नाट्यपूर्ण असल्यामुळे वाक्प्रचार म्हणून रूढ झाले आहेत. धोबीपछाड करणे म्हणजे प्रतिपक्षाला धुण्याच्या कपड्याप्रमाणे मागे नेऊन पुढे आपटणे होय! विरोधकांना पराभूत करण्याचा हा प्रकार राजकीय वार्तांकनात वाक्प्रचार म्हणून आजही स्थान मिळवतो!



टांग मारणे म्हणजे स्वतःच्या पायाने दुसऱ्याच्या पायावर मारून त्याला खाली पाडणे. याचा लक्ष्यार्थ 'फसवणे' असा आहे. हे वाक्प्रचार चित्रदर्शी असल्यामुळे मनावर ठसतात.

कुस्तीचा खेळ संपताना कोणाला तरी पराभूत व्हावे लागते. त्यातून 'चारी मुंड्या चीत करणे' हा वाक्प्रचार रूढ झाला आहे. याचा शब्दशः अर्थ असा आहे - कुस्तीत दोन खांदे आणि कमरेचे दोन खवाटे ( सांधे ) मिळून चार मुंड्या होतात. त्यापैकी प्रत्येक अवयव जमिनीला लागेल अशा प्रकारे जमिनीला पाठ लागणे. याचा लक्षणेने अर्थ आहे 'पूर्ण पराभव होणे'! गंमत म्हणजे या अवस्थेत पराभूत स्पर्धकाचे नाक वर राहाते! त्यामुळे 'नाक वर असणे' (म्हणजे खोटा दिमाख मिरवणे), हाही वाक्प्रचार तेथे अगदी शोभतोच!

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





# अकादमी आणि अनागोंदी

**अकादमी हा** शब्द मराठीत चांगलाच रुळला असून साहित्य अकादमी, ललित कला अकादमी, कर्नाटक संगीत अकादमी, संस्कृत अकादमी, विज्ञान अकादमी अशा विविध ठिकाणी तो वापरला जातो. शासन व्यवहारातही तो स्वीकारला गेला आहे. पण मुळात तो शब्द अॅकेडमी असा असून आपण त्याचे भारतीयीकरण केले आहे. ग्रीक भाषेतील या अॅकिडमी शब्दाची व्युत्पत्ती मोठी रोचक आहे. ग्रीसची राजधानी अथेन्स येथे अॅकेडमस नावाचा एक राजघराण्यातील माणूस राहत होता. अथेन्सजवळच त्याची एक मोठी बाग होती व तिला अॅकेडमिया, म्हणजे अॅकेडमसची बाग असेच म्हणत असत. याच बागेत प्लेटो हा विख्यात ग्रीक तत्त्वज्ञ आपल्या शिष्यांना शिकवत असे, त्यांच्याशी चर्चा करत असे. प्लेटोच्या निधनानंतरही त्या बागेत विद्वानांच्या चर्चा होत राहिल्या. त्यामुळे काळाच्या ओघात अॅकेडमिया या शब्दाला ज्ञान देणारी, सखोल अभ्यासाला मदत करणारी संस्था असा आज जगभर सर्वत्र अभिप्रेत असलेला अर्थ प्राप्त झाला.



अव्यवस्थित, बेशिस्त, गबाळग्रंथी कारभार जिथे असतो तिथे अनागोंदी माजली आहे असे आपण म्हणतो. कृ. पां. कुलकर्णी यांच्या ''मराठी व्युत्पत्ति कोश'' या विख्यात ग्रंथानुसार अनागोंदी (अन = हत्ती, गोंदी = गल्ली) हा मूळ कानडी शब्द असून कर्नाटकातील अनेगुंडी या गावावरून तो आला आहे. हम्पीपासून पाच किलोमीटरवर असलेले अनेगुंडी हे गाव इतिहासप्रसिद्ध आहे. एकेकाळी विजयनगर साम्राज्याची राजधानीही इथे होती. पण मुस्लीम सुलतानांनी एकत्र येऊन विजयनगरचा पाडाव केल्यानंतर अनेगुंडीची सगळी रया गेली. अनेक छोटे राजे तिथे अंमल करू लागले. त्यांची आर्थिक स्थिती अगदी खराब होती पण धार्मिक पूजापाठ, सण शक्य तितक्या इतमामात साजरे करायचा ते प्रयत्न करत. जुना लौकिक कायम राखण्यासाठी अशा सणवारांवर आपण खूप खर्च करतो असे ते कागदोपत्री ठेवलेल्या हिशेबांत दाखवत. मग त्यासाठी तेवढे उत्पन्नही दाखवावे लागे. सगळेच आकडे कमालीचे फुगवलेले व बोगस असत. त्यावरून पोकळ जमाखर्चाला व एकूणच पोकळ दिखावा असलेल्या कारभाराला अनागोंदी कारभार म्हटले जाऊ लागले. पुढे त्याचाच अर्थविस्तार होऊन बजबजपुरी असाही अर्थ 'अनागोंदी'ला प्राप्त झाला.

– भानू काळे
bhanukale@gmail.com





# तो नव्हे, 'ती' व्यक्ती व्यस्त नव्हे, 'व्यग्र' असते....

कांचन कराई द्वारा संकलित

**हे वाक्य** वाचा- तुम्ही ज्या व्यक्तीला भेटू इच्छिता, तो व्यक्ती सध्या गावाला गेला आहे.

मराठी भाषेत 'व्यक्ती' हा शब्द स्त्री लिंगी आहे. (व्यक्ती - नाम, स्त्री लिंगी, एकवचनी, व्यक्ती - अ. व.) म्हणजे व्यक्ती शब्दाचे अनेकवचनही 'व्यक्ती' असेच आहे. जसे, मला आतापर्यंत खूप व्यक्ती भेटून गेल्या. त्या मला आवडल्या. सार्वनामिक विशेषण - ती (स्त्री ए. व.) त्या (स्त्री. अ. व.) व्यक्ती शब्द कर्तरी प्रयोगात कर्ता असेल, तर क्रियापदावर त्याचा अधिकार असतो. याचा अर्थ - वाक्यातील क्रियापद कर्त्याच्या लिंग, वचनाप्रमाणे असते. वरील वाक्य असे हवे - तुम्ही ज्या व्यक्तीला भेटू इच्छिता. ती व्यक्ती सध्या गावाला गेली आहे. 'व्यक्ती' हा शब्द पुल्लिंगी वापरणे मराठी भाषेत अत्यंत चुकीचे आहे. एखाद्या पुरुषाच्या संदर्भात 'व्यक्ती' हा शब्द योजतानाही तो स्त्री लिंगीच वापरणे योग्य आहे. जसे 'मी वळून पाहिले, एक व्यक्ती माझ्या पाठीमागे उभी होती. मग लक्षात आले, की ती व्यक्ती म्हणजे माझा मित्रच होता.' मराठीत नामाच्या लिंग, वचन, पुरुष (प्रथम पुरुष- मी, आम्ही; द्वितीय पुरुष तू, तुम्ही, आपण; तृतीय पुरुष - तो, ती, ते इ.) यांना महत्त्व आहे. मराठी बोलताना व लिहितानाही 'तो व्यक्ती' हा प्रयोग करणे म्हणजे मराठी भाषेची आपणच केलेली चिरफाड होय.

आणखी एक वाक्य पाहा - 'माझा मित्र रमेश त्याच्या कामात इतका व्यस्त आहे, की त्याला भेटणे शक्य होणार नाही,'

कामात व्यस्त हा शब्दप्रयोग चुकीचा आहे. हिंदीच्या प्रभावामुळे आपण मराठीतले सोपे शब्द टाळून 'व्यस्त' या शब्दाचा चुकीचा वापर करतो. मराठीत कामात व्यग्र, गर्क, मग्न, तल्लीन, गुंग असे अनेक योग्य अर्थाचे शब्द आहेत. ते रूढ आहेत, असे असूनही 'व्यस्त' या शब्दाचा मराठीत अगदी वेगळा अर्थ असूनही तो का स्वीकारायचा? मराठीत 'सम'च्या विरुद्ध व्यस्त, विषम हे आहेत. सम म्हणजे दोनाने भागता येणारी (२, ४, ६, ८ इ.) आणि व्यस्त म्हणजे उलट्या, विपरीत क्रमाचा (३, ५, ७ इ.). असेही वाक्य आढळते - श्रीमंती आणि सुख यांचे प्रमाण व्यस्त असते. व्यस्त या शब्दात पुढील अर्थही अनुस्यूत आहेत. वेगळा, भिन्न, उलट्या, विपरीत क्रमाचा. हे अर्थ नाकारायचे आणि 'व्यस्त' शब्दाचा हिंदी भाषेतील गर्क, मग्न आणि मराठीत अगदी वेगळा असलेला अर्थ स्वीकारायचा आणि चुकीची वाक्यरचना करायची, याला अर्थ नाही. मराठी भाषेची अशी दुर्दशा आपण मराठी माणसेच करतो, हे दुर्दैव आहे.

**– यास्मिन शेख**

लोकसत्ता Mon, 31 January 2022
https://epaper.loksatta.com/c/65936237



**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# कासवीचे तूप, संसाराचे रूप...

**एका गावात** एका आचार्यांचा मठ होता. त्या आचार्यांचे नाव आनंदाचार्य. आपल्या आयुष्यात निरपेक्ष वृत्तीने काम करत राहणे, ही शिकवण ते गावकऱ्यांना देत असत. ते संसाराचे सार इतके सुंदर उलगडून सांगत असत की त्यांचे विचार आणि बोलणे ऐकतच राहावे असे वाटत असे. म्हणूनच की काय त्यांच्या व्याख्यानांना गर्दी होत असे. लोक भक्तिभावाने त्यांचे विचार ऐकत असत.

एकदा असेच प्रवचन चालू असताना आचार्य म्हणाले, ''स्वार्थ नको, परमार्थ साधना करा. संसाराची आसक्ती धरू नका. संसार नश्वर आहे. तो शाश्वत नाही. ती माया आहे. त्या संसारात गुरफटून जाऊन त्याच्या तात्कालिक सुखात गुंतून पडू नका. म्हणतात ना... 'कासवीचे तूप, संसाराचे रूप'...'' हे वाक्य ऐकल्यावर श्रोत्यांच्या चेहऱ्यावर मोठे प्रश्नचिन्ह उमटले. ते आचार्यांना स्पष्टपणे दिसले. आचार्य म्हणाले, ''नाही कळला ना याचा अर्थ ? ठीक आहे, मी फोड करून सांगतो. अरे ! अर्थ सोपा आहे. असं बघा, कासवी कधी दूध देते का ? नाही ना ? मग ती जर दूधच देत नाही तर त्या दुधाचे दही, ताक, लोणी कसे



होणार ? आणि लोणीच नाही तर तूप मिळणे लांबच ! म्हणूनच हे जसे शक्य नाही तसेच संसाराचे बाह्य, मोहमयी रूप कितीही मंथून काढलेत तरी त्यापासून मुक्तीचे नवनीत निघणे अशक्य आणि म्हणूनच मग प्राप्तीही दूरच राहणार ! संसार असार आहे. या दृष्टीने पाहायला हवा. 'कासवीचे तूप, संसाराचे रूप' या म्हणीप्रमाणे परमार्थ वृत्ती आचरत आचारत अनासक्त वृत्तीने जो संसारात जगतो, त्यालाच मुक्ती प्राप्त होते. हे सदैव लक्षात ठेवा.''

या म्हणीत खरोखर जीवनाचे सार सामावलेले आहे. जे 'नाहीच आहे' ते 'आहे' असे समजून त्याच्या मागे धावणे म्हणजे मृगजळाच्या मागे धावण्यासारखे आहे. लहानशीच म्हण, पण जीवनाचे तत्त्वज्ञान शिकवून जाणारी आहे. नाही का ?

**– डॉ. माधवी वैद्य**
madhavivaidya@ymail.com





# काय म्हणता अप्पा?

'**किती सुरेख** आहे गं दर्शनचित्र ! निळा वेश अगदी खुलून दिसतोय तुला.'

छान वाटलं ना मंडळी हे वाचल्यावर.

'काय म्हणताय ? बरेच दिवसांत संदेश नाही तुमचा.'

अशी विचारणा केल्यावर बरं वाटलं ना ?

एकमेकांची चौकशी, गप्पा आणि एकूणच संदेशवहनासाठी व्हॉट्सअप आणि इतर अनेक समाजमाध्यमं आपण सतत वापरतो. व्हॉट्सअपला 'काय अप्पा' असं मजेशीर पण सार्थ नाव कुणीतरी सुचवलं आहेच. छानच आहे ते. पण समजा, 'व्हॉट्सअप' हे विशेषनाम आहे, म्हणून त्याचं नाव बदललं नाही तरी त्या संदर्भातल्या इतर शब्दांना अनेक मराठी प्रतिशब्द नक्कीच सुचवता येतील. सुरुवातीला आल्याप्रमाणे डिस्प्ले पिक्चर म्हणजेच डीपीसाठी 'दर्शनचित्र', मेसेजसाठी 'संदेश', व्हिडीओकॉलसाठी 'दर्शभाष', फोटोसाठी 'प्रतिमा', 'छायाचित्र', 'प्रकाशचित्र', 'प्रचित्र' असे सुंदर अर्थवाही शब्द आहेतच. संदेश फॉरवर्ड म्हणजेच पुढे पाठवायला 'अग्रेषित', डिलिटसाठी 'पुसणे', 'खोडणे', 'काढून टाकणे', डिलिट फॉर ऑलसाठी 'सर्वांकडून पुसा' किंवा 'सर्वांकडून काढून टाका' असं म्हणता येईल. सेव्ह करणे यासाठी 'जतन करणे', शेअर करणे यासाठी 'पाठवणे', 'सामायिक करणे' हे शब्द कसे वाटतात ? स्क्रीनला 'पडदा' किंवा 'पट', स्क्रीन शॉटसाठी 'पट प्रतिमा' चपखल वाटतोय ना ? व्हॉट्सअप आल्यावर एक शब्द वारंवार वापरावा लागला तो म्हणजे चॅट. इंग्रजीत चॅट म्हणजे गप्पागोष्टी. मग या संदर्भात त्याला 'गप्पा' किंवा 'संदेशलेखन' असं म्हणू शकतो का ? नोटिफिकेशन हा एक असाच शब्द. त्याला फक्त सूचना म्हणावं तरी काहीतरी अपुरं असल्यासारखं वाटतं. मग 'सूचना संदेश' म्हटलं तर ? कॉमेंटला 'टिप्पणी', 'नोंद' असे संदर्भानुसार वापरता येईल. ग्रुपसाठी 'गट' किंवा 'समूह', ॲडमिनसाठी 'प्रशासक' हे शब्द आता बऱ्यापैकी रुळले आहेत. तंत्रज्ञान किंवा माध्यमांशी संबंधित अनेक शब्द य क्षेत्रातल्या क्रांतीसारखेच वेगाने आपल्याव आदळले. त्यामुळे याला मराठीत काय म्हणायचं असा विचार करण्यापूर्वीच आले तसे इंग्रजी शब्द रूढ होत गेले. पण अजूनही सर्वांनी जाणीवपूर्वक प्रयत्न केले तर आपण या क्षेत्रातही मराठी शब्द रुजवू शकतो, अशी मला आशा आहे.

तुम्हालाही आहे ना ?

**– वैशाली पेंडसे-कार्लेकर**

vaishali.karlekar1@gmail.com





 कांचन कराई द्वारा संकलित

# सँडविच

**सहजगत्या तयार** करता येणारा आणि आज घरोघरी खाल्ला जाणारा एक खाद्यप्रकार म्हणजे सँडविच. पावाच्या दोन तुकड्यांना लोणी फासले आणि मध्ये काकडी-टोमॅटो किंवा चीज असे काहीतरी घातले की झाले सँडविच तयार. रस्त्यावरच्या ठेल्यापासून पंचतारांकित हॉटेलापर्यंतही हा प्रकार सारखाच लोकप्रिय. तसा हा इंग्रजी शब्द असला तरी आता तो मराठी भाषेने आपल्यात सामावून घेतला आहे आणि त्याला कुठला प्रतिशब्दही मराठीत निर्माण केला गेल्याचे माझ्यातरी ऐकिवात नाही. 'दोघांच्या मधोमध सापडून आपण अडचणीत येणे, म्हणजेच आपले सँडविच होणे' या अर्थानेही तो कधी कधी वापरला जातो व इंग्रजी शब्दकोशात त्या अर्थानेही तो स्थिरावला आहे.



जेथून जगाला सँडविच हा पदार्थ मिळाला असे सांगितले जाते ते इंग्लंडमधील सँडविच हे गाव...

या शब्दाची व्युत्पत्ती मोठी मजेदार आहे. अठराव्या शतकात इंग्लंडमधील सँडविच नावाच्या गावी एक उमराव होऊन गेला. जॉन मॉंटेग्यू हे त्याचे नाव. त्याला पत्त्यांच्या जुगाराचा अतोनात नाद. असेच एकदा खेळत असताना त्याला खूप भूक लागली. पण जेवणासाठी खेळ थांबवून उठावे लागले असते. त्यामुळे त्याने आपल्या एका नोकराला बोलावले आणि 'मला इथल्या इथे बसून खाता येईल असे काहीतरी ताबडतोब घेऊन ये'' असे फर्मावले. लगेचच नोकर पावाच्या दोन तुकड्यांत बीफचा एक तुकडा घालून घेऊन आला. खेळातच दंग झालेल्या उमरावाने तो लगेच मट्ट केला. त्याचे बघून मग सोबत खेळणारे बाकीचे मित्रही तोच प्रकार खाऊ लागले. त्याकाळी उच्चभ्रू इंग्रज कुटुंबात काहीही खायचे म्हटले की प्लेट, काटे, चमचे, सुरी हे सारे लागायचे, पण हा प्रकार मात्र नुसताच हातात धरून खाता येत होता. त्याला तो आवडला व तो उमरावच असल्याने आजूबाजूच्या गावांतही तो पदार्थ सँडविच याच नावाने पसरला. एखादे सँडविच आणि सोबत कोक किंवा कॉफी हा मेन्यू आज जगभर लोकप्रिय आहे आणि मराठीप्रमाणेच इतरही भाषांनी सँडविच हा शब्द आपला म्हणून स्वीकारला आहे.

– भानू काळे

bhanukale@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# (१) विशेषणांचा क्रम (२) 'ऊन' प्रत्ययाचा भ्रम...

घेऊन खाऊन जाऊन धावून जेवून कावून

(१) शब्दक्रम : हे वाक्य वाचा- 'आमच्या पन्नासाव्या लग्नाच्या वाढदिवसाला तुम्ही सर्वांनी यायचं, बरं का!' या वाक्यात 'पन्नासाव्या' हे विशेषण 'लग्नाच्या' या शब्दाआधी आल्यामुळे या वाक्याचा अर्थ असा होईल- 'आमची पन्नास लग्नं झाली आहेत, या पन्नासाव्या लग्नाचा आज वाढदिवस आहे, त्या समारंभाला तुम्ही सर्वांनी यायचं.' हा अर्थ म्हणजे अनर्थच होय! केवळ विशेषण चुकीच्या ठिकाणी योजल्यामुळे विपरित अर्थ झाला आहे. अशीच एक वाक्यरचना पाहा- 'आमचे प्राध्यापक उत्तम कविता शिकवतात.' याचा अर्थ कविता उत्तम आहेत, त्या प्राध्यापक शिकवतात. कविता उत्तम की निकृष्ट हे सांगायचे नाही, तर प्राध्यापक कविता उत्तम शिकवतात, त्यांचे कविता शिकवणे उत्तम आहे. ही दोन्ही वाक्ये अशा योग्य शब्दक्रमात अशी आहेत- 'आमच्या लग्नाच्या पन्नासाव्या वाढदिवसाला तुम्ही सर्वांनी यायचं बरं का!' आणि दुसरे वाक्य, 'आमचे प्राध्यापक कविता उत्तम शिकवतात'. वाक्यांत ज्या नामाचे (म्हणजे विशेष्याचे) विशेषण असेल, ते त्या नामाआधी योजणे आवश्यक असते. बोलताना जरी शब्दक्रमात गडबड झाली तरी लेखनात मात्र योग्य शब्दक्रम योजणे आवश्यक आहे.

(२) मराठीतील एकाक्षरी धातूंना ऊन प्रत्यय लागल्यास त्याची रूपे अनेकदा चुकीची बोलली आणि लिहिलीही जातात. एकाक्षरी धातू- खा(खाणे), गा, जा, भी, पी, घे, दे, ने, ये, धू इत्यादी. या धातूंना 'ऊन' प्रत्यय लागल्यास अशी योग्य रूपे होतील- खाऊन, गाऊन, जाऊन, भिऊन, पिऊन, घेऊन, देऊन, नेऊन, येऊन, धुऊन. मात्र याऐवजी- खावून, गावून, जावून इ. अशी रूपे बोलण्यात- लिहिण्यात आढळतात. ही रूपे चुकीची आहेत. याउलट जेव(णे), पाव, धाव इत्यादींना 'ऊन' प्रत्यय लागल्यास जेवून, पावून, धावून अशी रूपे होतील. जेऊन, पाऊन, धाऊन अशी होणार नाहीत.

– यास्मिन शेख

भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# काजल्याला फळे आणि दुबळ्याला बाळे...

**काजला म्हणजे** कुचला...

हा कोकणात आढळणारा वृक्ष आहे. हा वृक्ष तसा निरुपयोगी असतो कारण त्याची फळे खूप कडू असतात. त्यामुळे भरपूर फळे येऊनसुद्धा ती फळे आणि ते झाडही दुर्लक्षितच राहते...

माझ्या घराजवळ एक नवीन बांधकाम सुरू झाले होते. तिथे एक रखवालदार रुजू झाला. एकटाच होता. तसा गरीब, प्रामाणिक होता.

त्याला सहजच विचारले, ''तुझी घरवाली कुठे आहे ?''

त्याने संकोचतच उत्तर दिले, ''बाईजी। ती गावीच आहे. बच्चा पैदा होनेवाला है।''

त्याला विचारले, ''अरे वा ! नयी नयी शादी हुई लगती है तुम्हारी, पहेला बच्चा होगा ना? आप क्यूं नहीं ठहरे उस के साथ?''

तो म्हणाला, ''बाईजी। पहला कहाँ... ये तीसरा है। उससे पहलेवाले दो है। छोटी उमर में शादी हुई...। फिर हर साल एकेक बच्चा पैदा हुआ। अब सोच रहा हूँ, इन लोगों का पालन करना मुझसे कैसा होगा। मैं कर सकूंगा की नहीं, एक वो भगवानही जाने।''

मलाही असेच वाटले, याच्याजवळ ना शिक्षण, ना पैसा, याला ना कोणी मदत करणारे? काय करणार हा?

किती लोक असे असतील! ज्यांच्या जवळ ज्ञान नाही, अज्ञानाचा अंधार असेल! ना स्वतःचा विचार, ना बायकोचा विचार, ना मुलांचा! ही मुलं जन्माला घातली खरी पण यांचे पालनपोषण? त्यांना अन्न, वस्त्र, निवारा, जीवनातले स्वास्थ्य? ते कोण पुरवणार? म्हणजे मुले जन्मालाच घालू नयेत असे नाही पण त्यांची योग्य देखभाल करणे हेही आई-वडिलांचे कर्तव्य आहे ना!

आज परिस्थिती बदलते आहे. योग्यायोग्यतेचा सारासार विचार करूनच मुलांना जन्म देण्याचे दिवस आले आहेत. नाहीतर ओघानेच म्हणावे लागेल, ''काजल्याला फळे आणि दुबळ्याला बाळे'' हेच खरे.

- माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com





# तुका म्हणे काय करावी ती बत्तीस लक्षणे...

कांचन कराई द्वारा संकलित

**वाक्प्रचारांमध्ये कधी** कधी गणिती भाषेचा मार्मिकपणे उपयोग केलेला आढळतो. अशा वाक्प्रचारांमध्ये योजलेल्या विशिष्ट संख्यांमागचे संकेत, श्रीधर हणमंते यांच्या संकेतकोशामधून उलगडले की त्यांची अर्थपूर्णता लक्षात येते. याची ही उदाहरणे आहेत.

**बत्तीसलक्षणी पुतळे :** एकोणिसाव्या शतकातील लेखिका ताराबाई शिंदे यांचे 'स्त्रीपुरुषतुलना' हे पुस्तक प्रसिद्ध आहे. त्यात त्यांनी एके ठिकाणी पुरुषांना उद्देशून म्हटले आहे, 'तुम्ही मोठे कलमबहादर... बत्तीसलक्षणी पुतळे आहात!' यातील 'बत्तीसलक्षणी पुतळे' हा वाक्प्रचार त्यातील संख्येमुळे वाचकांना कोड्यात टाकतो. त्यात पुरुषाच्या शरीराची ३२ शुभलक्षणे गृहीत धरली आहेत. शरीरातील विशिष्ट अवयवांची स्थिती कशी असावी, हे त्या ३२ शुभलक्षणांमध्ये अभिप्रेत आहे. उदा. सात ठिकाणे आरक्त असावी, जसे की हाताचे तळवे, पायाचे तळवे, अधरोष्ठ, नेत्र, तालु, जीभ आणि नखे. अशी वेगवगळी ३२ शुभलक्षणे एका श्लोकात वर्णन केली आहेत. त्यामुळे बत्तीसलक्षणी म्हणजे शब्दशः अर्थ सर्वगुणसंपन्न! मात्र वाक्प्रचारात त्याचा वापर उपरोधाने केला जातो.

**नाकीनऊ येणे :** हा वाक्प्रचार आजही आपण वापरतो. प्रकाश संत यांच्या कथेतल्या छोट्या लंपनचे एक वाक्य लक्षात आहे. ते असे : 'माझ्या नाकीनऊच काय, नऊशे नव्याण्णव येतात !' तेव्हा त्यातील विनोद कळण्यासाठी मूळ वाक्प्रचारातील नऊ या संख्येमागचे संकेत माहीत असावे लागतात. मानवी शरीराला नऊ द्वारे आहेत. ती अशी : दोन डोळे, दोन कान, दोन नाकपुड्या, एक तोंड, एक गुदद्वार, एक मूत्रद्वार. या नऊ द्वारांशी असणारे प्राण नाकात आले की अंतकाळ समीप येतो. त्यामुळे 'नाकीनऊ येणे' या वाक्प्रचाराचा लाक्षणिक अर्थ 'अतिशय कष्ट पडणे', असा होतो. 'नऊ' याऐवजी 'नव', 'नळ' असेही पाठभेद आढळतात. महात्मा फुले यांनी 'कुणब्यांची वास्तविक स्थिती' या लेखात 'नाकी नळ येणे' असा वाक्प्रचार योजला आहे. या वाक्प्रचारातून मुख्यतः नाकाचे - श्वसनेंद्रियाचे - महत्त्व लक्षात येते. संत तुकाराम म्हणतातच, 'तुका म्हणे काय करावी ती बत्तीस लक्षणे, नाक नाही तेणे वाया गेली!'

**– डॉ. नीलिमा गुंडी**
nmgundi@gmail.com





# संगणकावर मराठी !

**माहिती तंत्रज्ञानाचे** युग आलं आणि नवीन तांत्रिक अवजारे, संकल्पना आपण आनंदाने स्वीकारल्या. कारण अद्ययावत राहावंच लागतं. भाषा असो वा समाज, परिवर्तनशीलता हा दोघांचाही विशेष गुणधर्म आहे. टेलिफोन आला तेव्हा दूरध्वनी, टीव्ही आला त्याला दूरचित्रवाणी, कॉम्प्युटरला संगणक, कॅल्क्युलेटरला परिगणक वा गणकयंत्र हे शब्द बऱ्यापैकी रुळले. मोबाइलला चलभाष, भ्रमणध्वनी, भाषाट, चलध्वनी, सहध्वनी असे पर्यायी शब्द सुचविले गेले, मात्र 'भ्रमणध्वनी' हा शब्द समाजाने स्वीकारलेला दिसतो. कोणते शब्द स्वीकारायचे, ठेवायचे या बाबतीत भाषा यादृच्छिक असते म्हणजे त्या त्या समाजाच्या इच्छेनुसार शब्द स्वीकारले वा विसर्जित केले जातात. यापुढे संगणकविषयक काही शब्द थेट मराठीतून लिहिणार आहे. त्याचे इंग्रजी पर्यायी शब्द तुमच्या मनात आपोआप उमटतील. परंतु यानंतर परत वापरताना हे शब्द पर्याय म्हणून उपयोगी येतील. संकेतस्थळांवरून अनेक पुस्तके विनामूल्य उतरवून घेता येतात. आपले ई-टपालाचे/ई-पत्रासाठी ई-पत्ते देता येऊ शकतात. संगणकात धारिका जोडता येते, दुवा पाठवता येतो, संगणकावर मराठीत लिहिणे वाचणे शक्य करणारे अनेक टंक बाजारात उपलब्ध आहेत. हुडक्यांचा वापर करून माहिती हुडकणे सहज शक्य असते. विविध संकेतस्थळे पाहता येतात. कळपाटावरील कळा दाबून आपल्याला हव्या त्या लिपिखुणा आपण पडद्यावर उमटवू शकतो. आपण धारिका, सारणी किंवा सादरीकरण तयार करू शकतो. महाजालावर गप्पागोष्टी, अनुदिनी, संकेतस्थळे या सोयी सहज वापरता येतात. अनेक संकेत प्रणाल्या या संगणकाच्या कार्यकारी प्रणालीबरोबरच विनामूल्य मिळतात. संगणकातील खुणांवर टिकटिकवता येते. अनेकदा जी चौकट उघडते त्यावर बाण सरकविता येतो. काही कार्यकारी प्रणालीच्या आवृत्त्यांच्या चकत्या वापराव्या लागतात. या चकतीच्या खणात घालून हवा तो मजकूर उतरून घेता येतो. छोटी धारिका असेल तर चकतीऐवजी संवाहकाद्वारे उतरून घेता येते. संवाहकातील धारिका संगणकावर चढवताही येते. युनिकोड प्रणाली घेतली की आज-काल तळपट्टीवर उजवीकडे भाषांच्या खुणा येतात त्यातील टअ अशी खूण येते ती निवडली की पडद्यावर मराठी अक्षरे उमटू लागतात. भाषा मराठी आणि लिपी रोमन या वापराऐवजी देवनागरीची गंमत वेगळीच आहे. हे वापरून बघाच !

– डॉ. निधी पटवर्धन
nidheepatwardhan@gmail.com





# हाऊसफुल्ल

**सकृद्दर्शनी इंग्रजी** भासणाऱ्या आणि आज देशभर प्रचलित असलेल्या या शब्दाचे जनक आपलेच एक मराठी बांधव आहेत. ते आहेत समतानंद अनंत हरी गद्रे. आपल्या आयुष्यात पत्रकारितेपासून ते समाजसुधारकापर्यंत जे अनेक व्यवसाय गद्रे यांनी केले, त्यांतील एक म्हणजे जाहिराती करणे. सोहराब मोदी या त्या काळात खूप दबदबा असलेल्या नाट्य-चित्रनिर्मात्याचे जाहिरातीचे सगळे काम ते सांभाळत असत. 'साष्टांग नमस्कार'नंतर पुढल्याच वर्षी, म्हणजे १९३४ साली, 'घराबाहेर' हे आपले पुढचे नाटक अत्रेंनी लिहिले व त्याच्या जाहिरातीची जबाबदारी गद्रे यांच्यावर सोपवली. 'घराबाहेर'ने लोकप्रियतेचा कळस गाठला.

सलग चार महिने गिरगावातील 'रॉयल ऑपिरा हाऊस' इथे त्याचे प्रयोग झाले. त्याकाळी तिथे चित्रपट नाही तर फक्त नाटकेच व्हायची. हे नाटक तसे मोठे होते, साडेचार तास चालणारे होते. पण प्रेक्षक अगदी तल्लीन होऊन बघत. एका रविवारी त्या नाटकाचे थेट नाट्यगृहातून इंडियन ब्रॉडकास्टिंग कंपनीने 'आकाशवाणी'वरून प्रक्षेपण केले. तोपर्यंत कुठल्याही मराठी नाटकाचे आकाशवाणीवरून असे थेट प्रक्षेपण झाले नव्हते.

'घराबाहेर'ची गद्रे यांनी केलेली जाहिरात मोठी आकर्षक होती. त्यांनी लिहिले होते :

'सगळी मुंबई घराबाहेर पडली. का? ऑपिरा हाऊसमध्ये अत्र्यांचे घराबाहेर नाटक पाहण्यासाठी.'

याच नाटकाची जाहिरात छापताना त्यांनी 'हाऊसफुल्ल' हा शब्दप्रयोग प्रथम केला.

रॉयल ऑपिरा हाऊस या नावातील 'हाऊस' हा शब्द आणि ते पूर्ण भरलेले म्हणून 'फुल्ल' हा ('ल'ला 'ल') शब्द त्यांनी एकत्र आणला. न्यूयॉर्कच्या ब्रॉडवेवर किंवा लंडनच्या वेस्ट-एन्डवर तेव्हा 'टिकेट्स सोल्ड' असे म्हणायचा प्रघात होता. हाऊसफुल्ल शब्द मग इतरांनीही उचलून धरला. आज सगळ्याच भारतीय भाषांत वापरला जाणारा हा शब्द मुळात अनंतरावांचा.

'बेफाट', 'दणदणीत', 'खणखणीत', 'तडाखेबंद' हे नाटक-सिनेमाच्या जाहिरातीत आज सर्रास वापरले जाणारे शब्द हीदेखील त्यांचीच देणगी. आपल्या 'निर्भीड' या लोकप्रिय साप्ताहिकात त्यांनी या नाटकाविषयीच्या बातम्या सतत छापल्या. नाटकाचे स्वतः विस्तृत परीक्षण केले.

या साप्ताहिकाचा 'घराबाहेर विशेषांक'देखील त्यांनी काढला. 'घराबाहेर'च्या प्रचंड यशाने भारावून गेलेल्या अत्रेंनी आपल्या 'कऱ्हेचे पाणी' या आत्मचरित्रात त्या यशाचे खूप मोठे श्रेय अनंतरावांना दिले आणि त्यांना 'जाहिरात-जनार्दन' ही उपाधी बहाल केली.

**– भानू काळे,** bhanukale@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# ‘वाट’ आणि ‘वाटा’

(१) **केव्हा केव्हा** आपण शब्दाचा अर्थ लक्षात न घेताच त्याचा वाक्यात उपयोग करतो. योग्य शब्द उपलब्ध असूनही आपण चुकीच्या शब्दाची योजना करतो, त्यामुळे वाक्याच्या अर्थात चूक होते.

हे वाक्य वाचा- ‘माझ्या वाट्याला जाऊ नकोस. तसं केलंस तर गाठ माझ्याशी आहे.’ या वाक्यातील वाट्याला या विभक्तियुक्त शब्दाचे मूळ रूप आहे वाटा- (सामान्य नाम, पुल्लिंगी, एकवचन). या शब्दाचा अर्थ आहे- वाटा- हिस्सा, भाग, एखाद्या गोष्टीतील मिळणारा भाग. या शब्दाचे अनेकवचन- वाटे (पु.अ.व.). वाटा या शब्दाचा योग्य वापर पुढील वाक्यात पाहा- ‘माझ्या वडिलांच्या संपत्तीतील माझा वाटा (हिस्सा) मला मिळायला हवा.’

एखाद्याच्या वाटेला (वाटेस) जाणे हा मराठीतील एक वाक्प्रचार आहे. वाट- (नाम, स्त्रीलिंगी, एकवचन)- अर्थ लहान मार्ग, रस्ता. या वाक्प्रचाराचा अर्थ आहे- एखादा ज्या पद्धतीने काम करीत असेल, त्यात त्याला त्रास देण्याचा प्रयत्न करणे, त्याच्या कामात अडथळा आणणे किंवा अडचणी निर्माण करणे. ‘वाटेस जाणे’ याचा ‘कुरापत काढणे’ असाही अर्थ आहे. वाट या शब्दाचे अनेकवचन वाटा (स्त्रीलिंगी) असे आहे. विभक्तिप्रत्यय लागल्यास वाट- वाटेला, वाटा- वाटांना असे होईल. हे वाक्य असे हवे- माझ्या वाटेला जाऊ नकोस, तसं केलंस तर गाठ माझ्याशी आहे.

वरील वाक्यात ‘एखाद्याच्या वाट्यास जाणे’ हा शब्दप्रयोग चुकीचा आहे, हे आपल्या लक्षात येईल.

# मुद्द्यात ‘द्द’ द्या

(२) काही शब्द आपण बरोबर उच्चारतो, बोलताना चूक होत नाही, पण लेखनात त्या शब्दाचे चुकीचे रूप अनेकदा आढळते. विशेषतः काही शब्दांचे एकवचनी रूप बरोबर लिहिलेले असते, पण त्या शब्दांत विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय लागल्यास लेखनात चूक होते. उदा. मुद्दा, गुद्दा हे शब्द. या शब्दांचे उच्चार आणि लेखनही बिनचूक होते. पण मुद्दा-मुद्याचा, गुद्दा-गुद्यामुळे अशी चुकीची रूपे लेखनात आढळतात. मुद्दा (द् द् आ), मुद्याचा (द् य आ), तसेच गुद्दा- (द् द् आ), गुद्यामुळे (द् य आ). खरे पाहता, या शब्दांचे लेखन असे हवे- मुद्द्याचा, गुद्द्यामुळे- द् द् या= द्द्या.

**– यास्मिन शेख**





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# टाया पिटीसनी देव भेटत नाही...

**खान्देशच्या प्रतिभावान** कवयित्री बहिणाबाई चौधरी यांच्या काव्यपंक्ती आज त्यांनी रचलेली 'म्हण' म्हणून मान्यता पावलेल्या आहेत. बहिणाबाई चौधरी या सिद्धहस्त कवयित्री. ज्यांनी आपल्या प्रतिभेने उजळलेले अनमोल काव्यधन मराठी कवितेसाठी दिले. त्या स्वतः शिकलेल्या नव्हत्या. पण त्यांची काव्यरचना चिरंतन मानवी मूल्यांची शिकवण देणारी आहे. सकाळी सकाळी अंगणात मनोहारी प्राजक्तसडा पडावा तशी सहज, सुंदर त्यांची काव्य निर्मिती ! त्यांची काव्यरचना जीवनातील विसंगतीवर मार्मिक भाष्य करते. 'पाहीसनी रे लोकांचे यवहार खोटे नाटे, तवा बोरी बाभयीच्या अंगावर आले काटे' असं त्या अगदी सहज म्हणू शकतात.

अशीच मानवी व्यवहारावर मार्मिक टिप्पणी करणारी म्हण आहे : 'आग्या टाकीसनी चूय पेटत नाही, टाया पिटीसनी देव भेटत नाही.'

'आग्या' म्हणजे 'काजवा'. जर चूल पेटवायची असेल तर तिथे विस्तवच हवा. काजवे टाकून काही चूल पेटणार नाही. चूल पेटवायची असेल तर त्याला आगीची योग्य धगच लागते. तसेच रोज नुसत्या टाळ्या पिटून काही देवाची प्राप्ती होणार नाही. त्याच्या प्राप्तीसाठी साधना आणि तपश्चर्येची जोड असावी लागते. म्हणजेच कोणत्याही गोष्टीची प्राप्ती करून घ्यायची असेल, तर प्रथम ती गोष्ट प्राप्त व्हावी म्हणून आवश्यक असणारी मनाची तीव्र आच, इच्छा आणि योग्य दिशेने प्रयत्न करणे खूप महत्त्वाचे आहे.



आपण असे समजतो की सर्व संतांना परमेश्वराचे, त्या जगन्नियंत्याचे दर्शन झाले होते. त्यांना परमेश्वराचा साक्षात्कार झाला होता. ते परमेश्वराशी बोलू शकत होते. नामदेवांनी विठ्ठलाला नैवेद्य ग्रहण करण्याचा हट्ट धरला होता आणि विठ्ठलाला तो नैवेद्य ग्रहण करायला भाग पाडले होते. या सर्वांच्या प्रयत्नामागे ईश्वराला भेटण्याची तीव्र मनीषा, त्याच्या प्राप्तीसाठी करायला लागणारी साधना, तपश्चर्या, जनहिताचा खरा कळवळा, सारे त्यांच्या पाठीशी उभे होते. पण त्यांचे विरोधक मात्र फक्त कर्मकांडात आणि बाह्य देखाव्यात गुंतलेले होते. त्यांना हे खरे तर कळायला हवे होते की 'आग्या टाकीसनी चूय (चूल) पेटत नाही अन् टाया (टाळ्या) पिटीसनी देव भेटत नाही.'

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# नादसंपन्न वाक्प्रचार

**वाक्प्रचारांमध्ये आशयाइतकीच** अभिव्यक्तीही महत्त्वाची असते. नाद हा भाषेचा गुण प्रभावीपणे वापरल्यामुळे काही वाक्प्रचारांमध्ये बोलण्याचा ठसका कसा येतो, याची उदाहरणे पाहू या!

'दाणादाण उडणे' या वाक्प्रचारात 'दाणा' हा शब्द मुख्य आहे. दाणे टाकून कोंबडी झुंजवण्याचा खेळ खेळला जातो. त्या वेळी दाणे टिपण्यासाठी कोंबड्यांची धावपळ होते, त्यांची अस्वस्थता वाढते. त्यातून प्रचारात आलेला हा वाक्प्रचार आहे. त्यातून 'पांगापांग, वाताहत, गोंधळाची स्थिती' असा अर्थ व्यक्त होतो. विशेषतः लढाईत सेनापती पडल्यानंतर सैनिक सैरावैरा पळू लागतात, तेव्हा 'सैन्याची दाणादाण उडली'; असे म्हणतात. हा वाक्प्रचार आपण रोजच्या व्यवहारात होणाऱ्या धावपळीसाठीही वापरत असतो. उदा. एका बालकवितेत भित्री खारुताई दिवाळीच्या रात्री एकटी निघाली, तेव्हा 'तिकडून आला बाण, खारुताईची उडली दाणादाण' अशी ओळ येते. ती ओळ ऐकली की लहान मुले खारुताईच्या पळापळीच्या कल्पनेने जशी हसतात, तशीच 'दाणादाण' या शब्दातल्या अनुप्रासाला दाद देऊनही हसतात!

'अकांडतांडव करणे' या वाक्प्रचारात 'अकांड' आणि 'तांडव' हे दोन शब्द नादातून जणू ओवले गेले आहेत! अकांड म्हणजे अकाली आणि तांडव हे आपल्याकडच्या प्राचीन नृत्य प्रकाराचे नाव आहे. शंकराच्या नृत्याला तांडव असे म्हणतात. हे नृत्य मोठे जोशपूर्ण, क्रोधपूर्ण असते, प्रलयंकारी असते! त्यामुळे अकांडतांडव करणे म्हणजे अकारण आरडाओरडा करणे, उगाचच मोठा गहजब करणे होय! उदाहरणार्थ, 'भाजीत जरा मीठ जास्त झाले की मामंजी अकांडतांडव करीत असत;' असे वाक्य जुन्या काळच्या स्त्रियांच्या लेखनात आढळणे शक्य आहे! यातल्या नादवलयामुळे वाक्प्रचाराच्या अर्थाला वजन येते आणि बोलण्यालाही धार येते !

असे नादयुक्त वाक्प्रचार आणखीही आठवतील! उदा. हपापाचा माल गपापा (अन्यायाने मिळवलेली वस्तू टिकत नाही), हमरीतुमरीवर येणे (एकेरीवर येणे, जोराने भांडण सुरू करणे), अद्वातद्वा करणे (असंबद्ध बोलणे), अळंटळं करणे (कामचुकारपणा करणे) इत्यादी. असे इतर वाक्प्रचारही त्यातील द्विरुक्तीमुळे ठसठशीत वाटतात. अशा वेळी वाक्प्रचार हे 'भाषेचे अलंकार' असतात, याची खात्रीच पटते!

**– डॉ. नीलिमा गुंडी**
nmgundi@gmail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# प्रकाशनविश्वात मराठी

''**मुद्रित ... ? आणि** पुढे काय म्हणालीस तू?'' माझी एक वयाने आणि अनुभवाने ज्येष्ठ मैत्रीण मला विचारत होती.

तिला 'मुद्रितशोधन' हा शब्द कळला नव्हता. अर्थात सध्या प्रकाशन क्षेत्रात वावरणाऱ्या अनेकांनासुद्धा कदाचित हा शब्द नवा असू शकतो. तिने मात्र हा शब्द कळल्यावर जाणीवपूर्वक वापरायला सुरुवात केली ही जमेची गोष्ट.

प्रूफं, कॉपी, प्रूफरीडिंग, प्रिंटिंग, प्रेस हे शब्द अनेक वर्षं प्रकाशन क्षेत्रात रुळले आहेत. त्याचबरोबर 'मुद्रितं' किंवा 'छापील प्रत', 'मुद्रितशोधन', 'छपाई', 'छापखाना' किंवा 'मुद्रणालय' हे शब्दही काही जण आजही वापरतात. पण त्यातल्या त्यात लिखाणात हे शब्द मोठ्या प्रमाणात वापरले जातात आणि बोलण्यातून मात्र हे मराठी शब्द गायब झाल्याचं जाणवतं.

पुस्तकांसंदर्भात 'मुखपृष्ठ', 'मलपृष्ठ' किंवा 'पाठपृष्ठ' हे शब्द वापरले जातात. मुखपृष्ठाच्या आत लगेच येणाऱ्या टायटल पेजसाठी 'शीर्षपान', 'शीर्षकपान', इम्प्रिंटसाठी 'प्रकाशनठसा', 'प्रकाशनमुद्रा' असे शब्द सुचवता येतील, तर कॉपीराइटसाठी 'प्रताधिकार' हा शब्द वापरात आहे. पुस्तकाच्या पाठपृष्ठावर लिहिलेल्या ब्लर्बला 'प्रशस्ती' म्हणणं प्रशस्त वाटतं का? नाही तर 'पुस्तकओळख' असंही म्हणता येईल.

लेआऊटसाठी 'रचना', 'मांडणी', फॉन्टसाठी 'टंक', 'मुद्राक्षरे', टायपिंगसाठी 'टंकन', 'अक्षरजुळणी' असे अर्थवाही शब्द आहेत. इंट्रोसाठी 'परिचयओळी', फोटोकॅप्शनला 'चित्रओळ' म्हणता येईल.

'डेडलाइन'चा ताण सर्वांनाच असतो. तो 'कालमर्यादा' या शब्दाने जाणवतोच, पण 'डेड'मधली भीती आणायची असेल तर 'काळ'मर्यादा म्हणावे का? फाइलसाठी 'धारिका' म्हटलं जातं.

पीडीएफसाठी 'बंदिस्त धारिका' वाचनात आलं आणि अगदी आवडलं. पुस्तक वाचताना 'पुस्तकातली खूण' आठवून देणारं 'खूणपत्र' किंवा 'वाचनखूण' हे बुकमार्कला पर्याय ठरू शकतात.

हे सदर सुरू झाल्यावर अनेकांनी हे पर्यायी मराठी शब्द पुढे आणण्याचं स्वागत केलं, तर काहींच्या मनात काही प्रश्न आले. पर्यायी मराठी शब्द उच्चारायला 'जड' आहेत' असं काहींना वाटलं. पण खरं तर भाषेच्या किंवा भाषकांच्या दृष्टीने एखादा शब्द 'जड' नसतो. तुलना केलीच तर अनेक इंग्रजी शब्द उच्चारायला 'जड' असले तरी आपण ते बोलतो. त्यामुळे फक्त गरज आहे ती मराठी शब्द प्रतिष्ठापूर्वक स्वीकारून त्यांना दैनंदिन व्यवहारात वापरण्याच्या इच्छाशक्तीची.

– वैशाली पेंडसे-कार्लेकर
vaishali.karlekar1@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# डाडा ते डालडा

**अलीकडे डालडा** आरोग्याला हानिकारक मानला जातो, पण एकेकाळी हिरव्या पामवृक्षाचे चित्र असलेला पिवळ्या रंगाचा डालड्याचा डबा घरोघर असायचा. दुधापासून बनणाऱ्या साजूक तुपाला तुलनेने अतिशय स्वस्त असा वनस्पतीजन्य पर्याय म्हणून. पुऱ्या असोत की जिलब्या, चिरोटे असोत की करंज्या, शिरा असो की साबुदाण्याची खिचडी; डालडा हवाच. अगदी उपासालादेखील डालडा चालायचा.

डालडा या शब्दाची जन्मकथा खूप रोचक आहे. तांत्रिक किचकटपणा टाळून सांगायचे तर डालडा म्हणजे वनस्पती तेलात, मुख्यतः पामवृक्षाच्या तेलात, हायड्रोजन वायू मिसळून त्या तेलाचे घनीकरण केलेला पदार्थ. हे महत्त्वाचे संशोधन एका फ्रेंच शास्त्रज्ञाचे. त्या शोधाबद्दल त्याला नोबेल पुरस्कारदेखील मिळाला होता. पुढे ते संशोधन डाडा नावाच्या डच कंपनीने विकत घेतले व 'डाडा' याच नावाने युरोपात आणले. कासिम दादा हे व्यापारी (ज्यांच्या आडनावाचे स्पेलिंगही योगायोगाने तेच होते) त्याची भारतात आयात करत. त्या दोघांकडून या उत्पादनाचे हक्क लिव्हर ब्रदर्स (आत्ताची युनिलिव्हर) या तत्कालीन इंग्लिश कंपनीने विकत घेतले. तुपाचा, आणि एकूणच दुधाचा, प्रचंड तुटवडा असलेल्या भारतात या उत्पादनाला खूप मागणी असेल याची त्यांना खात्री होती. त्यासाठी त्यांनी मुंबईत शिवडी येथे कारखाना उभारला. हे




उत्पादन विकत घेताना त्याच्या नावात 'डाडा' ही अक्षरे कायम राहतील अशी अट होती; पण त्यातून पळवाट काढत लिव्हरने 'डाडा' या दोन अक्षरांमध्ये लिव्हरमधील 'ल' वाढवला. डाडाचे डालडा केले. अर्थात अशा प्रकारे, की 'एल' या इंग्रजी अक्षरातील उभी रेघ म्हणजे पॅकिंगमधील पामवृक्षाच्या खोडाचाच भाग वाटेल!

लिंटास या त्यांच्या जाहिरात कंपनीचे हार्वे डंकन यांनी १९३९ साली डालड्यासाठी भारतात अभूतपूर्व अशी मल्टिमीडिया जाहिरात मोहीम राबवली. ती मोहीम म्हणजे जाहिरात क्षेत्रातील एक चमत्कार मानला गेला. प्रत्यक्ष पदार्थाइतकीच त्याचे पत्र्याच्या पिवळ्या डब्यातील पॅकिंग हीदेखील एक लोकप्रिय वस्तू ठरली. डालड्याचा डबा हाही जणू एक ब्रॅण्ड बनला! डालड्याला पुढे अनेक आक्षेप घेतले गेले आणि आज डालड्याला अनेक आरोग्यस्नेही पर्याय आहेत, पण तत्पूर्वी जवळपास ५० वर्षे वनस्पती तुपाच्या बाजारपेठेवर डालड्याने निरंकुश राज्य केले. मराठीत वनस्पती तुपासाठीअनेक वर्षे डालडा हाच शब्द वापरला जात होता. ला.

– भानू काळे
bhanukale@gmail.com





# (१) माझी मदत/ मला मदत (२) जोडून की तोडून

**हे वाक्य** वाचा :

''मला थोडे पैसे हवेत. मित्रा, माझी मदत कर.''

हिंदीच्या प्रभावाने अनेकदा आपण आपल्या भाषेतील वाक्यरचनेची मोडतोड करतो. हिंदीतील काही शब्द मराठीने स्वीकारले आहेत, त्याबद्दल तक्रार नाही. भाषासमृद्धीसाठी प्रत्येक भाषेत इतर भाषांतील शब्द स्वीकारले जातात. परंतु आपल्या भाषेतील वाक्यरचनेत इतर भाषांची घुसखोरी करणे आणि आपली वाक्यरचना नाकारणे म्हणजे आपणच आपल्या मातृभाषेवर अन्याय करणे. हा अन्याय मराठी भाषकांना सहज दूर करता येईल.

वरील वाक्यात 'माझी मदत कर' या वाक्यरचनेवर



याच नव्हे, पण अनेक मराठी चित्रवाणी मालिकांतून 'माझी मदत' सर्रास ऐकू येते!

हिंदी वाक्यरचनेचा प्रभाव सहज लक्षात येईल. 'मेरी मदद करो' ही हिंदी वाक्यरचना. मराठीत 'मला मदत कर', असे वाक्य. 'माझी मदत'-'माझी' हे मदत या नामाचे सार्वनामिक विशेषण आहे. 'मला' हे वाक्यात कर्म आहे, विशेषण नव्हे. '(तू) मला मदत कर' हे वाक्य बरोबर आहे. बोलताना व लिहिताना योग्य वाक्यरचना करणे अपेक्षित आहे.

### (२) जोडून की तोडून

आता काही शब्द लिहिताना होणारी एक चूक अशी आहे. हे वाक्य वाचा :

'तुम्ही सारेजण माझ्या व्याख्यानाला या.'

इथे 'सारे' हे, 'जण' या शब्दाचे विशेषण आहे. हे दोन शब्द आहेत. सारेजण हा एक शब्द नाही. तसेच, प्रत्येक जण, साऱ्या जणी, दोघे जण, सर्व जण इ. शब्द जोडून न लिहिता तोडून लिहावेत.

तसेच, काही क्रियापदे जोडून लिहिणे चुकीचे आहे. उदा. बघू या, जाऊ दे, पाहू या, बसू या, नाचू या, गाऊ या, झोपू दे- द्या इ. या शब्दांतील 'बघू, जाऊ, पाहू, बसू, नाचू, गाऊ, झोपू' ही मुख्य क्रियापदे आहेत. 'या, दे, द्या' ही साहाय्यकारी क्रियापदे आहेत. 'बघूया', 'जाऊद्या' इ. एक शब्द नसून दोन शब्द आहेत. योग्य अंतर ठेवून ते शब्द लिहिणे आवश्यक आहे. बोलताना जरी आपण ते एका शब्दासारखे उच्चारत असलो, तरी लेखनात ते दोन शब्द तोडून लिहायला हवेत.

**– यास्मिन शेख**

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# अंगाऱ्याला गेला आणि पांगारा घेऊन आला

**काही काही** माणसे एखाद्या कामाला खूपच विलंब लावतात. सुयशचे अगदी असेच होत असे. त्याला एखादे काम सांगितले की तो इतका वेळ लावीत असे की त्या कामाचे प्रयोजन, कालावधीच संपून जात असे. तो शाळेत खरे तर खूप हुशार विद्यार्थी म्हणून गणला जात असे. पण वेळेचे भान नसणे, अतिचिकित्सक वृत्ती अशा काही स्वभाववैशिष्ट्यांमुळे त्याला सांगितलेले काम करण्यात दिरंगाई होत असे. एखाद्या निबंध स्पर्धेत त्याने भाग घेतला की जर त्याने वेळेत निबंध लिहून सादर केला, तर त्याला हमखास बक्षीस ठरलेले असे. पण सुयश ही संधी आपल्या स्वभावामुळे पुष्कळ वेळेला गमावतच असे आणि सादरीकरण केलेल्या कागदावर नकारघंटा घेऊन परत येत असे. यासाठी तो अनेकांची बोलणीही खाई. घरीदारी सारे त्याला यासाठी उपदेशाचे डोस पाजत असत. त्याची आई त्याला सांगे, ''*सुयश! तुझा हा स्वभाव लवकर सुधार बाबा. एखाद्या दिवशी 'अंगाऱ्याला गेला अन् पांगारा घेऊन आला' अशी गत व्हायची तुझी.*''



हा फुलोरा पांगाऱ्याचा!

या म्हणीचा मथितार्थ असा की एखाद्या घरात कुणी व्यक्ती बरेच दिवस खूप आजारी असली, अगदी अंथरुणाला खिळून असली तर घरातील व्यक्तींना त्या व्यक्तीच्या तब्येतीला उतार पडावा म्हणून अनेक उपाय सुचविले जातात आणि ते अमलात आणले जातात. एकदा एका घरातल्या आजारी माणसाच्या तब्येतीला उतार पडावा म्हणून एका व्यक्तीला एका पवित्र क्षेत्री जाऊन देवाचा अंगारा आणायला पाठवण्यात येते. ती व्यक्ती अंगारा आणायला जाते पण त्या व्यक्तीला अंगारा घेऊन यायला इतका विलंब लागतो की आजारी व्यक्तील मृत्यू कवटाळतो आणि अंगारा घेऊन येणाऱ्या माणसावर त्या व्यक्तीच्या दहन क्रियेसाठ पांगाऱ्याची लाकडे आणण्याची वेळ येते.

एखादे काम वेळेत करणे फार आवश्यक आणि हिताचे असते. नाहीतर त्याच्या गंभीर परिणामांना सामोरे जावे लागते. तातडीन करायच्या कामाला विलंब लावणे म्हणजे खूप नुकसान पदरात पाडून घेणे होय.

– डॉ. माधवी वैद
madhavivaidya@ymail.com

# वाक्प्रचारांमधील सृष्टीविषयक निरीक्षण

**वाक्प्रचारांमध्ये समाविष्ट** झालेली उपमानसृष्टी खूप विशाल आहे. त्यात मानवी व्यवहाराबरोबर सृष्टीतील पशुपक्षी यांच्याविषयीच्या निरीक्षणांनाही स्थान मिळाले आहे. याची ही उदाहरणे आहेत.

**चंचुप्रवेश करणे** या वाक्प्रचारात पक्ष्यांच्या विशिष्ट लकबींचा मार्मिकपणे वापर केला आहे. चंचू म्हणजे चोच. पक्ष्यांची चोच अगदी लहान असते. चोच आत घालण्यापुरती जागा आधी मिळवायची आणि मग अधिक जागा व्यापायची, अशी छोट्या पक्ष्यांची युक्ती असते. घरटे बांधताना त्यांना ही युक्ती वापरावी लागते. त्यांच्या या सवयीवरून ' चंचुप्रवेशान्मुसलप्रवेशः', अशा धोरणी वृत्तीची घडण झाली असावी. म्हणजे आधी चोचीपुरती जागा मिळवायची आणि मग मुसळ (उखळीमध्ये धान्य कांडण्यासाठी वापरावयाचे मोठे साधन) मावेल इतकी मोठी जागा मिळवायची, असा व्यावहारिक धूर्तपणा त्यातून कळतो. एखाद्या ठिकाणी कसाबसा शिरकाव करून मग हातपाय पसरण्याचा, आपली कामे रेटण्याचा रोकडा व्यवहारबोध यातून लक्षात येतो.

**दाती तृण धरणे** या वाक्प्रचारामध्ये पशूंशी संबंधित निरीक्षण आले आहे. तृण म्हणजे गवत. हे अनेक पशूंचे खाद्य असते. पायदळी तुडवले जाणारे तृण हे तुच्छतेचेही प्रतीक आहे. त्यामुळे दाती तृण धरणे म्हणजे लाचारी पत्करणे (जणू पशूंच्या पातळीला जाणे!) असा अर्थ होतो. शत्रूला शरण आणताना त्याचा अपमान करण्यासाठी हा वाक्प्रचार वापरलेला पाहायला मिळतो. मात्र हा वाक्प्रचार तेवढ्याच पुरता मर्यादित राहिलेला नाही. नवकवी बा. सी. मर्ढेकर यांच्या एका कवितेत यंत्रयुगातील कारकुनाच्या जगण्याचे चित्रण आहे; ते असेः 'सकाळी उठोनी चहा कॉफी घ्यावी, तशीच गाठावी वीजगाडी/ दाती तृण घ्यावे हुजूर म्हणून, दुपारी भोजन हेचि सार्थ' यात साहेबापुढे लाचार होऊन काम करणाऱ्या कारकुनाची मनःस्थिती नेमकेपणाने व्यक्त झाली आहे! 'हाती पेन घ्यावे' असेही मर्ढेकर यांना म्हणता आले असते! पण भाषेत रुळलेले वाक्प्रचार, तसेच श्रुतयोजन यांचे समाजमनाला होणारे आवाहन मोठे असते, हे मर्ढेकर ओळखत होते! एकंदरीत यातून वाक्प्रचारांचे महत्त्वच कळते!

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





 कांचन कराई द्वारा संकलित

# कृपया, क्षमा असावी पण आभाराचे भार नको !

आयुष्यात औपचारिक-अनौपचारिक क्षणांना शुभेच्छा, अभिनंदन, आशीर्वाद, सांत्वन, सहवेदना कळवण्याची वेळ वारंवार येत असतेच. 'प्लीज', 'सॉरी' आणि 'थँक्यू' या तीन शब्दांनी आयुष्यात जणू धुमाकूळ घातला आहे. प्लीजसाठी 'कृपया' हा औपचारिक शब्द अगदी सहज वापरात आहे. तो औपचारिक वाटतो म्हणूनच बोलीत तो 'अरे जरा, सोबत येशील का?' मधील 'जरा' या कृपया शब्दाच्या जवळ जाईल.

'सॉरी' या शब्दासाठी संदर्भानुसार निरनिराळे पर्यायी शब्द वापरता येतात ते अधिक चांगले वाटतात. चुकले असल्यास सॉरीसाठी, 'क्षमा करा, माझी चूक झाली' किंवा 'मी क्षमाप्रार्थी आहे, पुन्हा असे होणार नाही', या म्हणण्याने जो प्रभाव पडेल तो 'सॉरी' या दोन अक्षरांनी मिळणार नाही. परंतु औपचारिकपणाने विशिष्ट भावनांसाठी विशिष्ट शब्दच वापरायला हवेत, ही पाश्चात्त्य कल्पना आपण स्वीकारली आणि त्या विशिष्ट शब्दांना अवाजवी महत्त्व आले, पण त्या शब्दांमागील भावना लोप पावल्या. कधी कधी तर ''मी सॉरी म्हटलंय ना एकदा? आता आणखी कटकट करू नकोस.'' अशी विचित्र चर्चा कानावर पडू लागली.

कधी कधी 'सॉरी' या अर्थी एखाद्या दूरध्वनीवरून ध्वनिमुद्रित आवाज येतो.. 'आम्ही क्षमस्व आहोत' असं वाक्य कानावर पडलं की द. दि. पुंडे यांचा 'भयंकर सुंदर मराठी भाषा' हा ललित लेखसंग्रह आठवतो! अगदी कोणी मनुष्य निवर्तले असे कळले तरी आजकाल समोरून 'ओहह सॉरी..!' असे येते. इथे 'अरेरे, फार वाईट झाले! आम्ही तुमच्या दुःखात सहभागी आहोत' असे सहजी तोंडून बाहेर पडू शकते. आरआयपी (RIP- रेस्ट इन पीस) ऐवजी 'आत्म्यास सद्गती लाभो', अशी प्रार्थना जवळची वाटते. 'ऑफ झाले' हा शब्द निधनाच्या वार्तेला पर्याय म्हणून बऱ्यापैकी वापरात येऊ लागला आहे. त्याऐवजी सामाजिक संदर्भात वारले, निधन झाले, बुद्धवासी झाले, ख्रिस्तवासी झाले, पैगंबरवासी झाले, देवाघरी गेले असे पर्याय उपयोगात आणले तर मानवी स्नेहबंध दृढ होण्यास मदत होते.

अत्र, तत्र, सर्वत्र 'थँक्यू' हा शब्द बोकांडी बसला आहे. अगदी नोकरदारांनी उपस्थितीचे बोट यंत्राला लावले तरीही यंत्रातून 'थँक्यू' असा आवाज येतो. एरवी जणू पावलोपावली हा शब्द सोबतीस असतो. तर इथे आभार, धन्यवाद, कृतज्ञता एवढंच नव्हे 'बरं वाटलं, मन भरून आलं, छान वाटलं, किती बरं आभार मानू' असे संदर्भानुसार पर्यायी शब्दरचना वापरता येऊ शकतात, ज्या तुमच्या भावना अधिक नेमकेपणाने समोरच्यापर्यंत पोहोचवतात. ज्ञानेश्वरीमध्येही दुसऱ्या अध्यायात 'त्या चि उपकारें। होवोनि आभारी। तयाच्या जिव्हारीं। घाव घालूं ? ॥५९॥' येथे 'आभार' शब्द आलेला आहे.

भावनांचं प्रकटीकरण करण्यासाठी प्लीज, सॉरी, थँक्यू या तीन शब्दांचा औपचारिक आधार घेऊन केवळ उपचार पाळला जातो. आपली अभिव्यक्ती चांगली व्हावी असं प्रत्येक व्यक्तीला वाटत असेल तर निरनिराळे पर्यायी शब्द संदर्भानुसार वापरणं आणि स्वतःची शैली सिद्ध करणं हा अधिक चांगला पर्याय आहे असं वाटत नाही का?

– डॉ. निधी पटवर्धन
nidheepatwardhan@gmail.com

लोकसत्ता Thu, 24 February 2022
https://epaper.loksatta.com/c/66433341



pradiprawat55@gmail.com

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# संस्कृती

**पाश्चात्त्यांशी संपर्क** आल्यानंतर तेथील अनेक संकल्पना भारतातही रुजू लागल्या. समाजवाद, साम्यवाद, लोकशाही इत्यादी. 'कल्चर' ही संकल्पनादेखील अशीच एक. 'सिव्हिलायझेशन' (सभ्यता) या जुन्या शब्दापेक्षा अधिक सूक्ष्म अशी. 'सिव्हिलायझेशन' म्हणजे जे तुमच्याकडे आहे (व्हॉट यू पझेस) आणि 'कल्चर' म्हणजे जे तुम्ही आहात (व्हॉट यू आर), अशी एक सुरेख व्याख्या दोन्ही शब्दांतील फरक स्पष्ट करते.

मुळात 'कल्चर' हा शब्द इंग्रजीत जर्मन भाषेतून आला व त्याचा मूळ अर्थ 'जमिनीची नांगरणी' हा आहे. इतिहासाचार्य विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांनी त्यासाठी 'संस्कृती' हा शब्द वापरला होता. त्यापूर्वी कुठल्याही प्राचीन भारतीय साहित्यात 'संस्कृती' हा शब्द आढळत नाही. राजवाडे यांनी 'कल्चर' शब्दाच्या अर्थातील एक महत्त्वाचा धागा उचलला व त्याला आपल्याकडील संस्कार ही संकल्पना जोडली.

ज्येष्ठ भाषातज्ज्ञ अशोक केळकर यांच्या आठवणीनुसार राजवाडे यांच्या प्रतिभेमुळे 'कल्चर' या शब्दासाठी अधिक अर्थघन असा प्रतिशब्द मराठीला लाभला. त्यावेळी बंगालीत 'कल्चर'ला प्रतिशब्द म्हणून 'कृष्टी' हाच शब्द वापरत. टागोरांना तो तितकासा आवडत नव्हता. त्यामुळे आपले एक मित्र आणि पुण्यातील संस्कृतचे प्राध्यापक परशुराम लक्ष्मण वैद्य यांच्याकडे, ''मराठीत कल्चर या अर्थी कुठला शब्द वापरला जातो?'' अशी विचारणा त्यांनी केली. वैद्य यांनी कळवले, की मराठीत राजवाडे यांनी 'संस्कृती' हा एक सुंदर शब्द त्यासाठी घडवला आहे. टागोरांनीही 'संस्कृती' हाच शब्द वापरायला सुरुवात केली. मग आपोआपच इतरही भारतीय भाषांनी 'कल्चर'साठी 'संस्कृती' हा शब्द स्वीकारला.

या साऱ्यातून ध्वनित होणारे एक महत्त्वाचे वास्तव. 'कल्चर'सारखी एखादी संकल्पना आपल्या भाषेत नेमकेपणे व्यक्त करता यावी याची रवींद्रनाथांसारख्या महान कवीलाही लागलेलि आस, त्यासाठी त्यांनी आपल्या एका परभाषक परिचिताला पत्र लिहिणे, त्या परिचिताने दुसऱ्या कोणीतरी रूढ केलेला प्रतिशब्द, त्याला उचित ते श्रेय देऊन, टागोरांना कळवणे, आणि त्यातून सर्वच भारतीय भाषांना एक उत्तम प्रतिशब्द गवसणे, हे सारेच वेधक वाटते. 'संस्कृती' शब्दाच्या निर्मितीच हा प्रवासदेखील 'संस्कृती' म्हणजे नेमके काय हेच प्रत्यक्षात दाखवून देतो!

– भानू काळे
bhanukale@gmail.com





# अपप्रयोगांची कला !

कांचन कराई द्वारा संकलित

**आता हे** वाक्य वाचा- 'तू तुझ्या मित्राच्या कलेने घे, त्यातच तुझा फायदा आहे'.

(या वाक्यातील कलेने या शब्दाचे मूळ रूप 'कला'- विभक्तिप्रत्यय लागल्यास या स्त्रीलिंगी एकवचनी नामाचे सामान्यरूप कलेने होईल. 'कला' या शब्दाचा अर्थ काव्य, गायन, शिल्प, चित्र, नृत्य, इ. कौशल्याची कामे.)

'एखाद्याच्या कलेने घेणे' या शब्दयोजनेमुळे वाक्याचा नेमका अर्थच कळत नाही.

मराठीत वाक्प्रचार हा आहे- एखाद्याच्या कलाने घेणे. अर्थ आहे- एखाद्याच्या बुद्धीचा स्वाभाविक रोख, त्याची प्रवृत्ती लक्षात घेऊन, त्याप्रमाणे वागणे.

कल या पुल्लिंगी, एकवचनी नामाचे अनेक अर्थ आहेत- ओढा, प्रवृत्ती, वळण, रोख, बुद्धीचा स्वाभाविक रोख.'तू तुझ्या प्रवृत्तीपेक्षा मित्राची प्रवृत्ती लक्षात घेऊन त्याप्रमाणे वाग, त्यामुळे तुला फायदा होईल,' असा त्या वाक्याचा अर्थ आहे. वरील वाक्य असे हवे- तू तुझ्या मित्राच्या कलाने घे, त्यातच तुझा फायदा आहे. 'कलेने' असा शब्द वाक्यात घेतल्यास मित्राच्या अंगी चित्र, संगीत, इ.पैकी एखादी कला आहे व त्या कलेने तू घे. हे वाक्य निरर्थक ठरेल. लक्षात घ्या, एखाद्याच्या कलाने घेणे असा वाक्प्रचार आहे, एखाद्याच्या कलेने घेणे असा वाक्प्रचार नाही.

## पैकीच्या पैकी !

आणखी एक वाक्य वाचा- 'माझ्या मुलाला गणिताच्या पेपरात पैकीच्या पैकी गुण मिळाले'.

पैकी हे शब्दयोगी अव्यय आहे. त्याचा अर्थ आहे- आतले, मधून. पैकीच्या पैकी या शब्दयोजनेला काहीच अर्थ नाही. हे वाक्य असे हवे- 'माझ्या मुलाला गणिताच्या पेपरात शंभरापैकी शंभर गुण मिळाले' किंवा त्याला... 'सगळेच्या सगळे गुण मिळाले.' मात्र 'पैकीच्या पैकी' हा अपप्रयोग इतका रूढ झाला आहे, की त्यात काही चूक आहे, हे आपल्याला जाणवत नाही!

## रुळलेले अपप्रयोग...

'सामग्री' हा शब्द 'सामुग्री' असा बोलण्यात आणि लेखनातही आढळतो. 'आशीर्वाद' हा शब्द 'आशिर्वाद' असा लिहिणे चुकीचे आहे. तसेच, 'महाराष्ट्रीयन' हा शब्द 'अमेरिकन'/ 'युरोपियन' या इंग्लिश शब्दाचे चुकीचे अनुकरण आहे. तो शब्द 'महाराष्ट्रीय' असा लिहिणे योग्य.

सामग्री, आशीर्वाद, महाराष्ट्रीय असे शब्द लिहावेत.

– यास्मिन शेख





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# आयत्यावर कोयतं आणि शिंक्यावर रायतं

**आमच्या कॉलेजमध्ये** आमची एक मैत्रीण होती. जेवणाच्या सुट्टीत जेव्हा आम्ही आमचे डबे उघडून एकत्र जेवायला बसायचो. तेव्हा ती दुसऱ्याच्या डब्यांवर ताव मारून, आपला डबा तसाच ठेवायची. त्यामुळे तिला काय समाधान मिळायचे कोणास ठाऊक! यासाठी ती बरीच कारणे देत असे- 'माझे एक नातेवाईक खूप आजारी आहेत...' किंवा 'माझी तब्येत बिघडली, मी आज डबा घेऊन येऊ शकले नाही' इ.इ. एक ना दोन!

हजार कारणे सांगून ती आपला हेतू साध्य करून घेई. पण खोटे बोलणे फार दिवस लपून राहू शकत नाही. त्यातले सत्य कधी तरी बाहेर येतेच! तसेच झाले.

एके दिवशी एका मैत्रिणीला खरे काय ते कळलेच. मग ती मैत्रीण चक्क या 'डबा न आणणारी'चाच डबा तिच्या नकळत जेवायच्या वेळेला घेऊन आली. आणि सर्वांना म्हणाली, 'मैत्रिणींनो! मी आज अगदी चविष्ट जेवण या डब्यातून सर्वांसाठी आणले आहे. बघा तरी इतके रुचकर जेवण कुणाचे आहे!' तिने डबा उघडला. त्या डब्याकडे आमची ती लबाड मैत्रीण केवळ बघतच राहिली. मग आमची मैत्रीण तिला म्हणाली, ''हे बघ, तू आमच्या डब्यावर रोजचाच ताव मारीत होतीस ही गोष्ट आमच्या खरे तर लक्षात आली होती, पण आम्ही विचार करत होतो, सावज जाळ्यात कसं पकडायचं? आज पकडली गेलीस. 'आयत्यावर कोयतं आणि शिंक्यावर रायतं' या म्हणीप्रमाणे आपलं शिंक्यावरचं लोणचंही कुणाच्या हाती लागू द्यायचं नाही आणि दुसऱ्यानी वाढवलेल्या, आयत्याच हाती लागलेल्या फांदीवर कोयत्याचे घाव घालायचे ही तुझी रीत आहे. इतकी कशी गं खादाड आणि अप्पलपोटी आहेस तू?''

रायतं म्हणजे लोणचं. लोणच्याला मराठवाड्यात कुठे कुठे 'रायतं' असे म्हणतात.



सुतळीच्या दोराने बनवलेल्या या (रिकाम्या) 'शिंक्या'चे छायाचित्र महाजालावरून साभार

दह्यात कालवून केलेला कोशिंबिरीसारखा पदार्थ, असाही त्याचा अर्थ आहे. 'आयत्यावर कोयतं आणि शिंक्यावर रायतं' ही म्हण अत्यंत स्वार्थी माणसासाठी वापरली जाते. दुसऱ्यांनी वाढवलेल्या फांदीवर हे लोक कोयत्याने सपासप घाव घालतात, पण आपले लोणचेही शिंक्यावर ठेवून देतात. त्याची एकही फोड कुणाच्या हाती लागू देत नाहीत.

- डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचार आणि लष्करातील संज्ञा

**जुन्या काळच्या** लष्करातील काही संज्ञा आजही आपल्या वाक्प्रचारांमध्ये रूढ आहेत. त्याची ही उदाहरणे आहेत.

एकांडा शिलेदार म्हणजे धाडसी वृत्तीचा स्वतंत्र शिलेदार. पूर्वी लष्करात प्रत्येक पथकात किंवा पागेत १ ते १०० पर्यंत एकांडे शिलेदार असत. पानिपतच्या बखरीत हा शब्दप्रयोग आढळतो. एकांडा शिलेदार म्हणजे अनुयायी वा सैन्य, अशा कोणाचीही मदत न घेणारा वीर! त्याला वार्षिक वेतन रुपये ३०० ते दोन हजारपर्यंत असे. एकांडा शिलेदार कोणत्याही सैन्यपथकात सामील नसे. उत्तम कामगिरी केली की त्याला क्वचित पालखी वा अबदागिरीचा मान मिळत असे. अत्यंत आणीबाणीच्या वेळी हा पुढे येत असे. पुढे या संज्ञेला व्यापक अर्थ मिळत गेला. कोणत्याही मदतीची अपेक्षा नसलेल्या, स्वतंत्र वृत्तीने कर्तृत्व गाजवणाऱ्या व्यक्तीसाठी आजही हा वाक्प्रचार वापरला जातो. स्वतंत्र वृत्तीच्या धाडसी, कर्तृत्ववान व्यक्तीला हा वाक्प्रचार खरे तर एखाद्या बिरुदासारखा शोभतो! उदा. 'डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांनी एकांड्या शिलेदाराप्रमाणे ज्ञानकोशाचे प्रचंड कार्य पूर्ण केले.'

पाचावर धारण बसणे, हा वाक्प्रचार आपण सहज वापरतो. पूर्वी लष्करात फार महागाई झाली की एका रुपयाला पाच शेर धान्य मिळू लागे! म्हणजेच 'पाचावर धारण बसे', तेव्हा लोक हवालदिल होत असत! दाते, कर्वे यांच्या 'महाराष्ट्र शब्दकोश' या ग्रंथात 'धारण' या शब्दाचा अर्थ दिला आहे, तो असा : धान्य इत्यादीचा खरेदी-विक्रीचा चालू दर, बाजारभाव. भाऊसाहेबांच्या बखरीत हा शब्द आढळतो. एका लोकगीतातही हा शब्द येतो, तो असा : 'पंढरपुरात काय, बुक्क्याची धारण / पुसे बंगल्यावरून, रखुमाबाई!' धारण हा शब्द आज ऐकू येत नाही, म्हणून हे स्पष्टीकरण दिले! अन्न ही माणसाची मूलभूत गरज असल्यामुळे लोकांचे महागाईमुळे असे घाबरून जाणे, साहजिकच ठरते. त्यावरून 'धारण आणि मरण काही समजत नाही', अशी अनुप्रास जुळवत केलेली लोकोक्तीही आढळते! त्यामुळेच 'पाचावर धारण बसणे' म्हणजे 'अतिशय घाबरणे, हवालदिल होणे' होय!

– **डॉ. नीलिमा गुंडी**
nmgundi@gmail.com

लोकसत्ता Wed, 02 March 2022
https://epaper.loksatta.com/c/66559242



# जाहिरात जगत आणि मराठी

**सध्याच्या वृत्तपत्रांवर** सहज नजर टाकली तर 'फक्त एक स्पून रोज' किंवा 'लक्झुरियस फ्लॅट अव्हेलेबल', 'शो फ्लॅट रेडी' अशा भाषेत लिहिलेल्या बऱ्याच जाहिराती नजरेस पडतात. जास्तीत जास्त इंग्रजी शब्द वापरले तरच आपली जाहिरात ग्राहकाला नीट समजेल, या समजुतीतून मराठी जाहिराती दिवसेंदिवस इतक्या इंग्रजी होत चालल्या आहेत, की काही काळाने मराठी जाहिरात म्हणजे केवळ देवनागरी लिपी एवढंच लक्षण उरेल की काय अशी भीती वाटते.

आज आपण जाहिरात क्षेत्राच्या कामकाजात वापरले जाणारे काही महत्त्वाचे शब्द पाहू. जाहिरातीच्या मुख्य घटकांमध्ये येते हेडलाइन; तिला 'शीर्षओळ' किंवा 'मथळा'; सबहेडलाइनला 'उपमथळा' किंवा 'उपओळ'; बॉडीटेक्स्ट किंवा कॉपीला 'मजकूर', 'संहिता'; स्लोगन किंवा कॅचलाइनला 'घोषवाक्य' आणि लोगोला 'बोधचिन्ह' असे शब्द पुस्तकांत सापडतात, मात्र ते पुस्तकाबाहेर वापरल्याचं जाणवत नाही. जाहिरातीसाठी संगीताचा साज चढवून ऐकवल्या जाणाऱ्या सिग्नेचर ट्यूनला 'संकेतधून' आणि जिंगलसाठी 'गीतिका' हे सुंदर शब्द एका गटचर्चेत पुढे आले.

जाहिरात यशस्वी होण्यासाठी आवश्यक असलेला यूएसपी (युनिक सेलिंग पॉइंट) याला 'अनन्य विक्री मुद्दा' किंवा 'अविमु' म्हणता येईल. इंग्रजीत असं आद्याक्षरं वापरून लघुरूपं करण्याचं प्रमाण जास्त आहे. आपणही 'भावना पोचल्या' सांगण्यासाठी मराठीत 'भापो' करतो, तसंच मराठीतल्या मोठ्या शब्दाचं किंवा शब्दसमूहाचं असं लघुरूप करूनही प्रचारात आणता येईल.

जाहिरात जगतातला एक प्रतिष्ठित प्रकार म्हणजे ब्रॅण्ड अर्थात 'नाममुद्रा'. ही नाममुद्रा जनमानसात ठसवणारा ब्रॅन्ड ॲम्बेसिडर म्हणजे 'जाहिरातदूत'. कॅम्पेनसाठी 'जाहिरातमोहीम' तर मुख्य जाहिरातीआधी छळून उत्सुकता वाढवणारे टीझर यांना 'छळक' म्हटले तर मराठी ''छळ' आठवणार. या शब्दात फारच छळ वाटला तर 'पूर्वरंग' म्हटले तर कीर्तन आठवणार. मग काय शब्द तयार करू शकतो आपण? वाचकहो, तुम्ही सुचवाल का? खरं तर 'जाहिरात' या क्षेत्रात मोठ्या प्रमाणावर मराठी जाहिरातदार आहेत, जाहिराती तयार करणारे चित्रकार, लेखक मराठी आहेत आणि मुख्यत: या जाहिराती मराठी लोकांसाठी लिहिल्या जातात. त्यामुळे या क्षेत्रातल्या सर्व सर्जनशील मराठी व्यक्तींनी जाहिरातींत जाणीवपूर्वक सढळ हस्ते सुयोग्य मराठी शब्द लिहिण्याचं मनावर घेतलं, तर त्यांना मराठी ग्राहकांकडून नक्कीच सकारात्मक प्रतिसाद मिळेल. अशा जाहिराती वैशिष्ट्यपूर्ण तर ठरतीलच, शिवाय भाषेच्या समृद्धीच्या दृष्टीनेही मोलाच्या ठरतील. जाहिरातींमध्ये इंग्रजी शब्दांऐवजी वापरता येणारे असेच काही मराठी शब्द पाहू पुढच्या लेखात.

– वैशाली पेंडसे-कार्लेकर
vaishali.karlekar1@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# अगदी उलट अर्थाने रूढ झालेले शब्द

**'अपरोक्ष' शब्दाचा** अर्थ आपण 'दृष्टिआडचे' असा लावतो. 'त्याने माझ्या अपरोक्ष हे केले' याचा अर्थ 'त्याने माझ्या दृष्टिआड किंवा मी समोर नसताना हे केले' असाच लावतो. पण हा अर्थ मूळ अर्थाच्या अगदी उलट आहे. कारण 'अक्ष' या संस्कृत शब्दाचा अर्थ 'डोळा' असा आहे.

पूर्वपदी 'पर' आल्यावर 'परोक्ष' शब्दाचा अर्थ 'दृष्टिआडचे' असा होईल. नंतर पुन्हा परोक्षला 'अ' हे नकारदर्शक पूर्वपद लागल्यावर त्या 'अपरोक्ष' शब्दाचा अर्थ उलटा म्हणजे 'दृष्टीसमोरचे' असा होईल. पण त्याच्या अगदी उलट अशा अर्थाने, म्हणजेच 'दृष्टिआडचे' अशा अर्थाने, अपरोक्ष हा शब्द रूढ झाला आहे. हा अपरोक्ष शब्दच अधिक वापरात येतो, परोक्ष अगदी क्वचितच कोणी वापरेल.

'विरोधाभास' हा शब्द घ्या. विरोध अधिक आभास अशी त्याची फोड करता येईल. शब्दशः बघितले तर विरोधाचा केवळ आभास असणे, म्हणजेच वरकरणी दिसला तरी प्रत्यक्षात मात्र विरोध नसणे, असा त्याचा अर्थ होईल. मराठीत मात्र दैनंदिन वापरात विरोधाभास हा शब्द 'विरोध असणे' याच अर्थाने वापरला जातो. उदाहरणार्थ, 'त्याच्या विधानात विरोधाभास आहे' असे म्हटले, तर 'त्याच्या विधानात परस्परविरोध आहे' असाच अर्थ लावला जातो. इंग्रजीतील कॉन्ट्राडिक्शन किंवा कॉन्ट्रास्ट अशा अर्थाने. म्हणजेच 'विरोध नसणे' याऐवजी 'विरोध असणे' असाच त्याचा अर्थ रूढ झाला आहे.

'राजीनामा' हा असाच आणखी एक शब्द. राजी नामा अशी त्याची फोड करता येईल. राजी हा मूळ अरबी शब्द आणि त्याचा अर्थ कबूल किंवा स्वीकृत असा आहे. जसे, ''तो त्या प्रस्तावाला राजी झाला.'' नामा हा मूळ फारसी शब्द आणि त्याचा अर्थ लिखित स्वरूपातील असा आहे. जसे करारनामा किंवा जाहीरनामा. त्यानुसार 'राजीनामा' शब्दाचा अर्थ 'स्वीकृतिपत्र' असा होतो. पण प्रत्यक्षात राजीनाम हा शब्द नेमक्या विरुद्ध अर्थाने म्हणजे त्यागपत्र (म्हणजेच नाराजीनामा!) या अर्थाने वापरल जातो.

अर्थविज्ञानशास्त्रात (Semantics) य अर्थपरिवर्तनाला 'अर्थभ्रंश' म्हणतात; त्यानुसा या तिन्ही शब्दांचा रूढ वापर शास्त्रानुसार चुकीच आहे; पण शेवटी 'शास्त्रात् रुढिर्बलीयसी' शास्त्रापेक्षा रूढी अधिक बलवान ठरते, हेच खरे

**–भानू काळे**
bhanukale@gmail.com





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# सर्वनामाचे रूप 'हे' फसवे...

**ही दोन** वाक्ये वाचा :

(१) 'वृद्धांना कधी कधी वाटते, की वार्धक्य किंवा दीर्घायुष्य हे परमेश्वराची कृपा नसून अवकृपा आहे.'

(२) 'मवाल्यांनी त्या सुंदर मुलीला इतका त्रास दिला, की सौंदर्य हे वर नसून शाप आहे असे तिला वाटू लागले.'

या दोन्ही वाक्यांत एक चूक आहे, 'हे' हा शब्द. या दोन्ही वाक्यांत 'हे' हे सर्वनाम, नपुसकलिंगी, एकवचनी आहे. वास्तविक पहिल्या वाक्यात हे सर्वनाम 'वार्धक्य' किंवा 'दीर्घायुष्य' या नपुसकलिंगी नामाचे नसून 'कृपा', 'अवकृपा' या स्त्रीलिंगी एकवचनी नामांचे आहे. तसेच, दुसऱ्या वाक्यात 'हे' हे नपुसकलिंगी सर्वनाम 'सौंदर्य' या नपुसकलिंगी, एकवचनी नामाचे नसून ते 'शाप' 'वर' या (पुल्लिंगी) नामांचे आहे. हे शब्द - नामे, पुल्लिंगी, एकवचनी आहेत, त्यामुळे ही वाक्ये अशीच योग्य आहेत. (१) 'वृद्धांना कधी कधी वाटते, की वार्धक्य किंवा दीर्घायुष्य ही परमेश्वराची कृपा नसून अवकृपा आहे.' (२) मवाल्यांनी त्या सुंदर मुलीला इतका त्रास दिला, की सौंदर्य हा वर नसून शाप आहे असे तिला वाटू लागले.

या संदर्भात लोकमान्य टिळकांचे एक अत्यंत प्रसिद्ध वचन येथे उद्धृत करावेसे वाटते. - 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे आणि तो मी मिळवणारच.' 'हा', 'तो' ही पुल्लिंगी सर्वनामे 'स्वराज्य' या नपुसकलिंगी नामाची नसून, 'हक्क' या पुल्लिंगी नामासाठी आहेत.

अलीकडेच 'लोकसत्ता'त छापलेले हे वाक्य पाहा - 'मुंबई पोलीस प्रशासनाने काढलेला आदेश हे महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या पाठपुराव्याचे यश आहे' असे परिषदेचे अध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी सांगितले. 'हे' हे सर्वनाम (नपुसकलिंगी एकवचनी) 'आदेश' या पुल्लिंगी नामाचे नसून 'यश' या नपुसकलिंगी नामाचे आहे, हे वाचकांच्या लक्षात आलेच असेल.

## शब्दात होणारी चूक

लिहिण्यात आणि बोलण्यातही काही चुकीची रूपे आढळतात. भाषा- **भाषक** आणि *भाषिक*. यापैकी भाषक हे नाम असून भाषिक हे विशेषण आहे. 'मराठी भाषिक' हा शब्दप्रयोग चुकीचा आहे. **भाषक** म्हणजे बोलणारा- मराठी भाषा बोलणारा तो मराठी भाषक. *भाषिक* म्हणजे भाषेतील, भाषेसंबंधी, भाषाविषयक जसे भाषिक व्यवहार, भाषिक अपप्रयोग इ.

**– यास्मिन शेख**





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# ‘म्हाताऱ्या हरण्या’ आणि ‘म्हाताऱ्याला बाळसे’

**घरात नातीचा** साखरपुडा म्हणून आजींची गडबड सुरू झाली होती. ते पाहून आजोबा त्यांना म्हणाले, ‘‘अहो आजीबाई ! अहो कसली धावपळ चालली आहे तुमची पहाटेपासून? संध्याकाळी आहे ना साखरपुडा? ’’ त्यावर आजीबाई म्हणाल्या, ‘‘अहो ! घरात आपल्या कार्य आहे आणि सूनबाई, लेकीबाळी बघाना! कुणालाच त्याचे काही नाहीच मुळी! चटाचटा उठतील, कामाला लागतील... तर ते सोडाच, लोळत पडल्यात अजून! यांना कशी आणि कधी आपली जबाबदारी कळायची?’’

त्यावर आजोबा म्हणाले, ‘‘हे बघा! सगळं होईल व्यवस्थित. तुम्हालाच हौस फार, तुमचाच उत्साह दांडगा!’’ आजी म्हणाल्या, ‘‘आता मी म्हणते तसं होईल की नाही बघा हं! आता सगळे आरामात उठतील. नाश्ताही बाहेरूनच मागवलेला असेल, मग जेवण झालं की आधी गाठतील पार्लर! तिथून येईपर्यंत मी सगळी तयारी केलेलीच असेल आणि संध्याकाळीही बाहेरचेच खाद्यपदार्थ! बाकीचं सगळं नीटनेटकेपणाने करायला आजीबाई आहेतच! हे तर त्यांना पुरतेपणी ठाऊक आहेच. कारण सगळी हौसमौज काय आहे ती मलाच आहे ना?’’ त्यावर आजोबा म्हणतात कसे, ‘‘आपणच नाचानाच करायची, कामं अंगावर ओढून घ्यायची आणि हातपाय गळाटून बसायचे. म्हणतात ना! ‘‘तरण्या झाल्या बरण्या आणि म्हाताऱ्या झाल्या हरण्या’’ असे होते आहे तुमचे. त्या तरण्यांच्या दमून होतात बरण्या आणि तुम्हा म्हाताऱ्यांचा उत्साह हरिणींसारखा!’’

आजीही काही कमी नव्हत्या. त्या लगेच आजोबांना म्हणाल्या, ‘‘तुम्हीही काही कमी नाही आहात बरं का! तुम्हीसुद्धा आपल्याला झेपतील तेवढीच कामं करीत जा आता. तुमच्या आवाक्यात नसलेले काम अंगावर ओढून घेता आणि आजारी पडता. म्हणतात ना! ‘‘तरण्याचे झाले कोळसे, अन् म्हाताऱ्याला आले बाळसे!’’ अहो, काम करताना जरा आपली ताकद, वय याचा विचार कराल की नाही!’’

– डॉ. माधवी वैद्य

madhavivaidya@ymail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचार जपतात इतिहासाच्या खुणा

**काही वाक्प्रचारांमध्ये** इतिहासाच्या खुणा दडलेल्या असतात. इतिहासातील व्यक्ती, वस्तू, घटना यांच्याभोवती ते वाक्प्रचार गुंफलेले असतात.

उदा. 'कात्रजचा घाट दाखवणे' हा वाक्प्रचार आपल्याला शिवाजी महाराजांच्या 'गनिमी कावा' या युद्धतंत्राची प्रचीती देतो. शिवाजी महाराजांनी शाहिस्तेखानच्या सैन्याची दिशाभूल करण्यासाठी योजलेली ही नामी युक्ती होती. शिवाजी महाराजांनी बैलांच्या शिंगांना पलिते बांधले आणि बैलांना कात्रजच्या दिशेने सोडून दिले. त्यामुळे खानचे सैन्य त्या दिशेने गेले आणि शिवाजी महाराज सिंहगडावर सुखरूप पोहोचू शकले! 'कात्रजचा घाट दाखवणे' म्हणजे दिशाभूल करणे, हा वाक्प्रचार त्यानंतर रूढ झाला.

'गंगेत घोडे न्हाणे', हा वाक्प्रचारही मराठ्यांच्या इतिहासातील एका रोमहर्षक पर्वाची आठवण करून देतो. 'भीमथडीच्या तट्टांना या यमुनेचे पाणी पाजा', असे आपण गाण्यातून ऐकलेले असते! वरील वाक्प्रचारात यमुनेऐवजी गंगा नदीचा उल्लेख आहे. त्याचा अर्थ असा की भीमानदीच्या प्रदेशातील घोडे उत्तरेकडे नेणे! पेशव्यांनी उत्तर हिंदुस्थानात अंमल बसवला होता, तो संदर्भ यामागे आहे. त्यातून हा वाक्प्रचार रूढ झाला. त्याचा भावार्थ आहे, विजयाचा मोठा पल्ला गाठणे,



अचाट कामगिरी करणे! आजही मोठे काम होणे, भरून पावणे या अर्थाने हा वाक्प्रचार रूढ आहे.

'नारो शंकराची घंटा' या वाक्प्रचारामागेही असाच ऐतिहासिक संदर्भ आहे. नाशिकचे सरदार नारो शंकर राजेबहाद्दर यांनी नाशिकमध्ये रामेश्वर मंदिर बांधले होते. चिमाजीअप्पा पेशवे यांनी वसईच्या लढाईत जेव्हा पोर्तुगीजांच्या विरुद्ध मोठा पराक्रम गाजवला, तेव्हा त्यांनी त्याची आठवण म्हणून वसईच्या किल्ल्यातील चर्चमधील घंटा बरोबर आणल्या होत्या. त्यातील एक मोठी घंटा नाशिकच्या त्या मंदिरात आहे. तिचा आवाज मोठा असल्यामुळे 'नारो शंकराची घंटा' म्हणजे गाजावाजा करणे, असा अर्थ रूढ झाला. मात्र लक्षणेने या वाक्प्रचाराचा अर्थ होतो, भांडखोर, कजाग स्त्री! (हे अर्थांतरणही लक्षात घेण्याजोगे आहे!)

असे आणखीही वाक्प्रचार आहेत! भाषा ही 'सांस्कृतिक स्मृती' कशी ठरते, याचा उलगडा असे वाक्प्रचार वाचताना होतो.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# सावरकरांनी केलेली भाषाशुद्धी

लोकसत्ता Thu, 10 March 2022 https://epaper.loksatta.com/

**मराठी भाषेतील** बोली नि त्यातील प्रांतिक शब्द मराठी भाषेच्या शब्दकोशाचे मूलधन आहे. आपल्या शब्दभांडारात जे विचारवाचक, वस्तुवाचक, शब्द होते, वा आहेत किंवा निर्माण करता येतील अशा अर्थाचे परकीय शब्द वापरता कामा नये आणि आपल्या ढिलाईमुळे असे शब्द आपल्या आत घुसले असतील तर त्यांना हुडकून काढून टाकले पाहिजे. परंतु ज्या परदेशी वस्तू आपल्याकडे नव्हत्या, त्याला आपल्याकडे स्वकीय जुने शब्द नाहीत किंवा ज्यांना त्यांच्या त्या परकीय शब्दांसारखे सुटसुटीत स्वकीय शब्द उपयोजणे दुर्घट होते, अशा परकीय शब्दांना आपल्या भाषेत जसेच्या तसे घेण्यात प्रत्यवाय नसावा. जसे, कोट, गुलाब, जिलबी, टेबल, बूट वगैरे. (पण बूट स्वीकारल्यावरही 'शू' म्हणणे अनेकांना पसंत नाही. 'रेल-वे'ला सावरकरांनी शब्द सुचविलेला नाही. मात्र सिग्नलला 'बावटा' किंवा 'बाहुट' हा शब्द सुचविला आहे. तरीही अशा नव्या वस्तू आपल्याकडे येतात तेव्हा त्याला कोणी स्वकीय नावे देऊन रुळवून दाखवेल तर उत्तमच. त्याचप्रमाणे जगातील कोणत्याही परकीय भाषेतील एखादी शैली वा प्रयोग हा सरस किंवा चटकदार वाटला तर तो आत्मसात करण्यास आडकाठी नसावी. सावरकरांच्या भाषाशुद्धीतील मूलतत्त्वांचे हे सार आहे. जे आजच्या काळातही लागू आहे.

सावरकरांनी हेअर कटिंग सलूनला 'केशकर्तनालय', नेव्हीला 'नौदल', चित्रपटाच्या इंटरव्हलला 'मध्यंतर', पोस्टाला 'टपाल' हे सुचवलेले शब्द रुळले आहेत. इन्स्पेक्टरला 'अन्वेषक', वकिलाला 'विधिज्ञ', हेडमास्टरला 'मुख्याध्यापक', प्रिन्सिपॉलला 'प्राचार्य', खजिनदाराला 'कोषाध्यक्ष', मेयरला 'महापौर' हे शब्दही माहिती असतात. त्यांनी ॲम्ब्युलन्सला 'रुग्णवाहन', काबीजला 'हस्तगत', जिमखान्याला 'क्रीडांगण', ट्रस्टला 'न्यास', मोहिमेला 'अभियान', सहीला 'स्वाक्षरी', शाहिराला 'भाट' वा 'कवी' हे शब्द सुचवले आहेत. ते मराठी वाचकाला परिचित असतात. अजून वापरात आणता येतील असे सावरकरांनी सुचविलेले शब्द पाहूया. उपाहारगृहातील मेनूला 'पदार्थ', मेजवानीला 'पंगत', 'भोजन', 'जेवणावळ', मटनला 'सागुती', रब्बी पिकांना 'वैशाखी पिके' मुदतला 'अवधी', इशाऱ्याला 'चेतावणी', अक्कलला 'बुद्धी', जरुरीला 'आवश्यकता', तपशिलाला 'विवरण', तपासाला 'शोध', चित्रपटाच्या ट्रेलरला 'परिचयपत्र' हे शब्द, 'व' या उभयान्वयी अव्ययाऐवजी 'नि', 'आणि' हे शब्द वापरू शकतो हे आपल्याला विसरायला होते. 'तारीख'ला दिनांक हा शब्द सावरकरांचाच! पण अजूनही 'तारीख' शब्द आपलं स्थान टिकवून आहे.

न्यायालयात 'तारीख' पडते!, 'दिनांक' नाही! 'कायदा'ला सर्वत्र 'विधि' वापरता येत नाही. जमीन/कागद यांना प्रत्येक ठिकाणी 'भूमी', भूमि-पत्र' असे शब्द वापरणं योग्य ठरणार नाही. मूकीला 'बोलपट' शब्द समयोचित असताना त्यांनी सुचविलेला 'मूकपट' हा शब्द आता वापरू शकत नाही. काही शब्दांच्या बाबतीत तारतम्य बाळगून व्यवहार करावा लागेल. 'याद राख'ऐवजी 'ध्यानात घे', 'समजून अस' हा पण त्यांनीच सुचविलेला शब्दप्रयोग. आपणही समजून असले पाहिजे आपल्या मराठीचे (कर्ज नव्हे) 'ऋण'. तिचा जास्तीत जास्त वापर करून ते फेडायला हवे!

– डॉ. निधी पटवर्धन
nidheepatwardhan@gmail.com

भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# काळाच्या ओघात होणारा अर्थबदल

**भाषा ही** कायम प्रवाही असते व त्यामुळे शब्दांचे अर्थ काळाच्या ओघात बदलू शकतात. उदाहरणार्थ, 'डोळस' हा शब्द. या शब्दाचा मूळ अर्थ आहे 'देखणा किंवा सुंदर'. हरिश्चंद्राच्या मुलाचे वर्णन करताना ''डोळस राजकुमार'' म्हणजेच 'देखणा राजपुत्र' असे मुक्तेश्वर म्हणतात. आज मात्र डोळस शब्द 'बारकाईने पाहणारा' या अर्थाने वापरला जातो. याउलट 'देखणा' शब्दाचा मूळ अर्थ आहे 'पाहणारा'. चतुर माणसाचे वर्णन ''चतुर सर्वत्र देखणा'' म्हणजे 'तो चतुर जो सगळीकडे पाहणारा असतो' अशा शब्दांत समर्थ रामदास करतात. आज मात्र आपण 'देखणा' हा शब्द 'सुंदर' या अर्थाने वापरतो. डोळस आणि देखणा या शब्दांच्या अर्थात झालेला हा बदल.

'यातायात' हा असाच एक शब्द. यात आयात अशी त्याची फोड करता येईल. यातील मूळ धातू आहे या म्हणजे जाणे. यात म्हणजे गेलेला आणि आयात म्हणजे आलेला. निर्यात व आयात या शब्दांत अर्थाची हीच छटा आहे. त्या दृष्टीने यातायात शब्दाचा मूळ अर्थ जाणे- येणे असा होईल. हिंदीत प्रवासाला यातायात असेच म्हणतात व तो वापर मूळ अर्थाशी अधिक प्रामाणिक असा आहे. ''प्रवासात होणारा त्रास विचारात घेता हिंदीत प्रवासाला यातायात म्हणतात ते अगदी सार्थ आहे!'' असे पु. ल. देशपांडे यांनी विनोदाने लिहिल्याचे अनेकांना आठवत असेल. मूळ अर्थाशी प्रामाणिक राहायचे तर यातायात शब्दाचा अर्थ फारतर 'हेलपाटे घालणे' असा करता येईल. पण आज 'यातायात' शब्द त्रास, कष्ट, मेहनत या अर्थाने वापरला जातो. जसे की ''एवढी यातायात करून शेवटी काय मिळाले?'' काळाच्या ओघात झालेला हा अर्थबदल.

'व्हेंटिलेटर' हा शब्द बघा. पूर्वी शाळेच्या वर्गात किंवा अन्य मोठ्या खोलीत भिंतीच्या वरच्या बाजूला, पण छताच्या जरा खाली, छोट्या आडव्या खिडक्या असत व त्यांना व्हेंटिलेटर म्हटले जाई. खोलीतील हवा कोंदट होऊ नये, वायुविजन (व्हेंटिलेशन) व्हावे यासाठी. आज मात्र अतिशय आजारी रुग्णाला प्राणवायूचा पुरवठा व्हावा म्हणून जे उपकरण अतिदक्षता विभागात रुग्णाच्या नाकावर लावले जाते त्याला व्हेंटिलेटर म्हणतात! करोनाकाळात हा शब्द सारखा कानावर यायचा. ''रुग्ण व्हेंटिलेटरवर आहे'' म्हटले की 'तो अगदी मरायला टेकला आहे' असाही त्याचा अर्थ लावला जातो!

– भानू काळे
bhanukale@gmail.com

लोकसत्ता Fri, 11 March 2022
https://epaper.loksatta.com/c/66745098



**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# हिंदीचे अतिक्रमण

**हे वाक्य** वाचा- 'त्या समारंभाला खूप लोक जमले होते. वक्ते मुद्देसूद बोलले. तो समारंभ छान साजरा झाला.'

या वाक्यरचनेऐवजी अनेक मराठी भाषक हिंदीच्या अंधानुकरणाने 'तो समारंभ संपन्न झाला,' असे बोलतात आणि लिहितातही. 'संपन्न होना' याचा हिंदी भाषेत अर्थ आहे - 'पूर्ण होणे, संपणे, व्यवस्थित पार पडणे'. मराठी भाषेत 'संपन्न' या संस्कृत भाषेतील तत्सम शब्दाचा अर्थ आहे - ने युक्त, श्रीमान, वैभवशाली, ऐश्वययुक्त. उदा- धनसंपन्न, ज्ञानसंपन्न, आशयसंपन्न इत्यादी. दि. ७ फेब्रुवारीच्या 'लोकसत्ता'तील संपादकीयात '(लता) दीदींना प्रत्येकास स्वरसंपन्न करण्याची जिद्द अंगी बाळगावी लागली,' असे वाक्य आहे. स्वरसंपन्न - स्वरांनी श्रीमंत, वैभवशाली असा या शब्दाचा अर्थ. वर दिलेल्या शब्दांचे अर्थही धनाने श्रीमंत (धनसंपन्न), ज्ञानामध्ये वैभवशाली (ज्ञानसंपन्न), आशयामुळे श्रीमान, आशयाने युक्त (आशयसंपन्न) असे आहेत.

१६ फेब्रुवारी २०२२ च्या 'लोकसत्ता' या दैनिकात 'भाषासूत्र' या सदरात डॉ. नीलिमा गुंडी यांच्या लेखाचे शीर्षक आहे- 'नादसंपन्न वाक्प्रचार' त्यांनी लेखात वापरलेले शब्द आहेत- 'नादयुक्त', 'नादवलयामुळे' - शब्दांचा योग्य वापर लेखिकेने केला आहे.

मराठी भाषेत 'साजरा होणे' याचे अर्थ 'व्यवस्थित पार पडणे', 'सांगता होणे', 'पूर्तता होणे' असे आहेत. 'समारंभ साजरा झाला' हे वाक्य 'समारंभ उत्तम रीतीने पूर्ण झाला किंवा पार पडला,' याच अर्थाचे आहे.

मराठीतील त्या शब्दाचा प्रचलित, योग्य अर्थ नाकारून हिंदीतील अगदी वेगळ्या अर्थाचा शब्द स्वीकारणे योग्य नव्हे. मात्र 'संपन्न झाला' हीच वाक्यरचना योग्य आहे, सर्वमान्य आहे असे म्हणणारे अनेक मराठी भाषक आहेत. त्यांना मला एवढेच सांगायचे आहे, की आपली मातृभाषा आपणच विचारपूर्वक, काळजीपूर्वक जपायला हवी. अन्य भाषांचे अतिक्रमण रोखणे आपले कर्तव्य आहे.

शाब्दिक चुका - उपहारगृह की उपाहारगृह ?

'उपहार' याचा अर्थ देणगी, भेट, नजराणा असा आहे. 'उपाहार' - (उप आहार) याचा अर्थ अल्प आहार. फराळ असा आहे. जेथे फराळाचे, अल्प आहाराचे खाद्यपदार्थ मिळतात ते दुकान. त्यामुळे उपहारगृह हा शब्द चुकीचा आहे. उपाहारगृह हा शब्द बरोबर आहे.

**– यास्मिन शेख**





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# तळपायाला खाज नाही अन् आतड्याला लाज नाही...

**सकाळी सकाळी** शेजारच्या घरी काहीतरी अघटित घडले आहे याचा अंदाज आला. तो अचूक ठरला. जी शंका येत होती ती बरोबर ठरली होती. पमाक्कांचा एकुलता एक मुलगा बरीच वर्षे अंथरुणाला खिळून होता. तो गेला. तो त्या दुखण्यातून उठणार नाही याची कल्पना डॉक्टरांनी पमाक्कांना दिली होती. पमाक्कांनीही तो जितके दिवस आहे, तितके दिवस त्याचे सर्व व्यवस्थित करायचे हे व्रतच जणू घेतले होते. त्याचे अंथरुणातील सर्व सोपस्कार करतानाही दमत नव्हत्या, थकत नव्हत्या, त्यांना कसलीही घृणा येत नव्हती. त्यासाठी कधी सहानुभूती दाखवलेलीही त्यांना रुचत नसे. त्या आपले दुःख बाजूला सारत म्हणत असत, ''अहो ! मीच करायला पाहिजे त्याचं. लेकरू आहे ते माझं. उलट त्याचं सारं सारं करणं कामच आहे माझं. म्हणतात ना, 'तळपायाला खाज नाही आणि आतड्याला लाज नाही' तसंच आहे म्हणा हवं तर. त्याचं करणं हाच मला माझा धर्म वाटतो.''

काही म्हणी अनाहूतपणे ओठांवर येतात ! पण शरीर शास्त्राचे सूक्ष्म निरीक्षण नोंदवून जातात. आपल्या शरीरातला फक्त एक भाग असा आहे की त्याला सहसा कधी 'खाज' येत नाही. आणि तो म्हणजे 'तळपाय'. आणि एक नातेही असे आहे की त्या नात्यासाठी काहीही कष्ट घेताना आपल्याला 'लाज' वाटत नाही. कारण ते नाते आपल्या आतड्याचे असते, जसे आई आणि मुलाचे. या नात्याला जपताना, त्याची शी-शू काढताना आईला कसलेही कष्ट पडत नाहीत, त्रास होत नाही, कसलाही मोबदला तिला नको असतो. ती हे सारे स्वान्तसुखाय करत असते. तळपायाला जशी 'खाज' येत नाही, तशी या आतड्याच्या नात्याच्या आड कसलीही 'लाज' आडवी येत नाही. कारण कातड्यापेक्षा आतड्याची, अंतःकरणाची ओढ कितीतरी पटींनी जास्त असते. हेच ही म्हण सुचवून जाते.

आश्चर्य वाटले ते याचे की म्हणी माणसाच्या जीवनाशी काही काही वेळेला इतक्या एकरूप होऊन जातात, की त्या कितीतरी वेळेला अनाहूतपणे ओठावरती येतात. पमाक्कांच्या ओठांवर आली, तशा !

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचार आणि बोलींचा ढंग

**मराठीच्या विविध** प्रादेशिक बोली आहेत. साठोत्तरी साहित्यात जेव्हा दलित आणि ग्रामीण प्रवाह समाविष्ट होऊ लागले, तेव्हापासून साहजिकच लेखनातही बोलींचा वापर होऊ लागला. त्याची ही काही उदाहरणे आहेत.

'रिठावर दिवा न लावणे' या वाक्प्रचारातील 'रीठ' म्हणजे 'ओसाड जागा' आणि 'रिठावर दिवा न लावणे' म्हणजे 'निःसंतान होणे, घर पडून तेथे रीठ होणे' म्हणजेच सत्यानाश होणे. उद्धव शेळके यांच्या 'धग' या कादंबरीत संवादासाठी वऱ्हाडी बोली वापरली आहे. त्यातील कौतिक ही निरक्षर स्त्री संसारासाठी जिद्दीने संघर्ष करत असते. तिला फसवणाऱ्या सावकाराच्या जावयाला ती एकदा म्हणते, 'तुझ्याई रिठावर दिवा लावाले मानूस नाई राओ!' तिच्या मनातला राग आणि दुःख हा भावोद्रेक जणू एखाद्या शापवाणीसारखा या वाक्प्रचारातून व्यक्त झाला आहे.

'जीव धुकुडपुकुड करणे' म्हणजे घाबरणे, काळजी वाटणे.

प्र. ई. सोनकांबळे 'आठवणींचे पक्षी' या पुस्तकात मॅट्रिकच्या परीक्षेच्या वेळची स्वतःची अवस्था सांगतात, ती अशी : 'मनात सारखं धुकुडपुकुड चालू होतं की नापास झालो तर लोक काय म्हणतील!' - येथे त्या वयातील मानसिक ताण वाक्प्रचारातून व्यक्त होतानाच उलटसुलट विचारांची लयही पकडली जाते!









'भारूड लावणे' म्हणजे लांबलचक, कंटाळवाणी गोष्ट सांगणे. उत्तम बंडू तुपे यांचे 'काट्यावरची पोटं' हे आत्मकथन आहे. त्यात सतत उपदेश करणाऱ्या आईच्या बोलण्याचा कधी तरी येणारा कंटाळा व्यक्त करताना ते लिहितात : 'वाटायचं, काय हे भारूड लावलंय!' या वाक्प्रचारातून लेखकाच्या भावस्थितीचे दर्शन प्रांजळपणे झाले आहे.

'जीव टांगणीला लागणे', म्हणजे हुरहुर लागणे. रा. रं. बोराडे यांच्या 'धुणं' या ग्रामीण कथेतला एक प्रसंग! बायकांच्या गप्पा चालु असताना त्यातल्या एकीची कथनशैली दुसरीने या वाक्प्रचारातून कशी मार्मिकपणे वर्णन केली आहे; पाहा : 'लोकांचा जीव अदोगर टांगून टाकील, आन मग कापसातनं सरकी काढीत बसल्यावानी सारं सांगत बसेल!'

असे हे वाक्प्रचार लेखन प्रवाही तर ठेवतातच, शिवाय अर्थवाहीसुद्धा करतात.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# अश्शी जाहिरात सुरेख गं !

'**जाहिरातजगत आणि** मराठी' या आधीच्या लेखविषयाला जोडून आजचा हा भाग आहे, हे शीर्षकावरून आपल्या लक्षात आलं असेलच. त्या लेखात लिहिल्याप्रमाणे मराठी जाहिरातींमध्ये जास्तीतजास्त मराठी शब्द कसे वापरता येतील, यासाठी उदाहरणादाखल एका गृह प्रकल्पाच्या जाहिरातीत येऊ शकणारे काही शब्द पाहू.

'सुखसुविधायुक्त प्रशस्त घरांसाठी आजच नोंदणी करा. सवलत योजना फक्त आठ दिवस. सर्वोत्तम जीवनशैली, निसर्गपूरक राहणी, शहरातील सर्वोत्कृष्ट ठिकाणी. प्रकल्पातील सुविधा - अखंड पाणीपुरवठा, पर्यायी वीजपुरवठा, मोठा वाहनतळ, सुरक्षा व्यवस्था उपलब्ध. याशिवाय, व्यायामशाळा, मुलांसाठी खेळण्याची सुरक्षित जागा, वाळूत खेळण्याची सोय, बैठे खेळ, बंदिस्त जागेतले खेळ आणि मैदानी खेळांसाठी सुविधा. सांस्कृतिक केंद्र, विरंगुळा केंद्र मनोरंजन केंद्र अशा सर्व सोयी.' याव्यतिरिक्तही स्थावर मालमत्ता, चटई क्षेत्र, बांधकाम क्षेत्र, तारण, खरेदीकरार, गृहकर्ज, पुनर्विकास असे या क्षेत्रातले अनेक पर्यायी मराठी शब्द आहेत. शासकीय कामकाजात ते वापरलेही जातात, पण जर मराठीच्या स्वभावाप्रमाणे एका सामासिक शब्दाऐवजी सुटसुटीत शब्दसमूह जास्त सोपा वाटत असेल तर तसे शब्द वापरायला हवे. उदा. गृहकर्ज आणि घरासाठी कर्ज.

एकूणच वेगवेगळ्या क्षेत्रांमधला मराठी शब्दसाठा वाढण्यासाठी आणि रुळण्यासाठी त्या त्या व्यवसायातल्या भाषाप्रेमी व्यक्तींनी जागरूक राहून अशा शब्दसाठ्यात सतत सोप्या पर्यायांची भर घालत राहायला हवी. यासाठी बोलींमधल्या पर्यायांचाही विचार करता येईल. शेवटी हे कोणा एकट्या-दुकट्याचं काम नसून भाषा बोलणाऱ्या प्रत्येकाची ती जबाबदारी आहे. या कामाला चळवळीचं स्वरूप आलं, तर मोठ्या प्रमाणावर नवीन शब्द निर्माण होतील, काही जुने शब्द पुढे येतील, काही स्वीकारले जातील, काही नाकारले जातील अशी घुसळण घडेल. नवीन किंवा उपलब्ध पर्यायी शब्दांची चर्चा आणि यानिमित्ताने चर्चिलं जाणारं भाषेचं स्वरूप यावर केवळ अभ्यासकच नव्हे, तर भाषा बोलणाऱ्या सर्वांनीच विचारप्रवृत्त व्हायला हवं असं वाटतं.

मागील लेखातील 'टीझर' या शब्दासाठी अनेकांनी 'झलक', 'कुतूहलक' तर 'यूएसपी'साठी 'खासियत' असे शब्द सुचवले. या आणि यापूर्वीही शब्द सुचवणाऱ्या सर्वांचे आभार.

**– वैशाली पेंडसे- कार्लेकर**

vaishali.karlekar1@gmail.com





# सदोष वाक्यरचना

**अनेक मराठी** माणसांच्या बोलण्यात व लिखाणातही (दूरचित्रवाणीच्या मराठी मालिकांत कधी कधी ऐकू येणारी) आढळणारी पुढील सदोष वाक्यरचना वाचा- 'त्याने हे काम करायला पाहिजे नको होतं.'

या वाक्याचा अर्थ कळत नाही, असे नाही, पण वाक्यरचना चुकीची आहे, हे निश्चित. वरील वाक्यात 'पाहिजे' हे सकारात्मक क्रियापद आहे. 'नको' हे नकारात्मक क्रियापद आहे. या वाक्यात 'पाहिजे' या क्रियापदाची मुळीच आवश्यकता नाही. हे वाक्य असे हवे- 'त्याने हे काम करायला नको होतं.' 'पाहिजे नको होतं.' अशा चुकीच्या शब्दयोजनेमुळे आपल्या भाषेविषयी आपली अनास्था दिसून येते.

अशीच एक चमत्कारिक वाक्यरचना बोलण्यात ऐकलेली आहे. (अशी वाक्ये माझ्या वाचनात आलेली नाहीत.)

हे वाक्य असे आहे- 'तुला हे काम नाही आलं पाहिजे.' याही वाक्यात 'पाहिजे' हे क्रियापद अनावश्यक आहे. किंबहुना, ही वाक्यरचना सदोष आहे. हे वाक्य असे हवे- 'तुला हे काम जमणार नाही.' किंवा 'तुला हे काम करणं जमणार नाही.'

भाषेचा वापर करताना, आशय योग्य पद्धतीने व्यक्त होतो की नाही, याचा विचार अनेक जण करत नाहीत, हे आपल्या भाषेचे दुर्दैव होय. अशा वेड्यावाकड्या वाक्यांतील आशय आपण समजून घेतो, पण ही वाक्यरचना चुकीची आहे, या चुकीला विरोध करत नाही किंवा ती दुरुस्त करण्याचा प्रयत्नही करत नाही. ती आपण चालवून घेतो!

काही शाब्दिक चुका- अल्पसंख्यांक, बहुसंख्यांक या शब्दांत 'ख्या' या अक्षरावर अनुस्वार नको. या शब्दांचे स्वरूप असे आहे- अल्प संख्या क, बहु संख्या क. 'क' हा प्रत्यय आहे. या शब्दांचा अर्थ आहे- ज्यांची संख्या अल्प आहे ते अल्प संख्याक, ज्यांची संख्या बहु (खूप) आहे ते बहु संख्याक. ही विशेषणे आहेत. 'क' प्रत्यय लावलेले इतरही शब्द आपल्या परिचयाचे आहेत. अभ्यास क= अभ्यासक, संपादक, वाचक, पूजक इ.

**– यास्मिन शेख**

## चूकभूल

**'भाषासूत्र'** या सदरात २१ मार्चच्या अंकातील यास्मिन शेख यांच्या लेखात शेवटी 'अल्प संख्याक' व 'बहु संख्याक' असे शब्दरूप प्रसिद्ध झाले आहे. ते चूक असून ते 'अल्पसंख्याक' व 'बहुसंख्याक' असे एकत्रच हवेत. तांत्रिक दोषामुळे झालेल्या या चुकीबद्दल दिलगीर आहोत.



लोकसत्ता Mon, 21 March 2022
https://epaper.loksatta.com/c/66940825

भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# तवा खातो भाकर, चुल्हा भुकेला...

**एक खेडेगाव.** छान निसर्ग. शुद्ध हवा. निर्मळ वातावरण. सुखी, संपन्न, परंपरेचा वसा सांभाळणारी कर्ती मंडळी. तिथल्या दोन मैत्रिणी जिवाभावाच्या होत्या. एकीचे नाव गोदा आणि दुसरीचे भीमा. दोघींची लग्ने झाली. भीमा शेजारच्या गावात नांदायला गेली. दोघी आपापल्या घरात सुखी होत्या. पण गोदेचा पती अकाली गेला. तो कर्तृत्ववान, मनगटात खूप बळ असणारा होता. त्याने खूप मेहनत करून गाठी संपत्ती जमा केली होती. पुढच्या दोन, तीन पिढ्या सुखाने बसून खातील अशी तरतूदही घरात होती. पण गोदेचा मुलगा आपल्या वडिलांच्या निधनानंतर 'उतू नये मातू नये, घेतला वसा टाकू नये'ही उक्ती विसरला. सगळ्यांशी उद्दामपणे वागू लागला. त्याची झळ गोदेला फार लागू लागली. ती मनातल्या मनात कुढू लागली.

अशीच एकदा भीमा काही कारणाने गावात आली. दोघी बऱ्याच वर्षांनी एकमेकींना भेटल्या. भीमाने आपल्या मैत्रिणीची मनःस्थिती ओळखली. वडिलांनी मिळवलेल्या संपत्तीवर हा 'आयत्या बिळावर नागोबा' होऊन बसला आहे. याचा माज कोणीतरी उतरवायला पाहिजे. गोदाने भीमाला जेवायला बोलावले. जेवण झाल्यावर शिळोप्याच्या गप्पा सुरू झाल्या. सगळ्या लेकी सुनांनी तिला ओव्या म्हणण्याचा आग्रह केला. गोदेचा उद्दामपणे वागणारा मुलगाही तिथेच बसला होता. ही संधी साधून भीमा ओव्या म्हणू लागली.

*'तवा खातो भाकर, चुल्हा राही रे भुकेला,*

*अन पोहरा पितो पाणी, रहाट तहानलेला '*




... गोदेच्या त्या मस्तवाल मुलाला भीमा म्हणाली, ''पोरा ! ही खरे तर एक जुनी म्हण आहे. चालीत ऐकवली तुला. काही म्हणी समजायला खूप सोप्या पण फार अर्थगर्भित असतात, त्यातली ही म्हण आहे. जो मेहनत करतो तो कोरडाच राहतो आणि त्याचा लाभ मात्र दुसराच घेतो, खूपदा असे चित्र आपण बघतो. नाही का ? ज्यांच्या जिवावर तू उड्या मारतो आहेस, त्यांचे विस्मरण नको रे बाबा होऊ देऊस ! माझ्या मैत्रिणीला सुखात ठेव इतकंच मागणं आहे बाबा !'' आणि एका म्हणीने पोराच्या डोळ्यात अंजन घातले.


**- डॉ. माधवी वैद्य**

madhavivaidya@ymail.com

भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचार देतात पारखण्याची दृष्टी

**व्यक्ती असो** वा वस्तू, त्यांची पारख करण्याची दृष्टी कशी असावी लागते; याचा प्रत्यय काही वाक्प्रचार देतात.

'पितळ उघडे पडणे' या वाक्प्रचाराचा अर्थ आहे, मूळची क्षुद्र वृत्ती (दडलेले स्वरूप) लक्षात येणे. यामागे एक व्यावहारिक निरीक्षण आहे. सोन्याचा मुलामा (वर्ख) देऊन पितळ्याचे दागिने घडवले जातात. नवे असताना ते चमकतात. मात्र काही काळानंतर त्यावरचा वर्ख उडतो आणि आतले पितळ उघडे पडते. त्यातून हा वाक्प्रचार रूढ झाला आहे. त्यामुळे 'वरपांगी केलेला बहाणा लक्षात येणे' हा त्याचा भावार्थ आहे. वि. द. घाटे यांनी 'मनोगते' मध्ये डॉ. आनंदीबाई जोशी यांचे पती गोपाळराव जोशी यांच्याविषयी लिहिले आहे : 'गोपाळराव जोशी हे परस्परांत भांडणे लावण्यात आणि उभय पक्षांचे पितळ उघडे पाडण्यात वस्ताद होते.'

'पैलू पाडणे' हा वाक्प्रचार हिरा घडवण्याच्या प्रक्रियेशी संबंधित आहे. कार्बन या मूलद्रव्यापासून हिरा तयार करणे, ही कठीण गोष्ट असते. हिऱ्याला पैलू पाडावे लागतात, घाव सोसावे लागतात, तेव्हा त्यातील तेज झळाळून प्रगट होते. (पैलू म्हणजे बाजू, कोन) त्यामुळे पैलू पाडणे, या वाक्प्रचाराचा अर्थ एखाद्या व्यक्तीमधली सुप्त क्षमता ओळखणे



आणि ती प्रगट करण्यास त्याला मदत करणे, मार्गदर्शन करणे असा होतो. शिवाजी महाराजांच्या व्यक्तिमत्त्वाला पैलू पाडण्याचे काम त्यांच्या मातोश्री जिजाबाई यांनी केले, हे आपण जाणतोच.

'कसोटीस उतरणे' या वाक्प्रचारात मूळ शब्द आहे 'कसवटी' म्हणजे कस लावण्याचा दगड. कस म्हणजे सोने, चांदी यांची शुद्धता ठरवण्यासाठी त्या दगडावर मारलेली रेघ म्हणजेच ठरवलेले मान्यतेचे निकष होय. त्यामुळे कसोटीस उतरणे म्हणजे निकष पूर्ण करणे. आपण जेव्हा एखाद्या प्रसंगाची 'चौकशी' करतो, तेव्हाही चार कस (निकष) लावत असतो. 'का?, कोणी?, केव्हा?, कसे?', असे प्रश्न विचारून आपण ती घटना सखोलपणे जाणून घेत असतो.

एकूण जीवनव्यवहारात पारख डोळसपणे कशी करायची, याचे भान अशा मार्मिक वाक्प्रचारांमधून आपल्याला मिळते.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





# कर्नाटकी कशिदा

**पुण्याहून आलेल्या** माझ्या एका मैत्रिणीला मुद्दामून कारवारी जेवण खाऊ घालावे म्हणून कानडी मैत्रिणीकडे गेले. चित्रान्न (विशिष्ट प्रकारचा कानडी तिखट भात), केळ्याच्या गोड पोळ्या, तमळी (बेलाची कढी), कच्च्या पपईची मूगडाळ घातलेली कोशिंबीर, एकही थेंब तेल नसलेलं लोणचं असं बरंच काही तिने खाऊ घातलं आणि आपली व्यथा व्यक्त केली, ''मला स्वच्छ मराठी बोलता येत नाही याचं वाईट वाटतं! मला लोक अजूनही मी 'कानडी' आहे म्हणून पाहतात. माझे मराठी हेल कानडी येतात. त्यांनी मला ओळखता कामा नये, मी मराठीच वाटले पाहिजे''.

आश्चर्याने केळ्याच्या पोळीचा घास माझ्या हातातच राहिला. तुम्ही जन्माने कानडी आहात तर तसंच ओळखलं गेलात तर वैषम्य कसलं? तुमचे कानडी हेल ही तर श्रीमंती आहे. तसं तर संवादाच्या गरजेतून अनेकदा इतर भाषकांनी केलेले मराठी बोलण्याचे प्रयत्न हा मराठी भाषेचा एक आगळावेगळा साज आहे. त्या त्या भाषिकांच्या मातृभाषांचा गंध त्या त्या प्रदेशाचे हेल आणि उच्चार घेऊन आलेली मराठीची ही रूपं मला तरी श्रीमंत वाटतात!

कानडी घरात लग्न होऊन गेल्यावर मराठी स्त्रिया किती काळात कानडी शिकतील याचा अंदाज घेतला तर दोन-चार वर्षांत माझी बहीण, मैत्रीण शिकलेय असं पाच-सहा जणांनी सांगितले. महाराष्ट्रात लग्न होऊन आलेल्या, खेड्यापाड्यातल्या कानडी स्त्रिया मराठी हळूहळू शिकतात आणि सहज बोलू लागतात हा मात्र सर्वांचा अनुभव आहे. भाषेचा जन्म संवादाच्या गरजेतून झाला आहे. अशा इथं आलेल्या, या मातीशी एकरूप झालेल्या स्त्रिया हळूहळू का होईना मराठी शिकतात, हे किती अनमोल आहे. त्यांची मुलं दोन भाषा शिकतात, ही आणखी जमेची बाजू!

भले तुकाराम महाराजांनी 'कानडीने केला मराठी भ्रतारे एकाचे उत्तर एका न ये' असा अभंग रचला असला तरी सुरुवातीचा हा काळ सरल्यावर ही कानडी स्त्री कर्माने मराठी होतेच की! गुजरात, कर्नाटक, मध्य प्रदेश आणि आंध्र प्रदेश या राज्यांच्या सीमांचा सहवास मराठी भाषेला आहे. स्वाभाविकपणे त्या त्या सीमावर्ती महाराष्ट्रात जी मराठी बोलली जाते त्यात या भाषाभगिनींचा प्रभाव जाणवणारच.

जी. ए. कुलकर्णींच्या साहित्यातून कानडी शेजार डोकावतो. तसेच प्रकाश नारायण संत यांचा लंपन या भाषेतील अनेक शब्दांची ओळख आपल्याला करून देतो. 'तो मी नव्हेच'मधील निपाणीचा व्यापारी लखोबा लोखंडे त्याच्या कानडी-मराठीने आपल्या लक्षात राहिलेला आहे. कर्नाटकातल्या श्रवणबेळगोळ येथील शिलालेखात 'श्री चावुण्डराये करवियलें...' हे वाक्य आढळलेले आहे.

मराठी भाषेला किमान सात-आठ शतकं झपाटून टाकणारी व्यक्तिरेखा कानडी आहे असं सांगितलं तर काय वाटेल? पण तसं खरंच आहे. मराठी संतकाव्याची सत्त्वधारा ज्या भक्तीपात्रातून वाहते तिच्या उगमस्थानी तर एक थेट 'कानडा हो विठ्ठलु कर्नाटकु' असा कानडी माणूस निघाला! नुसता माणूस नव्हे तर थेट राजाच! तोही पंढरीचा!

'भाषा ही माणसाचं जीवन सहज, सुलभ आणि सजग करण्याचे साधन आहे. जीवन असह्य करून मिळवणारे साध्य नाही. तुमच्या कानडी जेवणाइतकीच मधुरता तुमच्या बोलण्यात आहे.' असे त्या कारवारी मैत्रिणीला सांगितल्यावर 'मुदुली चिन्ना' म्हणून तिने माझ्यावर जे प्रेम केले ते मला मराठीइतकेच गोड भासले.

– डॉ. निधी पटवर्धन
nidheepatwardhan@gmail.com





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# पांढरपेशा



**शेती किंवा** मजुरीऐवजी बैठे काम करून जे पोट भरतात त्यांना पांढरपेशा म्हटले जाते. या शब्दाची व्युत्पत्ती मजेदार आहे. शेतीच्या संदर्भात काळी जमीन आणि पांढरी जमीन असे दोन भाग केले जातात. काळी म्हणजे शेतीयोग्य जमीन. त्या जमिनीवर शेतकरी कष्टपूर्वक, घाम गाळून शेती करतो; सगळ्यांचे भरणपोषण करतो. 'काळी माय' असे शेतकरी जमिनीला म्हणतो ते त्यामुळेच. पांढरी जमीन म्हणजे गावठाणाची, म्हणजेच बिगरशेतीची. शब्दकोशात 'शेतीव्यतिरिक्त इतर धंद्यांवर किंवा पांढरीवर उपजीविका करणारा वर्ग' असा पांढरपेशा शब्दाचा अर्थ दिलेला आहे. यात बारा बलुतेदारही आले. पांढरीवर व्यवसाय, म्हणजे पेशा, करणारे ते पांढरपेशा. पुढे कृषिसंस्कृती मागे पडत गेली. कारखानदारी आली. कामगारवर्ग व नोकरदारवर्ग आला. त्यानंतर 'अंगमेहनतीचे काम न करणारे लोक' असा पांढरपेशा शब्दाचा अर्थ रूढ झाला.

कष्टकरी आणि पांढरपेशा याला समांतर असे इंग्रजीत ब्ल्यू कॉलर व व्हाइट कॉलर असे कर्मचाऱ्यांचे दोन भाग औद्योगिक क्रांतीनंतर मानले जाऊ लागले. कामगार सामान्यतः निळ्या रंगाचे जीन्स किंवा ओव्हरऑल असे कपडे घालत. ग्रीझ किंवा तेलाचे डाग त्या मळखाऊ रंगामुळे दिसत नसत. त्यांना ब्ल्यू कॉलर कर्मचारी म्हणत. याउलट बैठे काम करणाऱ्यांचे कपडे मळायची फारशी शक्यता नसे व त्यामुळे ती मंडळी पांढऱ्या रंगाचे कपडे घालत. कारखाने सोडून इतरत्र काम करणाऱ्या शिक्षक, बँक कारकून, सरकारी नोकर वगैरे मंडळींचाही याच व्हाइट कॉलर वर्गात समावेश असे. या दोन्ही कर्मचारी वर्गांच्या संघटनादेखील वेगवेगळ्या असत.

आज संगणकीय युगात अर्थातच परिस्थिती पार पालटली आहे. कष्टाची कामे बहुतांशी यंत्रे करतात; पूर्वीसारखा कामगारांना घाम वगैरे गाळावा लागत नाही, कपडे मळायचा फारसा प्रसंगच येत नाही. कारकून बसतात ती कार्यालयेही खूपदा वातानुकूलित असतात. दोघांच्या कपड्यांमध्येदेखील काही फरक राहिलेला नाही. पण तरीही ब्ल्यू कॉलर व व्हाइट कॉलर हे शब्दप्रयोग वापरात आहेत. काळाच्या ओघात शेतीकाम करणाऱ्यांची संख्या कमी कमी होत चालली आहे आणि पांढरपेशावर्गाची संख्या वाढत चालली आहे. वाचन-लेखन करणारे व बुद्धिजीवी मानले जाणारे लोक बहुतांशी याच पांढरपेशावर्गात मोडतात.

– भानू काळे

bhanukale@gmail.com





# एकमेकांची 'रूपे' आणि चुकीचे 'बरोबर'

**हे वाक्य** वाचा- 'तुम्ही दोघी मैत्रिणी आहात. एकमेकांना मदत करणे तुमचे कर्तव्य आहे' हे वाक्य चुकीच्या शब्दयोजनेमुळे सदोष आहे. एकमेकांना- मूळ शब्द एकमेक, अर्थ आहे परस्पर, अन्योन्य. हे विशेषण आहे. पण **या विशेषणाची सामान्यनामासारखी वाक्यात योजना करता येते, ज्या नामासाठी ते योजिले आहे त्या नामाच्या लिंग, वचनप्रमाणे त्याचे रूप बदलते.** दोन पुरुष, दोन मित्र किंवा भाऊ इ.च्या संदर्भात एकमेकांना असे पुल्लिंगी रूप होते. दोन स्त्रिया, मुली, मैत्रिणी इत्यादींच्या संदर्भात एकमेकींना असे स्त्रीलिंगी रूप होते. लहान मुले, बाळे या नपुंसकलिंगी शब्दांच्या संदर्भात एकमेकांना असे नपुंसकलिंगी रूप होते. जसे दोन पुरुष- त्या दोघांनी परस्परांशी बोलणे टाळले. दोन बाळे- या बाळांचे एकमेकांना मारणे चालूच आहे, अशी वाक्ये. मात्र आपण उदाहरणादाखल घेतलेले वाक्य दोन स्त्रियांच्या संदर्भात आहे. ते असे हवे- 'तुम्ही दोघी मैत्रिणी आहात. एकमेकींना मदत करणे तुमचे कर्तव्य आहे.'

## 'स्र' कुठे आणि 'स्त्र' कुठे?

काही शब्दांच्या उच्चारात आणि लेखनात होणाऱ्या काही चुकांकडे दुर्लक्ष करू नये. स्र आणि स्त्र या अक्षरांची फोड अशी आहे. - स्र = स+र, स्त्र = स +त +र आता पुढील शब्द वाचा. सहस्र ऐवजी सहस्त्र लिहिल्यास स्त्र हे चुकीचे अक्षर ठरते. अजस्र (स्त्र ×), हिंस्र (स्त्र ×), स्राव ऐवजी स्त्राव चुकीचे रूप. आता स्त्र अक्षर असलेले काही शब्द- अस्त्र, शस्त्र, शास्त्र, इस्त्री, स्त्री, वस्त्र या शब्दांतील स्र आणि स्त्र यांच्या बिनचूक योजनेमुळे भाषेवर होणारे अनेक अन्याय टळतील.

आणखी एक चुकीची शब्दयोजना अनेकांच्या बोलण्यात आणि लेखनातही होत असते. हे वाक्य वाचा- 'तू त्याच्यासोबत अजिबात बोलू नकोस.' या वाक्यात 'त्याच्यासोबत बोलणे' ही चुकीची शब्दयोजना आहे. 'त्याच्यासोबत' याऐवजी 'त्याच्याशी' हा शब्द योग्य आहे. हे वाक्य असे हवे- 'तू त्याच्याशी अजिबात बोलू नकोस.' असेच आणखी एक वाक्य ऐकू येते- 'तो तिच्याबरोबर खूप प्रेम करतो.'- अचूक वाक्य अर्थातच, 'तो तिच्यावर खूप प्रेम करतो.'

– यास्मिन शेख

लोकसत्ता Fri, 28 March 2022

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# धडम धाडवा आणि...

**लतिकाबाई म्हणजे** अतिउत्साहाने वाहणारा ऊर्जेचा स्रोत. आळस, निरुत्साह, उदासीनता वगैरे वगैरे शब्द त्यांच्या रोजनिशीतच नव्हते. महिला मंडळात सगळ्या बायकांची जमण्यासाठी जी वेळ ठरलेली असेल त्याच्या किमान अर्धा तास आधी लतिकाबाई तिथे हजर असणारच. आपण कसे सर्वांच्या आधी हजर असतो, आपण कशा सर्वांना आदर्श ठरतो, याबद्दल आपलीच आपण बढाई मानण्याचा सोस वाटणाऱ्या या लतिकाबाई!

सगळे कसे भराभर उरकण्याकडे कल असायचा त्यांचा. म्हणजे उद्या सत्यनारायणाची पूजा असली तर आजच पूजेची तयारी झाकपाक करून ठेवलेली असायची. प्रत्येक सणवार हा त्यांच्या उत्सवी स्वभावाला निमंत्रण असायचे. अशा त्यांच्या स्वभावाला त्यांचे वयही रोखू शकले नाही. पन्नाशी आली तरी त्यांचे हे धडाडधाड वागणे सर्वांनाच दमवणारे होते. तशातच त्यांच्या मुलाचे लग्न ठरले, सुनेला दिवसही राहिले. मग काय विचारता! अर्थातच त्यांच्या उत्साहाची नदी दुथडी भरून वाहू लागली. त्या म्हणू लागल्या, ''माझं बाई कसं वेळेच्या आधीच सर्व तयार असतं! डोहाळजेवणाची, बारशाचीही तयारी जवळजवळ पूर्ण झाली. सुनेला दिवस जाता क्षणीच माझ्या मनात पाळणा हलायला लागला. परवाच मी छानशा पाळण्याची ऑर्डर देऊनही आले.''

हे त्यांचे वागणे इतरांच्या दृष्टीने कौतुकाचे आणि उत्साहाचे वाटत असले तरी हा उत्साह त्या सुनेला आणि तिच्या घरच्यांना पचवणे जरा अवघडच जात होते. एकदा सुनेच्या आईला तिच्या मैत्रिणीने विचारले, ''काय गं, तुझ्या लेकीची सासू अगदी उत्साही दिसते आहे!'' तेव्हा तिची आई तिला म्हणाली, ''खरं सांगू का? तिची सासू म्हणजे 'धडमधाडवा आणि अवसेला पाडवा' आहे बघ.'' त्या मैत्रिणीने विचारले, ''म्हणजे?'' त्यावर तिची आई म्हणाली, ''अगं, म्हणजे अतिच उत्साह. उतावीळपणा म्हणजे इतका की अमावास्येलाच पाडव्याची गुढी उभारतील आणि त्याचा परत गाजावाजाही करतील. जरा सबुरी म्हणून कशी ती नाहीच बघ. त्यांच्याशी जमवून घेता घेता पोरीची दमछाक होते गं.''

– डॉ. माधवी वैद्य
madhvivaidya@ymail.com





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचार आणि विविध व्यवसाय

आपली भाषा समाजाच्या सर्व स्तरांपर्यंत पोहोचली आहे. त्यामुळे तिच्यात विविध व्यवसायांशी निगडित अनेक वाक्प्रचार आढळतात.

आपल्याकडे शेती हा मोठा व्यवसाय आहे. 'खंडोगणती' हा वाक्प्रचार शेतीशी संबंधित आहे. यात खंडी हा मूळ शब्द आहे. खंडी हे धान्य मापण्याचे एक प्रमाण होय. वीस मणाची एक खंडी. त्यामुळे 'खंडोगणती' म्हणजे पुष्कळ असा अर्थ रूढ झाला आहे. उदा. -आपल्या देशात खंडोगणती बोली आहेत.

'उचलबांगडी करणे' हा वाक्प्रचार मच्छिमारीच्या व्यवसायाशी नाते सांगतो. मुळात तेथे 'पांगडी' असा शब्द आहे. त्यात बदल झाला. पांगडी म्हणजे मासे धरण्यासाठी मच्छिमार (कोळी) वापरतात ते मोठे जाळे. ते जाळे इतके मोठे असते, की अनेक जणांनी चारी बाजूंनी धरून ते उचलावे लागते! त्यातून पुढे उचलबांगडी करणे म्हणजे हकालपट्टी करणे, उच्चाटन करणे, असा अर्थ रूढ झाला.

'मात्रा न चालणे' म्हणजे उपाय न चालणे. मात्रा हा शब्द वैद्यकीय व्यवसायातील आहे. मात्रा म्हणजे रोगावर इलाज करण्यासाठी दिलेले औषध, औषधाचे प्रमाण. आयुर्वेद उपचारपद्धतीत



औषधाची विशिष्ट मात्रा देतात. त्यामुळे मात्रा न चालणे म्हणजे उपाय न चालणे होय.

'रुकार देणे' म्हणजे होकार देणे. रुकार हा शब्द प्रशासनाशी संबंधित आहे. त्यात 'रु' फारसी असून 'कार' संस्कृत भाषेतील आहे. त्यातले 'रु' हे अक्षर रुजवात या शब्दाचे पहिले अक्षर आहे. रुजवात /रुजुवात म्हणजे निरनिराळे हिशेब, कागद इत्यादी समक्ष ताडून पाहणे आणि रुकार म्हणजे नक्कल मान्य करताना केलेले चिन्ह होय. त्यातून 'संमती देणे' या अर्थी हा वाक्प्रचार रूढ झाला.

सोनाराने कान टोचणे, माप पदरात घालणे असे इतरही अनेक वाक्प्रचार आठवतात. भाषेच्या जीवनस्पर्शित्वाची ते जणू ग्वाही देत असतात.

दिवंगत विचारवंत श्री. म. माटे यांनी चर्मकार, रंगारी, सुतार आदींच्या भाषेतून आलेल्या वाक्प्रचारांविषयी 'भाषाभिवृद्धीची सामाजिक दृष्टी' (साहित्यधारा, १९४३ ) हा लेख लिहिला आहे. जिज्ञासू वाचकांनी तो लेखही जरूर वाचावा.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# महोदया आणि महोदय, इकडे लक्ष द्याल का?



''**मॅडम, मराठी** सब्जेक्ट चेंज करायचा आहे. काय प्रोसीजर आहे?'' खरं सांगायचं तर अशी वाक्यं महाविद्यालयात किंवा कुठेही कानावर पडणं यात आज मोठं आश्चर्य वाटत नाही.

मराठी वाक्यात आलेल्या इंग्रजी शब्दांकडे लक्ष द्यावं की इंग्रजीमिश्रित का होईना काही मराठी शब्द वापरून तरी बोललं आहे, यात समाधान मानावं असा प्रश्न पडतो.

शाळा, महाविद्यालय अशा ठिकाणी आज 'बाई' आणि 'गुरुजी' या शब्दांची जागा 'मॅडम' किंवा 'मॅम' आणि 'सर' या शब्दांनी घेतली आहे. फक्त शिक्षक किंवा प्राध्यापकच नव्हे तर इतरत्रही आदरार्थी उल्लेख करण्यासाठी हे शब्द वापरले जातात. ज्या परभाषीय शब्दाचं मराठीत सामान्यरूप होऊन तो मोठ्या प्रमाणावर वापरला जातो, तो शब्द मराठी झाला असं मानलं जातं. यानुसार मॅडमना, सरांना असा उल्लेख होत असल्याने हे शब्द आता मराठीच झाले असं म्हणावं का? या शब्दांना अजून काही पर्यायी शब्द पुढे आणता येतील का?

'बाई' आणि 'गुरुजी' ही आधीची संबोधनं आता क्वचितच ऐकू येतात. ती पुन्हाही वापरता येतील. काही ठिकाणी शाळेतल्या शिक्षकांना 'ताई', 'दादा' असंही संबोधलं जातं, त्याचंही अनुकरण करता येईल. इतर काही सामाजिक संपर्कातही एकमेकांना 'ताई', 'दादा' असे संबोधलं जातं, पण वेगळा पर्याय हवा असेल तर 'महोदय' आणि 'महोदया' असंही संबोधता येईल. कार्यालय किंवा इतर औपचारिक संपर्कात 'महोदय', 'महोदया' हे शब्द लेखी वापरात आहेत, पण तिथल्या बोलण्यातही ते अजून मोठ्या प्रमाणात वापरता येऊ शकतील. आदरार्थी उल्लेख करण्यासाठी 'श्रीमान', 'श्रीमती' हे शब्द तसंच पुरुषांच्या नावानंतर लावण्यात येणारं 'राव' हे एक संबोधन पुन्हा लक्षात घेता येईल.

शेवटी कोणत्याही शब्दाला तो कोणत्या हेतूने आणि संदर्भात वापरला आहे त्यातून अर्थ लाभतो. 'मॅडम' आणि 'सर' हे शब्द अनेक क्षेत्रांमध्ये वापरल्याने रुळले. पण सरधोपटपणे त्यांचा वापर करून त्यांना काही पर्यायच नाही असं न समजता, संदर्भानुसार वेगवेगळे पर्याय नक्की सुचवले पाहिजेत आणि वापरले पाहिजेत असं वाटतं.

तुम्हाला काय वाटतं?

**– वैशाली पेंडसे-कार्लेकर**
vaishali.karlekar1@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# तंतोतंत आणि नक्कल

**दोन गोष्टी** जेव्हा एकमेकांशी अगदी पूर्णतः जुळणाऱ्या असतात, तेव्हा 'त्या तंतोतंत जुळणाऱ्या आहेत' असे म्हटले जाते. तंतू म्हणजे धागा या मूळ संस्कृत शब्दापासून बनलेला हा शब्द. असे असंख्य तंतू एकात एक गुंफून एखादे वस्त्र विणले जाते. दोन वस्त्रे जर अगदी एकसारखी असायला हवी असतील, तर त्यांचा प्रत्येक तंतू एकमेकांशी जुळायला हवा; कारण त्यांच्यात थोडा जरी फरक असला तरी मग ती अगदी एकसारखी दिसणार नाहीत. धागा न् धागा म्हणजेच 'तंतू अन् तंतू' हे शब्द जोडून 'तंतोतंत' हा शब्द आला.

या तंतू शब्दाला संस्कृत शब्दकोशात दुसराही एक अर्थ आहे. तो म्हणजे तार. बोटाने तार छेडून वाजवली जाणारी एकतारी, वीणा, तंबोरा, सतार वगैरे वाद्ये म्हणजे तंतुवाद्ये.

मैफल सुरू करण्यापूर्वी त्या तारा एकमेकांशी नीट जोडून घ्याव्या लागतात. त्यावरून 'तंतोतंत म्हणजे सुरात लावलेले वाद्य' असाही एक अर्थ आहे. 'त' या एकाच अक्षराचा वापर करून बनलेला चार अक्षरी शब्द हेही या शब्दाचे एक वैशिष्ट्य. बोंबाबोंब हा तसाच आणखी एक शब्द.

तंतोतंत शब्दाशी विरोधार्थाने संलग्न म्हणता येईल असा एक शब्द म्हणजे 'नक्कल'.

हा शब्द मूळ 'नकल्' असा असून तो अरबी शब्द आहे. 'मूळ प्रतीबरहुकूम तयार केलेली प्रत' हा त्याचा अर्थ. मुद्रणाचा शोध लागायच्या आधी याला खूपच महत्त्व होते; कारण हाताने लिहूनच कुठल्याही कागदपत्राच्या किंवा पोथीच्या अधिक प्रती काढल्या जात. एकावरून दुसरी प्रत, दुसरीवरून तिसरी. अशा वेळी प्रत्येक प्रतीमागे थोडा-थोडा जरी फरक पडत गेला, तरी विसाव्या-तिसाव्या प्रतीत तो खूपच लक्षणीय असणार होता. म्हणूनच दुसरी प्रत मूळ प्रतीशी अगदी कानामात्रा जुळणारी असणे, म्हणजेच तंतोतंत जुळणारी असणे, आवश्यक होते. पुढे केव्हा तरी 'नकल'पासून नकली (म्हणजे बनावट) हा खोटेपणाचा आरोप करणारा, दुर्गुणसूचक शब्द आला. जसे की, 'नकली मालापासून सावध राहा.' मराठीत त्यातून नकलाकर किंवा नकल्या हा अगदी वेगळ्या अर्थाचा, कलादर्शक शब्दही बनला; जो मूळ अरबीत नाही. 'नक्कल करणे' (मिमिक्री) या कलेतून पुढे 'एकपात्री प्रयोग' हा मंचीय आविष्कारही तयार झाला! एकाच शब्दातून काळाच्या ओघात किती वेगवेगळे अर्थ प्रसवतात!

– भानू काळे
bhanukale@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# एक 'लेणे', अनेक 'लेणी'



'अजिंठ्याची लेणी' म्हणजे अनेक गुंफा... पण 'अजिंठा असा उल्लेख होताच चटकन आठवते ते या लेण्यांपैकी लेणे क्र. १ मधील 'पद्मपाणि बोधिसत्व' हे भित्तिचित्र!

**ही वाक्ये** वाचा- '*अजिंठ्याच्या लेण्या औरंगाबाद शहरापासून दूर असल्या, तरी मी त्या पाहायला गेलो होतो. त्या लेण्यांतील एक लेणी मला खूप आवडली.*' ही दोन्ही वाक्ये सदोष ठरतात, कारण या वाक्यांत 'लेणी' (स्त्रीलिंगी एकवचनी नाम) आणि लेण्या (स्त्रीलिंगी, अनेकवचनी नाम) हे दोन्ही शब्द चुकीचे आहेत. त्यामुळे दोन्ही वाक्यरचना सदोष आहेत. मराठी भाषेत 'लेणी' हे स्त्रीलिंगी एकवचनी नाम नसून लेणे (लेणं) हे नाम नपुंसकलिंगी एकवचनी आहे. या नपुंसकलिंगी नामाचे अनेकवचन 'लेणी' असे आहे. लेणी (स्त्रीलिंगी), लेण्या (स्त्रीलिंगी अनेकवचनी) असे चुकीचे शब्द योजल्यामुळे या वाक्यांतील इतर शब्दांच्या रूपांवरही परिणाम झाला आहे. ही वाक्ये अशी हवीत- '*अजिंठ्याची लेणी (न.पु.अव) औरंगाबाद शहरापासून दूर असली, तरी मी ती (न.पु.अ.व.) पाहायला गेलो होतो. त्या लेण्यातील एक लेणं (लेणे) मला खूप आवडलं (ले).*'

पुष्कळदा मराठी सुशिक्षित भाषकही लिहिताना आणि बोलताना ही चुकीची वाक्यरचना करतात, शब्दांच्या लिंग, वचनाकडे दुर्लक्ष करतात. अनेकांनी योजलेली ही चुकीची रचनाच बरोबर आहे, प्रचलित आहे, तेव्हा तीच ग्राह्य धरावी, असा आग्रह करतात. हे मी माझ्या अनुभवावरून सांगते आहे. वाचकांना मला एक विनंती करायची आहे, - नामाची वाक्यांत योजना करताना त्या नामाच्या लिंग- वचनाकडे दुर्लक्ष करू नका.

## 'सृज्' पासून 'सर्जन'

काही शाब्दिक चुका- प्रामुख्याने लेखनात होणाऱ्या चुका आपल्याला सहज टाळता येतील. सृज् या संस्कृत धातूपासून तयार होणारे शब्द आहेत- सर्जन (नाम), सर्जनशील (विशेषण), सर्जनशीलता (भाववाचक नाम). पण बहुतेक सुशिक्षित, सुसंस्कृत मराठीभाषक या शब्दांऐवजी सृजन, सृजनशील, सृजनशीलता अशी चुकीची रूपे बोलताना-लिहिताना योजतात. 'सर्जन' या शब्दाला 'वि' उपसर्ग लागून होणारा शब्द 'विसर्जन' मात्र आपण सर्व जण बिनचूक उच्चारतो आणि लिहितोही. (वसंत बापट यांनी त्यांच्या 'गगन सदन तेजोमय' या निसर्गपूजक प्रार्थनेत 'सृजन तूच, तूच विलय' हा शब्दप्रयोग योजला आहे. पण कवीला स्वातंत्र्य असते. (निरंकुशाः कवयः) कवी केशवसुतांनी 'तुतारी' या कवितेत 'भेदुनि टाकीन सगळी गगने' गगन या शब्दाचे अनेकवचनी रूप (अस्तित्वात नसलेले) वापरले आहे!)

– यास्मिन शेख

लोकसत्ता Mon, 04 April 2022
https://epaper.loksatta.com/c/67233633



**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# आपलं आपलं ओळखलं आणि खिरीवर तूप झटकलं...

**क्षमा आणि** प्रेमा दोघी सख्ख्या बहिणी, सख्ख्या जावाही होत्या. आता अशी चित्रे फारशी दिसत नाहीत. क्षमाच्या लग्नातच तिच्या दिराने प्रेमाशी लग्न करण्याची आपली इच्छा प्रकट केली आणि दोन्ही कुटुंबांना ती मान्यही झाली. पण जसजसे दिवस पुढे सरकू लागले तसतसा दोघी बहिणींच्या स्वभावातील फरक सगळ्यांच्या लक्षात येऊ लागला.

क्षमा दररोजच्या वागण्यात स्वतःच्या आणि प्रेमाच्या मुलांमध्ये आपपरभाव कधीच करीत नसे. आपली मुलं तशीच प्रेमाची मुलं म्हणून त्यांच्याकडेही तितक्याच प्रेमाने बघत असे. पण प्रेमाचे तसे नव्हते. आधी आपली मुलं आणि मग क्षमाची मुलं असा क्षमाच्या मुलांकडे बघण्याचा तिचा खाक्या होता. तसे तिचे हे वागणे सगळ्यांच्या लक्षात आलेले होते नाही असे नाही. पण कोणी काही फारसे न बोलता त्याकडे दुर्लक्ष करीत असत. पण मुले मोठी झाली आणि आजीजवळ रोज ती एकमेकांच्या तक्रारी करू लागली. ''आजी! आज ना काकूने आम्हाला एकच लाडू दिला. त्या दोघांना मात्र दोन दोन लाडू दिले.''



आजी शहाणी होती. तिने दोघी बहिणींना बोलावले आणि त्या दोघींना समजावून सांगितले, ''दोघी सुखाने एकत्र नांदाल असा आमचा कयास होता. पण दुर्दैवाने खोटा ठरला. वाटलं होतं, बहिणी बहिणी जावा झालात की हे सहजच जमून येईल. पण प्रेमा, तू निराशा केलीस. तू घरात वागताना आपपरभावाने वागते आहेस. तुझं वागणं म्हणजे 'आपलं आपलं ओळखलं अन् खिरीवर तूप झटकलं' असं आहे. तुझा स्वभाव काही बदलणार नाही. तुझ्या मुलांच्या पानात आपोआप दोन चमचे तूप जास्तच पडणार आणि तुझ्या पुतण्यांच्या पानात दुजाभावाने काही तरी कमीच वाढले जाणार! ही गोष्ट जास्त वाढीस लागायच्या आतच आपण थांबलेले बरे! असा विचार आम्ही केला आहे. दोघींनी दोन संसार मांडा आणि सुखाने राहा, असे आम्हाला वाटते आहे.''

अखेर दोघींचे दोन संसार मांडले गेले आणि सर्वच सुखात नांदू लागले.

**– डॉ. माधवी वैद्य**
madhavivaidya@ymail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचार आणि रंगभूमी

**'पुण्यातील मेट्रोच्या** श्रेयवादावरून राजकीय पक्षांमध्ये कलगीतुरा चालू आहे', असे वाक्य वाचनात आले आणि विविध वाक्प्रचारांचे रंगभूमीवरील सादरीकरणाशी असलेले नाते शोधावेसे वाटले. कलगीतुरा चालणे म्हणजे स्पर्धा चालणे, श्रेष्ठत्वावरून भांडण चालणे असा अर्थ आहे. मुळात कलगी आणि तुरा हे शब्द लावणीशी संबंधित आहेत. लावणी हे रंगभूमीवरून सादर होणारे एक प्रकारचे लोकनृत्य आहे. 'नाटक आणि रंगभूमी परिभाषासंग्रह' या कोशात डॉ. विलास खोले यांनी कलगी व तुरा या शब्दांवर प्रकाश टाकला आहे, तो असा : कलगी आणि तुरा हे दोन्ही शब्द फारसी असून ती शिरोभूषणांची नावे आहेत. हे शब्द आपल्याकडच्या एकेकाळच्या आध्यात्मिक वादाचे प्रतिनिधित्व करतात. त्यावर आधारित गटांमधल्या शाहिरांचे सवाल जवाब रंगत असत. कलगी हे शक्तिपक्षाचे चिन्ह, तर तुरा हे शिवपक्षाचे चिन्ह होय. कलगी तुळशीच्या मंजिरीसारखी दिसते आणि तुरा मक्याच्या कणसावर असलेल्या शेंगडीसारखा दिसतो. हे संदर्भ आज विस्मरणात जमा झाले तरी त्यातील मूळ स्पर्धेचा भावार्थ वाक्प्रचारात टिकून राहिला आहे.

'सुधारक' कर्ते गोपाळराव आगरकर यांच्या पत्नी यशोदाबाई आगरकर यांनी लग्नानंतर पुणे ते कऱ्हाड हा प्रवास बैलगाडीने केला, तेव्हा त्या कष्टदायक प्रवासाच्या आठवणी सांगताना यशोदाबाई लिहितात : 'पुण्यास होणाऱ्या माझ्या भावी सासुरवासाची ती नांदीच झाली म्हणावयाची!' यातला 'नांदी' हा शब्द नाटकाशी संबंधित आहे. नांदी म्हणजे नाटकाच्या सुरुवातीला देवतेला उद्देशून म्हटलेले प्रार्थनागीत असते. त्यामुळे नांदी होणे म्हणजे सुरुवात होणे, असा वाक्प्रचार रूढ झाला. काही वेळा नांदी ही नाटकातील अनुभवाचे सूचन करणारी असते. त्यामुळे पुढच्या बिकट आयुष्याची कल्पना सुरुवातीलाच आली, हाही अर्थ वरच्या वाक्यातून व्यक्त झाला आहे.

नाटक म्हणजे नटांच्या साहाय्याने केलेला रंगमंचीय खेळ / प्रयोग होय. मात्र व्यवहारात 'नाटकं करणे' म्हणजे ढोंग करणे, असा वाक्प्रचार रूढ आहे. तमाशा पाहणे ( दुरून मजा पाहणे ), पडदा पाडणे ( दृष्टिआड करणे ) असे इतरही वाक्प्रचार येथे आठवतात.

**– डॉ. नीलिमा गुंडी**
nmgundi@gmail.com

लोकसत्ता
Wed, 06 April 2022
https://epaper.loksatta.com/c/67273471



**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# आय वॉण्ट अभिजात मराठी!




‘‘**चल की** पक्या, खेळायला,’’ असे मित्रांनी म्हटल्यावर ‘‘नको रं ‘मम्मी’ माका वरडल,’’ असं गावातल्या पोराचं उत्तर कानावर पडलं! तेव्हा असं वाटलं की, का बरं हा पोरगा ‘मम्मी’ म्हणतो आहे? अर्थातच त्याच्या लहानपणी त्याच्या पालकांनी त्याला तसं म्हणण्याची सवय लावली असणार. मध्यम वर्गात मम्मी, पप्पा, उच्च मध्यम वर्गात मम्मा, पपा, मॉम, डॅडी असं म्हटल्याने आपण आधुनिक होतो का? आपल्या मुलाने आपल्याला मम्मी म्हणावं असं वाटणंच मुळी गुलामीचं लक्षण नव्हे का? परंतु पालक मुलांना ते मिरवायला लावतात, हे दुर्दैव आहे.

अशा बाह्य अनुकरणाने आपण नेमकं काय साधणार आहोत? एतद्देशीयांपेक्षा निराळ्या, खास त्यांच्याच संस्कृतीत आहेत अशा संकल्पनांसाठी आवश्यक आणि अपरिहार्य तिथे इंग्रजी जरूर वापरावी, त्याला ना नाही. किंबहुना मराठी इंग्रजीसह सोबत घेऊन जावी लागणार आहे हे ढळढळीत दिसतं आहे पण लग्नाच्या निमंत्रण पत्रिका, मंदिरांचे जीर्णोद्धार, बारशाच्या पत्रिका कशासाठी रोमन लिपीत छापायच्या?

‘माझी भाषा तितकीशी सक्षम नाही, ती जगाच्या बाजारपेठेत माझ्या मुलाला नोकरी मिळवून देणार नाही’ अशा अवाजवी भीतीमुळे इंग्रजी माध्यमाच्या शाळांचा आधार घेतला जातो. महाविद्यालयांच्या भाषा विभागांनाही त्यांचे अहवाल नॅकसाठी इंग्रजीतून देण्याची सक्ती आहे. राष्ट्रीय परिषदेचे बीजभाषण इंग्रजीत केले नाही तर जणू काही आपण सुशिक्षित ठरणार नाही असे वक्त्यास वाटते की काय नकळे.

स्वातंत्र्यापूर्वी भाषेचा जो स्वाभिमान आमच्यात होता तो आता बहुतेक उरलेलाच नाही. आपण मनाने दास झालेलो आहोत हे कबूल केले पाहिजे. इंग्रजी आता भारतीय भाषा झालेली आहे, तिला परकीय म्हणू नका, असेही काहींचे मत आहे. ती आता भारतीय भाषा झालीच आहे तर, हळूहळू ती पुढच्या पिढ्या-पिढ्यांची निजभाषाही बनेल अशी स्थिती आहे. आज मराठी भाषेला अभिजात म्हणून दर्जा मिळवा यासाठी महाविद्यालयांमध्ये छोटे छोटे मंडप घालून विद्यार्थ्यांकडून पोस्ट-कार्डावरती फक्त सह्या घेतल्या जात आहेत. अरे, निदान एक पत्र तरी त्यांना स्वतःला लिहू द्या. तेही छापून आणलेले आहे आणि त्या पत्रावर स्वाक्षऱ्या मुलं रोमन लिपीतून करत आहेत यासारखे दुर्दैव ते काय?

**– डॉ. निधी पटवर्धन**
nidheepatwardhan@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# दहशत आणि हप्ता

**काही शब्द** चांगल्या तसेच वाईट अर्थानेही वापरले जातात. त्याची ही दोन उदाहरणे.

दहशत शब्दाचे मूळ 'दहशत्' या अरबी शब्दात आहे. भीती किंवा धाक हा त्याचा एक अर्थ. जसे की, दहशत निर्माण करणे म्हणजे 'भीती निर्माण करणे'. याच अर्थाने तो शब्द फारसी, उर्दू व हिंदीतही स्थिरावला. त्याच शब्दापासून मराठीत 'धास्ती' हा शब्दही आला व तोही रूढ झाला. जसे की, 'मला त्याची धास्ती वाटते.' पण 'दरारा' हीदेखील 'दहशत' शब्दाचीच एक अर्थच्छटा. मात्र चांगल्या अर्थाने वापरली जाणारी. उदाहरणार्थ, ''गावात पोलिसांचा खूप दरारा होता; सगळे गुंड अगदी वचकून असायचे.'' पण याच 'दहशत' शब्दापासून अलीकडच्या काळात मराठीत 'दहशतवाद' किंवा 'दहशतवादी', म्हणजे इंग्रजीतील 'टेररीझम' किंवा 'टेररिस्ट' या भीतीदायक अर्थाचे, शब्द तयार झाले. अरबी, फारसी किंवा उर्दूत हे दोन्ही शब्द नाहीत. हिंदीत ते कधीकधी वापरले जातात, पण त्यासाठी हिंदीत 'आतंकवाद' किंवा 'आतंकवादी' हे शब्द अधिक रूढ आहेत.

'दहशत' शब्दाशी नाते साधणारा एक शब्द म्हणजे 'हप्ता'; म्हणजे नियमितपणे दिली जाणारी रक्कम. त्याचा वाईट अर्थ म्हणजे संरक्षण मिळावे म्हणून नियमितपणे दिली जाणारी लाच. जसे की, ''काही दुकानदार पुढारी, पोलीस आणि स्थानिक गुंड यांना हप्ता देतात व म्हणूनच त्यांचे अवैध धंदे निर्विघ्न सुरू राहतात.'' हा हप्ता अर्थातच ज्याच्यापासून आपल्याला धोका उद्भवू शकतो अशाच व्यक्तीला दिला जातो; सर्वसामान्य निरुपद्रवी नागरिकाला हप्ता द्यायची कोणाला गरजच नसते! एकेकाळी मांडलिक राजे सम्राटाला दरसाल जी रक्कम देत तो एका अर्थाने हप्ताच होता, पण त्यासाठी 'खंडणी' हा अस्सल मराठमोळा शब्द वापरला जाई. 'हप्ता' शब्दाचे मूळ फारसी भाषेतील 'हप्ताह्' हे आहे व त्याचा एक अर्थ आहे आठवडा.

आठवड्याचे दिवस खरेतर सात असतात, पण ग्रामीण भागात आजही आठवड्याचे दिवस मोजताना सुरुवातीचा दिवसदेखील शेवटी पुन्हा धरतात व म्हणून आठवड्याचे आठ दिवस मोजले जातात. म्हणून शेतकऱ्यांचा 'आठवडी' बाजार. 'हप्ताह्' शब्दाचा मूळ फारसीत अर्थ आहे 'ठरावीक मुदतीनंतर द्यायचा भाग'. बँकेकडून घेतलेल्या कर्जाची परतफेड करताना ठरावीक कालावधीनंतर दिली जाणारी रक्कम या चांगल्या अर्थानेही 'हप्ता' शब्द वापरला जातो.

– भानू काळे
bhanukale@gmail.com

लोकसत्ता
Fri, 08 April 2022
https://epaper.loksatta.com/c/67313174



**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# घन:श्याम नव्हे, घनश्याम!

"**दादा, तुला** मी कितीदा सांगितलं माझ्या मित्राचं नाव, पण तू सारखा विसरतोस! आता तुला लिहूनच देतो- 'माझ्या मित्राचे नाव आहे- घनःश्याम.' या वाक्यरचनेत महत्त्वाची चूक आहे- बोलताना उच्चारात चूक होत नाही, पण लिहिताना होणारी चूक अनेकांकडून वारंवार होते. ही चूक आहे 'घनःश्याम' या शब्दात. हा शब्द आहे- 'घनश्याम' या शब्दातील 'न' या अक्षरानंतर विसर्ग (:) देणे चुकीचे आहे. ही लिखाणात होणारी चूक माझ्या एका विद्यार्थिनीला सांगितली, तर ती म्हणाली, "अहो बाई, 'न'नंतर विसर्ग हवाच. आपण हा शब्द घनःश्याम असाच उच्चारतो, म्हणजे 'न'वर जो आघात देतो त्याचं लिखाणात 'घनः' रूप बरोबर आहे." या तिच्या गैर-समजाला मी उत्तर देऊन जे स्पष्टीकरण दिले, ते असे- हा शब्द घनःश्याम नसून 'घनश्याम' आहे. संस्कृतातून आलेला हा तत्सम (कोणताही बदल न होता मराठीत स्वीकारलेला) शब्द आहे. तसाच, 'मेघश्याम' हा शब्दही तत्सम शब्द आहे. या शब्दाचे लेखनही 'मेघःश्याम' असे चुकीचे आढळते. या दोन्ही शब्दांचे लेखन चुकीचे का आढळते? म्हणजे 'घन'ऐवजी 'घनः', 'मेघ'ऐवजी 'मेघः' असे का लिहिले जाते? न ऐवजी नः, घ ऐवजी घः असे विसर्गयुक्त अक्षर आपल्याला का लिहावेसे वाटते? या शब्दाचा उच्चार करताना आपण 'घन'मधील 'न' वर आघात देतो, त्याचप्रमाणे 'मेघ'मधील 'घ'वर आघात देतो. उच्चारातील आघातामुळे हे शब्द लिहिताना (म्हणजे न व घ यावर आघात दिल्यामुळे) हे शब्द घनःश्याम, मेघःश्याम असे लिहिले जातात. हा आघात का देतात? तर संस्कृतमध्ये शब्दातील जोडाक्षरात 'य' हे अक्षर शेवटी आल्यास, त्या जोडाक्षराच्या आधी येणाऱ्या अक्षरावर उच्चारताना आघात दिला जातो. जसे-मराठी शब्द उद्या- (द् + या) आणि संस्कृत (तत्सम शब्द) उद्यान- (द् + या). 'उद्या' या शब्दाचा उच्चार करताना आधीच्या अक्षरावर ('उ'वर) आघात देत नाही, पण 'उद्यान' या तत्सम शब्दाचा उच्चार करताना संस्कृताप्रमाणे 'उ'वर आघात दिला जातो. लेखनात काहीच फरक होत नाही.

काही शब्दांचे उच्चार करून पाहा. **तत्सम शब्द**- पुण्य, विद्या, अध्याय, अध्यासन, अध्यक्ष, अध्याहृत, अद्ययावत, आतिथ्य, कौशल्य, अपव्यय, भाग्य, कृत्य, वन्य, मुख्य, अभ्यास, अगम्य. **मराठी शब्द**- तिच्या, माझ्या, वह्या, वाट्याला, आमच्या, भाच्या, भाज्या, पाट्यावर, अध्यात ना मध्यात, पुण्यात.

**– यास्मिन शेख**





कांचन कराई द्वारा संकलित

# गाडी ना घोडं अन् चालले तडतडं...

**सुरेशराव म्हणजे** अतिउत्साही व्यक्तिमत्त्व. त्यांच्या डोक्यात लोककल्याणाच्या अनेक कल्पना उसळी मारीत असत. गावातली काही तरुण मुले मदतीला घेऊन आपले समाजकल्याणाचे काम ते करीत असत. ही कामे करण्याचा तसा त्यांचा हेतू काही वाईट नसे, पण ते राबवीत असलेल्या योजनांना तितका प्रतिसादही मिळत नसे. ही कामे आपल्या अंगावर घेऊन ते करीत असत आणि त्यांची बायको मात्र वैतागून जात असे. ''तुम्हाला तुमच्या घरची कामे दिसत नाहीत. पण दारची कामे दिसतात. पुरे झालं तुमचं 'अघोषित समाजकल्याण खातं'. घराकडे लक्ष द्या आता! आपल्या म्हाताऱ्या आईवडिलांसाठी काही कराल की नाही? मुलांच्या शिक्षणाकडे लक्ष द्याल तर त्यांची प्रगती तरी होईल. पण ते तुम्ही करणार नाही. कितीदा सांगितलं, पण पालथ्या घड्यावर पाणी !'' मग काय एकदा बायकोचे खडसावणे सुरू झाले की काही विचारू नका. आईही सुनेचीच री ओढणार! मग तिचीही सुरेशरावांची कानउघाडणी रीतसर सुरू होई!... ''अगं! कशाला बोलून आपला वेळ फुकट घालवतेस? त्याच्या वागण्यात काही बदल होणार नाही. आपण त्याच्या भल्यासाठी सांगतोय, पण त्याला ते रुचलं पाहिजे ना? त्याच्या या उतावळ्या आणि चंचल स्वभावानेच हवे तसे यश मिळत नाही त्याला. त्याच्या हे कधी लक्षात येईल, तो सुदिन म्हणायचा. आपण आपलं सांगायचं काम करीत राहायचं.'' जसजसा दोघींचा स्वर चढा लागायला लागे तसे मग त्याचे वडीलही या चर्चेत आपला सहभाग नोंदवत असत, ''मी काय म्हणतो सुरेश!



कोणतेही कार्य करावं, पण ते नियोजनबद्ध असावं असं आपलं मला वाटतं. नाही तर अपेक्षित यश हाती येत नाही आणि मग लोक म्हणायला मोकळे 'गाडी ना घोडं अन् चालले तडतडं'.''

ही म्हण माणसाच्या चंचल उतावळ्या स्वभावावर नेमकेपणाने बोट ठेवते.

**डॉ. माधवी वैद्य**
madhavivaidya@ymail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचारांवर खेळांच्या भाषेचा पगडा

**वाक्प्रचारांवर खेळांच्या** भाषेचा पगडा कसा आहे, वाक्प्रचारांची मुळे कशी खोलवर पोहोचलेली आहेत; या संदर्भातील ही काही उदाहरणे नक्कीच मनोरंजक ठरतील!

'पगडा बसणे' हाच वाक्प्रचार पाहा. यातील 'पगडा' हा शब्द पगडडाव या सोंगट्यांच्या खेळाशी जोडलेला आहे. हा खेळ खेळताना फासे वापरले जात. पगडा म्हणजे फाशावरची एक संख्या. या खेळात विवक्षित दान पडले की मेलेली नरद पुन्हा बसवता येत असे. (नरद - फारसी नर्द - म्हणजे खेळातील एक सोंगटी) त्यामुळे डावावर जोर येत असे. पगडा बसणे म्हणजे प्रभाव पडणे असा वाक्प्रचार त्यातून रूढ झाला.

'गुलदस्त्यात ठेवणे' या वाक्प्रचारातील 'गुलदस्त' हा शब्द गंजिफाच्या खेळाशी निगडित आहे. हा खेळ महाराष्ट्रात 'दशावतारी' या नावाने ओळखला जातो. त्यात वाटोळ्या १२० पत्त्यांचा जोड असतो. या खेळात पाने वाटताना चार चार पाने न पाहता बाजूस ठेवतात आणि शेवटी लावतात. त्यांना गुलदस्त म्हणतात. त्यामुळे 'गुलदस्त्यात ठेवणे' या वाक्प्रचाराचा अर्थ आहे गुप्त ठेवणे.

'शह देणे' हा वाक्प्रचार बुद्धिबळाच्या खेळातील एका डावपेचाशी संबंधित आहे. फारसी 'शाह' शब्दाचा अर्थ राजा. बुद्धिबळ खेळताना प्रतिपक्षाच्या राजावर जेव्हा हल्ला होण्याची परिस्थिती निर्माण होते, तेव्हा राजाला हलवणे भाग पडते. त्यामुळे शह देणे या वाक्प्रचाराचा अर्थ भीती दाखवणे, इशारा देणे असा होतो. याला जोडूनच दुसरा डावपेच येतो, तो म्हणजे 'काटशह देणे'. आपल्या राजावर दबाव आला की प्रतिपक्षाच्या राजाला जरबेत ठेवण्यासाठी पाऊल उचलावे लागते. राजकारणात शह देणे आणि काटशह देणे, हे तंत्र नेहमी वापरतात.



'छक्केपंजे ओळखणे' हा वाक्प्रचार पत्ते खेळण्याशी निगडित आहे. छक्केपंजे म्हणजे पंजा (पाच) च्या ठिकाणी छक्का (सहा) किंवा छक्क्याच्या ठिकाणी पंजा हातचलाखीने लावणे. त्यामुळे छक्केपंजे ओळखणे या वाक्प्रचाराचा अर्थ लबाडी ओळखणे असा होतो.

अशा वाक्प्रचारांचा मार्मिक वापर म्हणजे जणू भाषेच्या सुप्त सामर्थ्याचे दर्शन घडवणारा खेळच वाटू लागतो!

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com

भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# क्रियापदं वाढवायला हवी

'**आधी त्याचं** नाव *ॲड* कर, मग पैसे *ट्रान्स्फर* करण्यासाठी *ट्राय* कर आणि नंतर *शॉपिंग* कर.' आजकाल आपल्या सर्वांच्या कानावर असे अनेक संवाद पडतात. पण अशा संवादांत तुम्ही काही 'नोटीस' केलं का? केलंही असेल. ते म्हणजे आपल्यापैकी अनेक जण असा इंग्रजी शब्दाचा आधार घेऊन, पुढे मराठी क्रियापद जोडून वाक्य तयार करतात.

अशा वेळी बरेचदा आधी एखादा इंग्रजी शब्द आणि त्यापुढे 'करणे', 'होणे', 'देणे', 'लावणे', 'शकणे' अशा प्रकारच्या काही मोजक्या क्रियापदांचा सहायक म्हणून वापर करून वाक्य पूर्ण होतं. उदा. 'ॲड कर' यामध्ये 'ॲड' हा क्रियावाचक इंग्रजी शब्द आणि 'कर' हे मराठी क्रियापद वापरलं, की वाक्य सहज पूर्ण करता येतं. खरं तर 'ॲड कर' यासाठी मराठीत 'वाढव' हे क्रियापद आहे. पण ते लक्षात घेण्यापेक्षा हे इंग्रजी-मराठी मिश्रण पटकन वापरलं जात आहे.

सर्व बाजूंनी आपल्याला वेढून असलेल्या इंग्रजी भाषेमुळे हा परिणाम होत आहेच, पण त्याबरोबर मराठीतल्या कमी संख्येने असलेल्या क्रियापदांमुळेही इंग्रजीचा वापर वाढत आहे. कोशांचे संदर्भ आणि सर्वसाधारण निरीक्षणावरून लक्षात येतं, की इंग्रजी भाषेच्या तुलनेत मराठीच्या शब्दसंग्रहात क्रियापदांची संख्या खूपच कमी आहे. जुन्यांपैकी अनेक क्रियापदं हळूहळू मागे पडत गेली आणि त्या प्रमाणात नवीन क्रियापदं वाढलेली नाहीत. अशा वेळी मराठीत आधीच असलेली क्रियापदं जाणीवपूर्वक वापरण्याच्या प्रयत्नाबरोबरच त्यांचा अर्थविस्तार करून नवीन संकल्पनांसाठीसुद्धा ती वापरणं हा एक मार्ग आहे. याचबरोबर नवी क्रियापदं घडवणं हेही महत्त्वाचं आहे. उदा. उत्पादणे, आदरणे, क्रोधणे, नमस्कारणे अशी काही जुनी, काही नवी क्रियापदं प्रचारात आणू शकतो. अर्थात यासाठी नवीन क्रियापदनिर्मितीचं आणि क्रियापदकोशाचं आव्हान आपण पेलायला हवं. सुरुवातीच्या उदाहरणाप्रमाणे इंग्रजी, हिंदी तसंच मराठीच्या काही बोलींच्या साहचर्याने 'आणू शकतो', 'येऊन जा' 'देऊन दे' अशा संयुक्त क्रियापद असलेल्या किंवा नाम आणि क्रियापद अशी जोडी असलेल्या रचनांचं प्रमाणही आजच्या मराठीत वाढलं आहे. क्रियापदं तयार करताना ती मराठी भाषकांकडून वापरली जावी, यासाठी हेही लक्षात ठेवायला हवं. या विषयावर आणखी मुद्दे पुढच्या लेखात.

**– वैशाली पेंडसे-कार्लेकर**
vaishali.karlekar1@gmail.com





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# तमाशा आणि तालीम

**मराठी संस्कृतीत** तमाशा हा एक मनोरंजक कलाप्रकार मानला जातो. मुख्यत: ग्रामीणभागात आणि कधी कधी शहरी भागातही रंगमंचावर सादर केला जाणारा. या लोकप्रियकलाप्रकारात एखादा नाचापोऱ्या स्त्रीचे सोंग घेतो; विनोदी, शृंगारिक व खटकेबाज संवाद असतात; नटूनथटून लावण्या म्हटल्या जातात आणि एकूण बघणाऱ्यांची करमणूक केली जाते.

महाराष्ट्रीय संस्कृतीचे एक प्रतीक म्हणून त्याला प्रतिष्ठाही आहे. बहुतेक वेळा सांस्कृतिक कार्यक्रमांत आणि खूपदा राष्ट्रीय पातळीवरही 'एक अस्सल मराठमोळी लोककला' म्हणून तमाशा सादर केला जातो. पण मुळात 'तमाशा' हा शब्द तुर्कस्थानी आहे व तुर्की भाषेत त्याचा अर्थ देखावा किंवा दृश्य किंवा गंमत असा आहे. त्याच अर्थाने तो उर्दू किंवा हिंदीतही वापरला जातो. जसे की, ''देख, तमाशा देख'' किंवा ''देखो आगे क्या तमाशा होता है.'' विचित्र किंवा हास्यास्पद वर्तन अशाही अर्थाने तो शब्द उर्दू किंवा हिंदीतही वापरला जातो. जसे की, ''बंद करो ये तमाशा.'' मराठीत मात्र कलेचे एक विशिष्ट रूप घेऊन हा शब्द रूढ झाला.

याच तुर्की शब्दापासून बनलेला 'तमासगीर' हा शब्द मात्र मूळ अर्थाशी अधिक इमान राखणारा



आहे. 'दुरून मौज पाहणारा' असा त्याचा अर्थ. 'प्रत्यक्ष लढाईत भाग न घेता लांब उभे राहून नुसतीच गंमत बघणारे बघे' या टीकास्पद अर्थानेही तो वापरला जातो.

तालीम हा असाच एक अर्थबदल होऊन मराठीत रूढ झालेला शब्द. 'तअलीम्' म्हणजे शिक्षण या अरबी शब्दापासून हा शब्द मराठीत आला. हिंदीसह इतरही अनेक भाषांत तो त्याच अर्थी वापरला जातो. महात्मा गांधी आणि विनोबा भावे यांनी पुरस्कृत केलेली 'बुनियादी तालीम' प्रसिद्ध आहे. मराठीत मात्र तालीम म्हणजे सराव या वेगळ्याच अर्थाने हा शब्द रूढ आहे. तमाशा असो की नाटक, प्रत्यक्ष प्रयोगापूर्वी त्याची तालीम ही करावीच लागते. आयत्या वेळी वेशभूषा वगैरेसह केलेल्या सरावाला 'रंगीत तालीम' असेही म्हणतात. व्यायाम किंवा व्यायामशाळा या अर्थानेही मराठीत हा शब्द रूढ आहे. पण यांतील कुठल्याच अर्थाने तालीम शब्द मूळ अरबी भाषेत किंवा हिंदीसह अन्य भाषांत वापरला जात नाही.

– भानू काळे

bhanukale@gmail.com





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# विशेषणांची ‘भयंकर’ गंमत...

**पुढील गमतीदार** वाक्ये वाचा-

१) ती अभिनेत्री भयंकर सुंदर आहे. २) त्याला श्रीखंड भयंकर आवडते. ३) भारतापेक्षा अमेरिकेतील रस्त्यांवर भयंकर स्वच्छता असते. या तीनही वाक्यांत ‘भयंकर’ हे विशेषण अनुक्रमे अभिनेत्री, श्रीखंड, स्वच्छता या विशेष्यांचे आहे. संस्कृत ‘भयानक’ या शब्दाचे भयंकर (वि.) असेही रूप आहे. भयंकर (वि.) या शब्दाचा अर्थ आहे- भय उत्पन्न करणारा, भयावह, भीतीदायक, घोर, दारुण. सौंदर्य, श्रीखंड, स्वच्छता या गोष्टी भीतीदायक कशा असतील? सौंदर्य हे मनमोहक असते, श्रीखंड चवदार तर स्वच्छता हवीहवीशी वाटणारी असते, पण ‘भयंकर’ हा शब्द वर दिलेल्या नामांसाठी वा ‘भयंकर हुशार’, ‘भयंकर विद्वान’ असे शब्दप्रयोगही मराठीजन वापरताना दिसतात. सौंदर्य, रुची, स्वच्छता या भीतीदायक गोष्टी नाहीत. उलट, या गोष्टी प्रतिकूल नसून अनुकूल आहेत, आनंददायी आहेत. ‘भयंकर’ या भीतीदायक शब्दाची सुंदर, सुखदायक, मनमोहक गोष्टींसाठी योजना करणे चुकीचे आणि खेदजनक आहे. ही वाक्ये अशी हवीत- १) ती अभिनेत्री अत्यंत हुशार आहे. २) त्याला श्रीखंड अतिशय (खूप) आवडते. ३) भारतापेक्षा अमेरिकेतील रस्त्यांवर अतिशय (विलक्षण) स्वच्छता आहे.

## नावे लिहिताना होणाऱ्या चुका

मराठीत मुलामुलींची नावे आहेत, त्यांचे उच्चार व लेखन बिनचूक केल्यास या नावांचा अर्थवाहीपणा खुलतो ! काही उदाहरणे पाहू :

अनुसया- चूक, अनसूया- बरोबर (अन्+असूया), उज्वला- चूक, उज्ज्वला- बरोबर, सुशिला- चूक, सुशीला- बरोबर, लिला- चूक, लीला- बरोबर, रुख्मिणी- चूक, रुक्मिणी- बरोबर, अरूंधती-चूक, अरुंधती-बरोबर, अहिल्या- चूक, अहल्या- बरोबर, दिपीका- चूक, दीपिका- बरोबर, उर्मी- चूक, ऊर्मी- बरोबर, प्रिती-चूक, प्रीती-बरोबर, निशीगंधा-चूक, निशिगंधा-बरोबर, संजिवनी-चूक, संजीवनी-बरोबर, अंबरीश-चूक, अंबरीष-बरोबर, अंशुमान-चूक, अंशुमन-बरोबर, अभिजीत- चूक, अभिजित-बरोबर, अवधुत- चूक, अवधूत- बरोबर, आशीश-चूक, आशीष- बरोबर, गिरिश- चूक, गिरीश- बरोबर, रविंद्र- चूक, रवींद्र- बरोबर, त्रिबक- चूक, त्र्यंबक- बरोबर, दत्तात्रय- चूक, दत्तात्रेय- बरोबर, शरदचंद- चूक, शरच्चंद्र-बरोबर, निलेश- चूक, नीलेश- बरोबर, पीयुष-चूक, पीयूष- बरोबर, ऋषिकेश- चूक, हृषीकेश-बरोबर.

– यास्मिन शेख

लोकसत्ता
Mon, 18 April 2022
https://epaper.loksatta.com/c/67506806



भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# उंबर पिकले अन् अस्वलाचे डोळे आले...

**शारदाबाईंचे नाव** साहित्यक्षेत्रात काही नवीन नव्हते. त्यांनी लिहायला घेतला होता तो ग्रंथ खरोखरीच महत्त्वाचा होता. ग्रंथलेखनाचे काम पूर्ण करण्याकरिता त्या अहोरात्र वाचन, मनन, चिंतनात व्यग्र राहात असत. इतक्या की त्या आपल्या खाण्यापिण्याकडे किंवा प्रकृतीकडेही काळजीपूर्वक पाहात नसत. त्यांचे सर्व चित्त हाती घेतलेला ग्रंथ पूर्ण कसा होईल इकडेच असे. नातेवाईकांनादेखील त्यांच्या तब्येतीची काळजी वाटत असे. शेवटी तो ग्रंथ पूर्ण झाला. शारदाबाई जरा सुखावल्या. आता त्या ग्रंथाचे लोकार्पण कसे करावे या विचारात त्या रमल्या होत्या. शेवटी तोही कार्यक्रम ठरला. कार्यक्रमाची तारीख, स्थळ, प्रकाशनासाठी येणारे पाहुणे, प्रसिद्धी सगळ्याची सिद्धता झाली. पण....

हा 'पण'च माणसाच्या आयुष्यात नको तिथे आडवा येतो. माणूस मनातल्या मनात काही मनसुबे रचतो खरा पण नियतीच्या मनात काही वेगळेच असते. प्रकाशनाच्या दिवशीच घडू नये ते घडले. शारदाबाईंची तब्येत अकस्मात बिघडली. बिघडली ती इतकी बिघडली की त्या पुस्तकाच्या प्रकाशनाचा आनंद कोणालाच घेता आला नाही. खरेतर हा ग्रंथ म्हणजे त्यांच्या आयुष्याची कमाई होती. पण नियतीने आपला डाव बरोबर साधला. त्या प्रकाशनाला तर जाऊ शकल्याच नाहीत, पण त्यांचे प्राण वाचले यातच सर्वांना आनंद मानावा लागला. अखेर पिकलेल्या उंबराचा आस्वाद घेणे दूरच राहिले.



'उंबर पिकणे' म्हणजे अपेक्षांची पूर्ती होण्याचा क्षण जवळ येणे. असे म्हणतात की अस्वलाला पिकलेली उंबरे खूप आवडतात. पण अस्वलाचे डोळे आले तर तो आपल्याला आवडणाऱ्या पिकलेल्या उंबरांचा आस्वाद घेऊ शकत नाही. ती उंबरं चाखायला त्याची शारीरिक अनुकूलता नसते त्यामुळे त्याची आलेली चांगली संधी हुकते. एखादी सुवर्णसंधी भोगावयाची असेल तर त्यासाठी नशिबाची साथ लागतेच. हा या म्हणीचा अर्थ आहे.

आपण एक ठरवतो पण सर्व आपण मनात कल्पिल्याप्रमाणे होतेच असे नाही. याचा प्रत्यय आपल्या अनेकदा येतो.

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@gmail.com





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचारांमधील अलंकरण

**वाक्प्रचारांमध्ये विविध** अलंकार सुखाने नांदत असतात. एकाच वाक्प्रचारात शब्दालंकार आणि अर्थालंकार असे दोन्ही अलंकारही असू शकतात. उदा. 'रजाचा गज करणे' हा वाक्प्रचार पाहा. त्यातील अनुप्रास- (एक शब्दालंकार)- आधी आपले लक्ष वेधून घेतो. मग 'एखाद्या (सूक्ष्म) धूलिकणाचा (महाकाय) हत्ती करणे' हा वाच्यार्थ कळतो. 'फुगवून वर्णन करणे', हा त्याचा सूचितार्थ पुढे लक्षात येतो. तेव्हा लक्षात येते की, हा तर अतिशयोक्ती अलंकार आहे!

तोंडातून बाहेर पडणाऱ्या शब्दांना मोत्यांची उपमा दिली जाते. मात्र 'मुक्ताफळे उधळणे' या वाक्प्रचाराचा अर्थ आहे, शिव्या देणे, अपशब्द उच्चारणे! (मुक्ताफळे हा शब्द मुळात 'मोती' या अर्थाचा आहे) यात शिव्यांना मोत्यांची उपमा देऊन 'उपरोध' साधला आहे. 'पखाल सोडणे' या वाक्प्रचारात थोडे वेगळे घडले आहे. या वाक्प्रचाराचा अर्थ आहे, मूत्रविसर्जन करणे. पखाल म्हणजे चामड्याची पिशवी. मूत्राशयाला पखाल म्हणताना साधलेले अलंकरण हे शारीरिक क्रियेचा उल्लेख टाळण्यासाठी आले आहे. वाक्प्रचारांमधील अलंकार कधी सौंदर्यनिर्मिती साधताना चाकोरीबद्ध व्यवहार झाकतातही!

उंबरघाट ओलांडणे या वाक्प्रचाराचा अर्थ आहे,



घर सोडून जायची वेळ येणे. यातील उंबरठारूपी घाट हे रूपक भावपूर्ण आहे. घर आणि बाह्य जग यातील सीमारेषा ठरणारा उंबरठा दिसायला खरे तर फार उंच नसतो, मात्र घराने आपलेपणाने पुरवलेले संरक्षक कवच लक्षात घेता, घर सोडताना होणारी मनःस्थिती अवघड घाट ओलांडण्यासारखीच भयकंपित असते.

श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनी गावातील पाण्याचे दुर्भिक्ष्य विनोदी शैलीत वर्णन करताना 'पाणी'विषयक काही वाक्प्रचार वापरले आहेत. उदा. 'पाणीदार मनुष्य' याचा अर्थ 'तेजस्वी मनुष्य' मात्र आता त्याचा अर्थ 'ज्याच्या दारी पाणी आहे असा मनुष्य', असा झाला आहे. कोल्हटकरांनी लेखात कोटी (श्लेष अलंकार) साधण्यासाठी काही वाक्प्रचार मार्मिकपणे योजले आहेत. दुष्काळामुळे भाषेवरही कसा परिणाम होतो, अर्थाची कशी उलथापालथ होते, हे त्यातून प्रभावीपणे जाणवते. वाक्प्रचारांची ही आलंकारिक लकब व्यवहारात भाषेची प्रसरणशीलता टिकवून ठेवायला उपयोगी पडते.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com

भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# माझे भाषिक कर्तव्य

**भाषासूत्र लिहायला** लागल्यापासून कौतुकाप्रमाणेच कानउघाडणीचीही पत्रे येतात. आम्ही मराठीचा आग्रह धरतो, म्हणजे इंग्रजीचा दुस्वास करतो, असे अनेकांना वाटते. आधुनिक युगात प्रत्येक पोटार्थी व्यक्तीला इंग्रजीचे किमान कामचलाऊ ज्ञान असणे आवश्यक आहे, याची पूर्ण जाणीव सर्वांनाच आहे.

कोणतीच भाषा बांधीव स्वरूपाची राहून चालणार नाही, ती प्रवाही असणार. अनेक शब्दांना आपल्यामध्ये सामावून घेऊन पुढे जाणार. स्वाभाविक आणि सहजसुंदर मराठी भाषेची ओळख घराघरांतून होणे आवश्यक आहे.

सकाळी उठताना 'अलार्म' नको 'गजर' वाजू द्या. आचवणे हा शब्द आपण विसरत चाललो आहोत. 'न्याहारी', 'भोजन', 'परवचा', 'गृहपाठ', 'अंथरूण-पांघरूण', 'कासंडी', 'कोनाडा' या साध्या शब्दांचा परिचय तरी लहानग्यांना करून देऊ या.

एका लेखकाच्या मुलीशी परवाच भेट झाली. ती लंडनला इंग्रजीची प्राध्यापक आहे. तिने मान्य केले की 'मी माझ्या मुलाशी त्याच्या जन्मापासून मराठी भाषेत बोलले नाही, हे चुकलंच. इंग्रजी तर तो बाहेर शिकलाच असता; पण आता वेळ निघून गेलेली आहे. त्याची समजण्याची आणि विचार करण्याची भाषा इंग्रजीच झाली आहे. इथे आल्यावर आपल्या




आज्यांशी तो छान मराठीत बोलू शकत नाही. जमेल तसं तोडकं-मोडकं बोलतो हेच खूप आहे. तो इंग्लंडमध्ये राहणार, वाढणार, नोकरी करणार, कदाचित तिथेच स्थायिक होणार. त्यामुळे आमच्या पश्चात मराठीसाठी एक घर बंद झालेलं असणार. आम्ही पालकच याला जबाबदार आहोत,' हे सांगताना तिला मनोमन वाईट वाटत होते. मराठी समाजाने जागतिक आव्हाने पेलण्यासाठी इंग्रजी आणि आपली संस्कृती जपण्यासाठी मराठी असा समतोल साधणे आवश्यक आहे, हे तिने आवर्जून सांगितले.

पालकांबरोबरच नभोवाणी, वाहिन्या आणि वृत्तपत्रे ही माध्यमे जनतेची भाषा घडवू किंवा बिघडवू शकतात, म्हणून त्यांनीदेखील अधिक जबाबदारीने वागायला हवे. मराठी ही आपली स्वभाषा आहे, तिच्याविषयी आपली काही भाषिक कर्तव्ये आहेत, याची थोडीशी तरी जाणीव आपण ठेवू या, इतकीच कळकळीची विनंती!

– डॉ. निधी पटवर्धन
nidheepatwardhan@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# नट्टापट्टा

'**नट्टापट्टा**' **हा** शब्द मराठीत 'मेकअप' या इंग्रजी शब्दाला बराचसा समानार्थी म्हणून वापरला जातो. 'नखरा' हा मूळ अरबी शब्ददेखील साधारण त्याच अर्थाचा आहे. त्यात केशरचनेपासून भुवया कोरण्यापर्यंत आणि नखे रंगवण्यापासून उंची वेशभूषेपर्यंत अनेक गोष्टी येतात. स्नो-पावडर, काजळ, मस्कारा, रूज, लिपस्टिक, फेसपॅक इत्यादींचा त्यात समावेश होतो. पूर्वी मुख्यतः नाटक-सिनेमातील कलाकार नट्टापट्टा करत, पण अलीकडे मात्र साध्या वाढदिवसाच्या पार्टीपासून लग्नापर्यंत प्रत्येक कार्यक्रमात नट्टापट्टा हा अगदी अपरिहार्य भाग झाला आहे. त्यासाठी केला जाणारा खर्चही बराच असतो.

हा नट्टापट्टा शब्द आला कुठून? नट्टा हा शब्द बहुधा नटणे या शब्दावरून आला असावा आणि नादसाधर्म्य साधण्याच्या भाषिक लकबीमुळे त्याला पट्टा शब्दाची जोड मिळाली असावी. उदाहरणार्थ- चट्टेरीपट्टेरी किंवा चटकमटक हे शब्द. पण असे अनेक शब्द आहेत ज्यांची एकच एक अशी व्युत्पत्ती खात्रीपूर्वक सांगणे अवघड आहे.

नट्टापट्टा हा तसाच एक शब्द असावा. पूर्वी कोलकाता येथे अनेक वर्षे ग्रंथपाल असलेले आणि नंतर वडोदरा येथे स्थायिक झालेले श्री. बा. जोशी यांनी त्यांच्या 'गंगाजळी' या पुस्तकात नट्टापट्टा शब्दाची एक वेगळी आणि पटणारी व्युत्पत्ती सांगितली आहे. बळीराजाला मोहात पाडून पाताळात गाडण्यासाठी विष्णूने ५२ आठवड्यांत ५२ रूपे घेतली, त्यामुळे तो पहिला बहुरूपी होता, असे बंगालमध्ये मानले जाते. तसे बहुरूपी आपल्याकडेही आढळतात पण बंगाली संस्कृतीत बहुरूपी हे पात्र अधिक महत्त्वाचे आहे. बहुरूपी हा एका अर्थाने नटच असतो. बंगालमधील बिरभूम, पुरुलिया वगैरे जिल्ह्यांत आजही अनेक बहुरूपी आढळतात. तारकेश्वर या तीर्थक्षेत्री किंवा कोलकाता येथील गंगेच्या घाटावर आणि हावडा ब्रिजवरदेखील ते दिसतात. विशेषतः होळी किंवा रामनवमीसारख्या सणांच्या वेळी!



बंगालमधील बिरभूम, पुरुलिया वगैरे जिल्ह्यांत आजही अनेक बहुरूपी आढळतात.

प्रसिद्ध बंगाली दिग्दर्शक ऋत्विक घटक यांनी आपल्या १९६५ साली प्रदर्शित झालेल्या 'सुवर्णरेखा' या चित्रपटातून हे बंगाली बहुरूपी जगापुढे आणले. हे बहुरूपी भगवान विष्णूप्रमाणे वर्षाकाठी ५२ रूपे धारण करतात. त्या प्रत्येक रूपाला साजेसा मेकअप करण्यासाठी त्यांच्याकडे सर्व सामग्री असते व ती ठेवण्यासाठी एक मोठा पेटारा असतो. हल्लीच्या मेकअप बॉक्सचे किंवा व्हॅनिटी बॉक्सचे व्यापक स्वरूप! त्यासाठी बंगाली भाषेत नट-पीटक हा संस्कृतजन्य शब्द आहे. त्याच्यावरून नट्टापट्टा शब्द आला असावा, असे जोशी यांनी म्हटले आहे.

– भानू काळे
bhanukale@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# निरर्थक शब्दयोजना, निरर्थक अनुस्वार

**प्रकाश दिलीपला** म्हणाला, 'इतके दिवस मी तुला माझा मित्र समजत होतो. आता तू ज्या तऱ्हेने वागतोस, त्यामुळे मी आजन्मात तुझ्याशी संबंध ठेवणार नाही.' या दोन वाक्यांतील दुसऱ्या वाक्यात एक मोठी चूक आहे- ती म्हणजे 'आजन्मात' या शब्दाचा चुकीच्या अर्थाने केलेला वापर. 'आजन्म' हे क्रियाविशेषण आहे. या शब्दाचा अर्थ आहे- जन्मापासून, जन्मापर्यंत. या सदोष वाक्यरचनेमुळे नेमका अर्थ व्यक्त होत नाही. आधी मैत्री, पण नंतर संबंध-तोडणे यासाठी 'आजन्म' या शब्दाची योजना निरर्थक आहे. त्याऐवजी 'मी यापुढे तुझ्याशी संबंध ठेवणार नाही' किंवा 'या जन्मात तुझ्याशी संबंध ठेवणार नाही.' किंवा 'मरेपर्यंत तुझ्याशी संबंध ठेवणार नाही.' अशी वाक्यरचना अर्थपूर्ण होईल.

मराठीत आपण आमरण उपोषण हा शब्द योग्य अर्थानेच वापरतो. 'महात्मा गांधीजींनी आमरण उपोषण करण्याची प्रतिज्ञा केली.' 'आमरण' या शब्दाचा अर्थ 'मृत्यू येईपर्यंत' असा आहे.

***

आणखी एक गमतीदार वाक्यरचना पाहा- पु.ल.देशपांडे (पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे) यांचा उल्लेख करताना- विशेषतः लेखनात- अनेक नियतकालिकांत असे लिहिलेले आढळते. 'पु.ल.देशपांडे माझे आवडते लेखक आहेत'. 'पु.लं. सर्व महाराष्ट्राचेच अत्यंत लोकप्रिय विनोदी साहित्यिक आहेत'. यापैकी दुसऱ्या वाक्यात ल वर अनुस्वार देणे चुकीचे आहे.

'पु.लं. म्हणाले की...' आणि

'पु.लं.नी असे म्हटले आहे की...'

या वाक्यांपैकी 'पु.लं. नी' हे योग्य आहे. पण 'पु.लं. म्हणाले' हे अत्यंत चुकीचे लेखन आहे. जेव्हा आपण व्यक्तीचा उल्लेख करताना वि.स. खांडेकर ऐवजी वि.स. असा करतो, तेव्हा 'वि.स.



महाराष्ट्राचे लोकप्रिय लेखक आहेत.' हे वाक्य बरोबर आहे. पण वि.सं. लोकप्रिय लेखक आहेत, या वाक्यात 'स' वर अनुस्वार देणे बरोबर नाही. पु. लं.नी, पु. लं.ना, पु. लं.चा, पु.लं.बरोबर इ. रूपे (म्हणजे ल वर अनुस्वार देणे) योग्य आहेत, पण विभक्तिप्रत्यय व शब्दयोगी अव्यय न लावता (पु. लं.म्हणाले...) 'लं' असे लिहिणे अयोग्य आहे. उच्चार करून पाहिल्यास वाचकांच्या सहज लक्षात येईल.

**-यास्मिन शेख**

कांचन कराई द्वारा संकलित

# मांजर करी एकादशी...



**पार्वतीबाई आपले** वजन कमी कसे होईल म्हणून खूप प्रयत्न करायच्या. त्यासाठी कोणी काही उपाय सुचवले तर त्याचे पालन करायला त्या नेहमीच अगदी एका पायावर तयार असत. मग कधी नुसत्याच उकडलेल्या भाज्या खा, कधी नुसतीच फळे खा, कधी मिठाचे सेवन वर्ज्य कर असे एक ना दोन, हजार प्रकार त्या करून बघत असत ! पण वजनाचा काटा काही आशादायक आकडा दाखवायचाच नाही. वजन जसेच्या तस्से. कणभरही कमी होत नसे.

अहो, कसे कमी होणार ? एकीकडे देवाधर्माच्या नावाने उपवास धरायचा अन् दुसरीकडे मात्र त्या उपवासाच्या नावाखाली जिभेचे भरपूर चोचले पुरवायचे; असेच व्हायचे पार्वतीबाईंचे. आठवड्यातून तीन दिवस उपास ! म्हणजे तीन दिवस 'आहार नियंत्रण' वगैरे कोलमडलेलेच असे. कारण तीन दिवस 'एकादशी आणि दुप्पट खाशी' या न्यायाने आहार घेतला जायचा. मग पदरी घोर निराशा पडणार दुसरे काय होणार? मग त्यांची आहारशास्त्रज्ञ त्यांना हात जोडून विनंती करायची, ''अहो पार्वतीबाई ! आता एक महत्त्वाचा सल्ला देते. अगदी लक्षात ठेवा. 'मांजर करी एकादशी, उंदीर मारून भरी कुशी' असं वागताय तुम्ही. असं केलंत तर तुमचं वजन कमी करण्याचं ध्येय तुम्ही कधीच साध्य करू शकणार नाही. असं करू नका असा माझा तुम्हाला कळकळीचा सल्ला आहे.''

विचार केला तर आपल्याकडूनही अनेकदा असे वर्तन होत असते. कुशी म्हणजे पोट. उपवास करणे ही गोष्टच मांजरीच्या स्वभावाला न मानवणारी आहे. तिचा उपवास म्हणजे फक्त उंदीर मारून आपले पोट भरणे, असाच असणार. 'लेकी बोले सुने लागे' याप्रमाणे मांजरीचे उदाहरण देऊन माणसाच्या वर्तनावर मार्मिकपणे बोट ठेवणारी ही म्हण आहे. नाही का? म्हणींचे जे कोणी कर्ते असतील त्यांनी मानवी जीवन आणि त्यातील व्यवहार यांचे किती सूक्ष्म निरीक्षण केले असेल आणि ते सारे म्हणींच्या एका उक्तीत गोवले असेल !

– डॉ. माधवी वैद्य

madhavivaidya@ymail.com





# भाषासूत्र

कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचारांतील प्रयत्नवाद

**जगताना प्रत्येकाला** नानाविध संकटांना तोंड द्यावे लागते. अशा वेळी प्रयत्नवाद मनावर बिंबवणारे वाक्प्रचार आठवतात. त्यांचे हे काही नमुने-

'जंग जंग पछाडणे' या वाक्प्रचाराचा अर्थ आहे, अतिशय श्रम करणे, कमालीचे प्रयत्न करणे. जंग हा फारसी शब्द असून तो स्वतंत्रपणे फारसा वापरला जात नाही. जंगी तयारी, जंगी लढाई अशा शब्दप्रयोगांत 'जोरदार' या अर्थी तो शब्द येतो आणि पछाडणे म्हणजे पिच्छा पुरवणे, जेरीस आणणे. रमाबाई रानडे यांच्या आत्मचरित्रात त्यांच्या आजेसासूबाई (न्यायमूर्ती रानडे यांच्या पहिल्या पत्नीचे कौतुक करताना रमाबाईंना टोमणे मारत) एकदा म्हणतात, 'तिला इंग्रजी शिकवण्याबद्दल त्यांनी जंग जंग पछाडले, पण त्या माऊलीने तिकडे लक्ष दिले नाही.'

जंग जंग पछाडले तरी कार्यभाग साधला नाही, की निराश न होता चंग बांधायचा असतो! चंग बांधणे म्हणजे कंबर कसणे, प्रतिज्ञा करणे. मुळात 'पचंग' असा शब्द होता. कालौघात 'प' हे अक्षर गळून गेले. पचंग म्हणजे पासोडी, कांबळे इत्यादी वस्त्र मानेपासून कंबरेपर्यंत पोट, पाठ झाकेल असे गुंडाळून गळ्यामागे गाठ बांधणे, अशा प्रकारे (पाच अंग म्हणजे पचंग) बांधून पुढे सरसावणे, सिद्ध होणे. चंग बांधणे या वाक्प्रचारातून प्रयत्न करताना



आवश्यक असलेली आवेशपूर्णताही अचूकपणे व्यक्त होते.

प्रयत्नांची पराकाष्ठा करणे या वाक्प्रचाराचा अर्थ आहे, प्रयत्नांची हद्द गाठणे. काष्ठा म्हणजे शर्यतीच्या शेवटी मर्यादादर्शक म्हणून पुरलेले लाकूड. पराकाष्ठा म्हणजे शेवटची हद्द. त्यामुळे प्रयत्नांची पराकाष्ठा करणे म्हणजे प्रयत्न करताना जराही कमतरता न ठेवणे.

'प्रयत्नांती परमेश्वर' हा वाक्प्रचार आपल्या तोंडी सहज रुळलेला असतो, अगदी एखाद्या बोधवाक्याप्रमाणे! परमेश्वर ही काव्यात्म संकल्पना आहे. व्यावहारिक पातळीपेक्षा खूप उंचावरचे, श्रेयस स्वरूपातील ईप्सित त्यातून सुचवायचे असते. त्यामुळे प्रयत्न केल्यास परमेश्वरदेखील प्राप्त होईल, असा विश्वास देणारा हा वाक्प्रचार प्रयत्नांमुळे अप्राप्य तेही प्राप्त होऊ शकते, असा आशावाद जागवतो. असे हे वाक्प्रचार नक्कीच प्रेरणादायी ठरतात.

– डॉ. नीलिमा गुंडी

nmgundi@gmail.com

लोकसत्ता Wed, 27 April 2022
https://epaper.loksatta.com/c/67689230

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# नवी क्रियापदे... अशीही !



**मराठीत सध्या** असलेली क्रियापदे पाहिली, तर ती जा- जाणे, ये- येणे, कर- करणे अशा मूळ धातूंपासून आणि पाणी- पाणावणे, लांब- लांबवणे, खाली- खालावणे अशा नाम, विशेषण, क्रियाविशेषण अशा वेगवेगळ्या शब्दांपासून तयार झालेली दिसतात. या प्रकारे अजून क्रियापदे घडवली तर पत्र- पत्रणे, प्रयत्न- प्रयत्नणे, प्रसिद्ध- प्रसिद्धणे, बरोबर- बरोबरणे, तयार- तयारणे, टपाल- टपालणे अशी करता येतील.

यापूर्वी आपण फारसी शब्दांपासून खर्च- खर्चणे- खर्च करणे, बदल- बदलणे- बदल करणे अशी मराठी वळणाची क्रियापदे करून घेतली आहेतच. याच धर्तीवर काही रुळलेले इंग्रजी शब्द घेऊन मेल- मेलणे- मेल करणे, पोस्ट- पोस्टणे- पोस्ट करणे, फोन- फोनणे- फोन करणे, शेअर- शेअरणे- शेअर करणे अशी इंग्रजीवर मराठी साज चढवून तयार केलेली क्रियापदेही स्वीकारावीत का? आज समाजमाध्यमांमध्ये काही जण ती वापरतही आहेत. ती स्वीकारावीत की नाही, हा इथे कळीचा मुद्दा आहे. इतिहासाचार्य वि. का. राजवाडे (मराठ्यांच्या इतिहासाची साधने खंड- ८) म्हणतात, 'शपथ खाणे', 'याद राखणे' अशा प्रकारच्या क्रियापदांचे मूळ फारसीतच शोधले पाहिजे. मराठी बखरकारांनी व कारकुनांनी आपल्या भाषेचे संस्कार फारसी शब्दांवर चालवले त्यामुळे त्या शब्दांचा नूर उतरून गेला आणि ते इतर मराठी शब्दांप्रमाणे वापरले जाऊ लागले.' डॉ. माधवराव पटवर्धन (फारसी-मराठी कोश- प्रस्तावना) आपल्या विवेचनात म्हणतात, '*अशा प्रकारे करणे, मारणे, देणे यांच्यापूर्वी इतर शब्द योजून संयुक्त क्रियापदे तयार करण्याचा प्रकार फारसीवरून मराठीने उचलला.*'

थोडक्यात, शब्दसंपत्ती वाढवण्यासाठी परभाषेतले शब्द, संकल्पना स्वीकारताना ते भाषेचा स्वभाव, उच्चार, व्याकरणिक आचार-विचार यानुसार वळवून घेतले की त्या भाषेत मिसळून जातात, असे आढळते. आज इंग्रजीचा मोठा प्रभाव किंवा दबाव मराठी भाषेवर आला आहे आणि तो वाढतच चालला आहे. सोपे, अर्थवाही मराठी प्रतिशब्द तयार करून वापरात आणणे हा त्यावर एक उपाय आहेच. पण तरीही असंख्य इंग्रजी शब्द मराठीच्या दारे-खिडक्यांवर उभे आहेत; त्यांना परतवायचे, सनदशीर मार्गाने आपलेसे करून आत घ्यायचे की लोंढ्याने येतील तसे घुसू द्यायचे, याचा निर्णय आपणच घ्यायचा आहे.

– वैशाली पेंडसे-कार्लेकर
vaishali.karlekar1@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# जकात

**कालपरवापर्यंत मालाची** ने-आण करताना गावाच्या वेशीपाशी सगळी वाहने थांबवली जात. तिथेच एक छोटेसे सरकारी कार्यालय असायचे. कुठल्या मालाची ने-आण केली जात आहे आणि त्याची किंमत किती आहे यानुसार त्या कार्यालयात कर भरावा लागायचा. त्याला 'जकात' म्हणतात. हा मूळचा अरबी शब्द! या जकातवसुलीचे मूळ इस्लाम धर्मातील एक परंपरेत आहे. प्रत्येकाने आपल्या उत्पन्नाचा अडीच टक्के भाग हा धर्मासाठी ठेवावा आणि जकातीच्या स्वरूपात तो राज्यकर्त्यांकडे द्यावा, असे इस्लाम धर्म सांगतो. ती रक्कम नंतर त्यांच्या इमामाकडे जाई व धार्मिक कार्यासाठी तिचा वापर होई. त्यातून गरिबांना मदत वगैरेही केली जाई. तसे पाहिले तर ही खूप चांगली प्रथा. योगायोग म्हणजे ख्रिस्ती धर्मातही साधारण अशीच प्रथा आहे. उत्पन्नाचा एक ठरावीक हिस्सा स्थानिक चर्चकडे सुपूर्द करायची. ख्रिस्ती धर्म खूप संघटित असल्याने ती रक्कम नंतर एकत्र आणणे व त्याचा नियोजनबद्ध विनियोग करणे, हे त्या धर्मात अधिक सुलभ असते. पण या दोन्ही प्रथांमागचा विचार एकच आहे- आपण जे पैसे कमावतो ते फक्त स्वत:साठी नसून त्यातील काही भाग आपण समाजासाठी द्यायला हवा.

जिथे ही जकात भरली जाई त्या जागेला जकात नाका असेच म्हणतात. खूप पूर्वी राजा ज्यांच्यावर हे जकातवसुलीचे काम सोपवत असे, त्या



व्यक्तीला जकातदार म्हटले जाई. पुढे तेच आडनाव झाले. अशी अनेक आडनावे व्यवसायपरत्वे आली. जसे की, दप्तरदार, किल्लेदार, ठाणेदार, जमादार, हवालदार, मुजुमदार वगैरे. काळाच्या ओघात हे जकात नाके म्हणजे भ्रष्टाचाराचे अड्डे झाले. तिथे प्रचंड प्रमाणावर काळा पैसा जमू लागला; त्याचा हिस्सा सरकारदरबारी अगदी वरपर्यंत जाऊ लागला. सुदैवाने आता जीएसटी आल्यानंतर ही जकातवसुली थांबली. पण याचेच एक रूप असलेला 'टोल' हा प्रकार अजून फास्टटॅग नसलेल्या बऱ्याच ठिकाणी सुरू आहे आणि जिथे तो वसूल केला जातो त्या टोलनाक्यांवरदेखील मोठ्या प्रमाणावर काळा पैसा जमा होतो. पण त्या 'टोल' शब्दाचे मूळ 'टोलोस' या रोमन शब्दात आहे.

युरोपच्या उत्कर्षाचे एक मोठे कारण रोमन लोकांनी बांधलेले रस्ते. 'रस्ते बांधणारे' (रोड बिल्डर्स) ही त्यांची एक महत्त्वाची ओळख. 'रस्ता बांधण्यासाठी व त्याची देखभाल करण्यासाठी भरलेला कर' हा त्यांच्या लॅटिन भाषेतील टोल शब्दाचा अर्थ.

– भानू काळे
bhanukale@gmail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# तोळं नव्हे तोळा

**तो सराफाच्या** दुकानात गेला. सोनाराला म्हणाला, ''मी एक तोळं सोनं आणलं आहे. त्याची साखळी करायची आहे. केव्हा येऊ घ्यायला?''

या वाक्यांतील एका वाक्यात झालेली सदोष रचना तुमच्या ध्यानात आली असेल. दोष आहे 'एक तोळं सोनं' या शब्दयोजनेत. संस्कृत भाषेतील 'तोल' या पुल्लिंगी नामाचे मराठीत झालेले तत्भव रूप आहे 'तोळा'. तोल याचा अर्थ आहे - वजनाचे एक परिमाण. मराठीतही सोने, चांदी यांच्या संदर्भात 'तोळा' हा शब्द आपण वापरतो. तोळा, मासा, गुंज हे शब्द सोन्या-चांदीच्या वजनाचे परिमाण या अर्थी योजले जात असत. त्यांतील 'मासा', 'गुंज' हे शब्द भाषेतून जवळजवळ लुप्त झाले आहेत. 'तोळा' या शब्दाऐवजी इंग्रजीतील 'ग्रॅम' शब्दच अलीकडे रूढ झालेला आढळतो. मात्र एखाद्याच्या अशक्त प्रकृतीचा उल्लेख करताना 'तोळामासा प्रकृती' असे उद्गार ऐकायला मिळतात.



'तोळा' हे पुल्लिंगी, एकवचनी नाम आहे. त्याचे अनेकवचक तोळे (पु.अ.व.) वरील वाक्यात तोळं (तोळे-एकरान्ताऐवजी अनुस्वार) हे नाम, नपुंसकलिंगी एकवचनी आहे. तोळं हा नपुंसकलिंगी शब्दच मराठीत नाही. तोळा या पुल्लिंगी नामाचे अनेकवचन 'तोळे' असे होते. एक तोळा सोने (सोनं), दहा तोळे सोने (सोनं) ही रूपे योग्य आहेत. हे लक्षात घेऊन मराठी भाषकांनी बोलताना आणि लिहितानाही 'एक तोळं सोनं किंवा चांदी' अशी शब्दयोजना करू नये किंवा असे ऐकले किंवा वाचले तर ती चूक मान्य करावी व जमल्यास दुरुस्त करावी. एक लक्षात घ्या - या शब्दयोजनेत अर्थ समजत असला, तरी चूक ही चूकच असते. ती टाळणे हेच सयुक्तिक आहे.

आता कडधान्ये, साखर, तांदूळ, गहू, कांदा, बटाटा, मटार, इ. भाज्यांसाठी ग्रॅम किंवा किलो, पेयांसाठी आणि द्रवपदार्थांसाठी लिटर, उंची-लांबी यासाठी मीटर हे शब्द मराठी भाषेने स्वीकारले आहेत. **हे मराठी भाषेवर अतिक्रमण आहे, असे मला वाटत नाही. जगभरात हे शब्द मान्य झाले आहेत.** मराठीतील बिघा, मैल, कोस, शेर, रत्तल, छटाक असे परिमाणदर्शक शब्द हळूहळू नष्ट होत आहेत. त्याऐवजी परिमाणदर्शक नवे शब्द भाषेने स्वीकारले आहेत. वरील वाक्य ''मी एक तोळा सोनं (सोने) आणलं आहे.'' असे हवे. या लेखात मला मुख्यत: 'तोळं' या शब्दाची वाक्यामध्ये योजना चुकीची आहे, हे सुचवायचे आहे.

**– यास्मिन शेख**

लोकसत्ता Mon, 02 May 2022
https://epaper.loksatta.com/c/67792031



भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# कालबाह्य आणि कालसुसंगत म्हणी...

**हेला म्हणजे** रेडा आणि रांधणे म्हणजे स्वयंपाक करणे. 'म्हशीनं रांधलं अन् हेल्यानं खाल्लं' ही म्हण खूप पूर्वीच्या काळातली असावी. जेव्हा पुरुषप्रधान संस्कृतीचा प्रभाव समाजात जोर धरून होता. आता काळ आला आहे तो स्त्री-पुरुष समानतेचा. आता स्त्रीचे काम फक्त चुलीपुढे बसून स्वयंपाक करणे इतकेच समजले जात नाही. स्त्री पुरुषांच्या बरोबरीने समाजात वावरते. आता वातावरण स्त्रियांच्या दृष्टीने बरेच सुखावह झाले आहे.

पण आजही अनेक ठिकाणी घरातल्या बहुतेक कामांची भिस्त स्त्रीवरच आहे, असे चित्र दिसून येते. जी स्त्री घर, चूल नीट सांभाळते तिला आजही उजवे माप दिले जाते. तिच्याकडे कौतुकभरल्या नजरा वळतात. काही बायका जात्याच कुशल असतात, पण काही बायकांजवळ ते कौशल्य नसते. त्या ठाकठीकच रांधतात आणि त्यांचे घरदार ते निमूटपणे खालमानेने गोड मानून घेते, तसा हा सारा व्यवहार! एकंदरच सारा आनंदी आनंद! असाच काहीसा प्रकार आनंदीबाईंचा. त्यांना स्वत:ला खाण्याची आवड तशी कमीच. त्यामुळे आधीच उल्हास आणि त्यात फाल्गुन मास, अशी काहीशी स्थिती! निरसपणे संसार हाकावा त्यातला प्रकार. निगुतीने चार गोष्टी करतील, तर नावच नको. 'पदरी पडले आणि पवित्र झाले' असे म्हणावे आणि मोकळे व्हावे. अशी एकंदर परिस्थिती. त्यांच्याकडे बघून वाटायचे 'म्हशीनं रांधलं अन् हेल्यानं खाल्लं'! काळ जसा पुढे जातो, तशा काही म्हणी कालबाह्य होऊ लागतात. पण अशा काही म्हणींमध्ये वर्तमानाचे प्रतिबिंब पडलेले दिसते. ते बघणेही मजेशीर वाटते उदा. आत्ताच्या काळातील काही म्हणी बघू या... 'रहायला नाही घर म्हणे लग्न कर', 'उचलला मोबाइल लावला कानाला', 'माझी ती सर्दी....तुझा तो ओमायक्रॉन', 'नेता छोटा, कटआऊट मोठा', 'मिळवत्या मुलीला मागणी फार', 'नाव गंगाबाई आंघोळीला पाणी नाही', 'खिशात नाही डोनेशन घ्यायला चालला ॲडमिशन!' तुम्हालाही अशा अनेक म्हणी सुचतील. बघा सुचतात का?



– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com

भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# युद्धविषयक वाक्प्रचार

**माणसांमध्ये दडलेले** आदिम 'प्राणी' हे रूप युद्धामध्ये प्रकट होत असते. युद्धविषयक वाक्प्रचारांमधून युद्धाची रौद्र, भयानक आणि करुणरसपूर्ण दर्शने घडतात. काही वाक्प्रचार खास बखरींमध्ये आढळतात. आज ते प्रचलित नाहीत. 'झोंटधरणी होणे' हा त्यापैकी एक वाक्प्रचार आहे. याचा अर्थ एकमेकांचे केस ओढून युद्ध करणे. हा युद्धाचा काहीसा ग्राम्य अवतार असावा! 'पानिपतची बखर'मध्ये वाक्य येते : 'तेथे मोठी झोंटधरणी होऊन वरकड हत्यारांची लढाई व तिरंदाजीही राहिली.' ('झोंटधरणी होणे' हा वाक्प्रचार कवी मुक्तेश्वर यांच्या महाभारतावरील रचनेतही आढळतो.) 'जुम्मस न खाणे' हा वाक्प्रचारदेखील बखरीत आढळतो. या वाक्प्रचाराचा अर्थ आहे, हार न मानणे, हिंमत न हारता आत्मविश्वासाने लढणे.

युद्ध सुरू झाले की वीरश्रीयुक्त वातावरण तयार होते. त्या वातावरणाचे वर्णन 'रणधुमाळी माजणे' या वाक्प्रचारातून केलेले आढळते. धुमाळी या शब्दाचा अर्थ आहे क्षोभ, संताप आणि माजणे म्हणजे कैफ चढणे. (हल्ली 'निवडणुकांची रणधुमाळी माजली,' असे वाचायला मिळते.) खडे चारणे (बेजार करणे), नामोहरम करणे (पराभूत करणे), नेस्तनाबूत करणे (निर्मूलन करणे) असेही काही वाक्प्रचार आढळतात. खडाजंगी होणे या वाक्प्रचारातील 'जंग' या फारसी शब्दाचा अर्थ आहे युद्ध. यात वाणीने केलेले युद्ध-भांडण अभिप्रेत आहे. युद्धामुळे काही नवे वाक्प्रचार रूढ होतात. पानिपतचे युद्ध हे मराठ्यांच्या इतिहासातील एक मोठे युद्ध होते. या युद्धामुळे 'भाऊगर्दी होणे' आणि 'पानिपत होणे' हे दोन वाक्प्रचार रूढ झाले. सदाशिवराव भाऊ पेशवे हे युद्धात लढता लढता नाहीसे झाले होते. त्यामुळे फौज सैरावैरा पळू लागली. या घटनेचा संदर्भ असलेला वाक्प्रचार आहे, 'भाऊगर्दी होणे'. यातील भाऊगर्दी हा शब्द निरुपयोगी ठरणारी गर्दी अशा अर्थाने रूढ झाला. तसेच पानिपतच्या युद्धात मराठ्यांची मोठी हानी झाली होती. त्यामुळे 'पानिपत होणे' हा वाक्प्रचार 'विनाश होणे' या अर्थी रूढ झाला. असे हे वाक्प्रचार युद्धाचे वर्णन करतात, तसेच युद्धाच्या जखमा जिवंतही ठेवतात!




पानिपत युद्धाने 'भाऊगर्दी होणे' आणि 'पानिपत होणे' हे दोन वाक्प्रचार दिले.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# अननस, आई, इजार आणि ईडलिंबू - अआइई



**आपल्याला डिक्शनरी** माहीत असते, पण शब्दकोश माहीत नसतात. एखाद्या शब्दाचा अर्थ शोधायचा झाला तर त्या त्या भाषेचे शब्दकोश असतात आणि तिथे वर्णानुक्रमे आपण शब्द शोधू शकतो. वर्णानुक्रमालाच कोणी 'अकारविल्हे' असेही म्हणतात. अनेकांनाअल्फाबेटिकल ऑर्डर माहीत असते, पण 'अकारविल्हे' माहीत नसतात. गंमत म्हणून विचारून पाहा बरं, किती जणांना हा शब्द माहीत आहे आणि त्यांनी तो वापरलेला आहे. नसेल माहीत तर आज माहीत करून द्या. 'अकार' म्हणजे 'अ' हा वर्ण आणि 'विल्हा' किंवा 'विल्हे' हा अरबी शब्द आहे. त्याचा अर्थ- वर्ग; भाग, प्रकार; खाते. संस्कृतमध्ये याला 'आनुपूर्वी' असे नाव आहे. अनु पूर्व ई = एकापुढे एक अशा क्रमाने मांडलेली किंवा रचलेली. मराठीत या शब्दाला अनेक प्रतिशब्द वापरले जातात, जसे की वर्णक्रम, वर्णक्रमी, वर्णानुक्रम, अक्षरानुक्रम, अक्षररचना, अकारानुक्रम, अकारविल्हे इत्यादी. आता यातील कोणता शब्द आपण निवडायचा हे ज्याच्या त्याच्या आवडीनुसार ठरवता येईल. वर्णानुक्रम हा त्या त्या भाषांच्या रूढ वर्णमालेतील वर्णांच्या क्रमाला अनुसरून ठेवलेला असतो. मराठीने हिंदी, नेपाळी व संस्कृत भाषेप्रमाणे, ब्राह्मीतून उत्क्रांत झालेली देवनागरी लिपी अंगीकारली असल्यामुळे मराठी वर्णमालेचे संस्कृत वर्णमालेशीही साम्य बघता येते. संस्कृतातील काही वर्ण मराठीमध्ये नाहीत. उदा. दीर्घ 'ॠ', तसेच प्राकृतातून किंवा देशज भाषास्रोतातून आलेला मराठीतील 'ळ' हा वर्ण संस्कृतात नाही. आता वर्णमालेत इंग्रजी वा काही अन्य भाषांतील शब्दांच्या उच्चारांमध्ये आढळणारे 'ॲ' आणि 'ऑ' हे वर्ण समाविष्ट झाले आहेत. इंग्रजी भाषेच्या परिचयामुळे या भाषेतील अनेक शब्द मराठीत आले आणि आत्मसात झाले आहेत. बॅट, बॉल, कॉलेज, कॉफी हे उच्चार पूर्वी 'या' आणि 'आ' अक्षरांनी दाखवले जात. जसे की क्याटलाग, कालेज, ब्याट. आता हे उच्चार दाखवण्यासाठी आपण त्यात या अक्षरांवर अर्धचंद्र काढून दाखवतो. हे परकीय ध्वनी आता स्वरमालेत समाविष्ट झाले आहेत. भाषेला काळानुसार बदलावे लागतेच. इंग्रजी भाषेनेही कित्येक भारतीय शब्द आपलेसे केले आहेत. मात्र उठता-बसता आपण इंग्रजीचा वापर करतो तसा इंग्रजी भाषक इतर भाषेतील शब्दांचा करतात का, याचे उत्तर जाणकारच देऊ शकेल. (शीर्षक संदर्भः अरुण कोलटकर यांची 'तक्ता' कविता)

**- डॉ. निधी पटवर्धन**
nidheepatwardhan@gmail.com





# जिमखाना

**डेक्कन म्हणजे** 'दख्खन' या शब्दाचे इंग्रजांनी केलेले रूप आणि डेक्कन जिमखाना म्हणजे पुण्यातील एक प्रतिष्ठित क्लब. त्या सगळ्या परिसरालाच डेक्कन जिमखाना म्हटले जाते इतके त्या जिमखान्याचे माहात्म्य. त्या जिमखान्यात जायचा इतकी वर्षे पुण्यात राहूनही कधी योग आला नव्हता. अगदी अलीकडेच तो आला तेव्हा प्रथमच समजले की शहराच्या अगदी मध्यवर्ती भागात असूनही तिथे किती मोकळी जागा आहे आणि ऑलिम्पिक दर्जाचे आंतरराष्ट्रीय सामनेदेखील तिथे कसे आयोजित करता येतात. वेगवेगळ्या १५ प्रकारचे खेळ खेळायची इथे सोय आहे. शिवाय मोठा तरणतलावदेखील आहे. याचे बांधकाम सुरू असताना जमिनीखाली बरेच झरे लागले व त्यामुळे हा प्रशस्त तलाव उभारता आला. बॅडमिंटन हा इथला विशेष लोकप्रिय खेळ. या खेळाचे आंतरराष्ट्रीय नियमदेखील इथेच १८७३ साली तयार केले गेले. एखाद्या क्लबप्रमाणे अनेक जण इथे गप्पा मारायलासुद्धा येतात. ज्यांच्या दूरदृष्टीमुळे हे सारे शक्य झाले ते लोकमान्य टिळक आणि तत्कालीन मंडळींना मनापासून नमस्कार करावासा वाटला.

जिमखाना हा बऱ्याच अलीकडे भाषेत रूढ झालेला शब्द. व्यायाम करायची किंवा खेळायची जागा असा त्याचा अर्थ. भारतातील पहिला जिमखाना १८६१ साली उत्तराखंड राज्यातील रुरकी येथे लष्कराच्या पुढाकारातून स्थापन केला गेला. आशिया खंडातील पहिले इंजिनीअरिंग कॉलेज इथेच स्थापन झाले. बंगाल सॅपर्स या लष्कराच्या इंजिनीअरिंग विभागाचे इथे मुख्यालय आहे आणि त्यामुळेच बहुधा हा जिमखाना स्थापन झाला असावा. पुढे भारतातील इतर शहरांतही जिमखाने निघाले. जसे, मुंबईतील बॉम्बे जिमखाना, हिंदू जिमखाना, पारसी जिमखाना किंवा इस्लाम जिमखाना.

फारसी किंवा इंग्रजीमधून आलेले अनेक शब्द आपण या सदरात बघितले. 'जिमखाना' शब्दाचे वेगळेपण म्हणजे त्याचा पूर्वार्ध 'जिम' हा जिम्नॅशियम या इंग्रजी (मूळ लॅटिन) शब्दाच्या लघुरूपावरून, तर उत्तरार्ध 'खाना' हा कक्ष किंवा जागा या अर्थाच्या फारसी शब्दावरून घेतलेला आहे. 'जिम' ऊर्फ व्यायामशाळा आता अनेक ठिकाणी आढळतात. 'खाना' हा फारसी शब्दही जागोजागी आढळतो. जसे की, दिवाणखाना, मुदपाकखाना, फरासखाना, कबुतरखाना, जनानखाना, तालीमखाना, किताबखाना इत्यादी. पण या दोन्ही भाषांच्या परस्परसंपर्कातून साकारलेला 'जिमखाना' हा शब्द अगदी आगळाच म्हणायचा.

भारताच्या संमिश्र सांस्कृतिक वारशाचे 'जिमखाना' हा शब्द म्हणजे एक प्रतीक आहे.

– भानू काळे
bhanukale@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# भाषेचे सौंदर्य टिकवण्याचे कर्तव्य

**पुढील वाक्य** वाचा... 'दारू पिल्यावर तो आपल्या पत्नीला मारझोड करायचा' या वाक्यातील सदोष शब्दयोजना 'दारू पिल्यावर' ही आहे. 'पी' या धातूची क्रियापदाची अशी रूपे इतकी ऐकायला मिळतात की विचारू नका? ती दुरुस्त करण्याचा प्रयत्न केला तर उत्तर मिळते- 'अहो, पण ती रूपे आता भाषेत इतकी रूढ झाली आहे, की ती स्वीकारायला काय हरकत आहे? आम्हाला ती चुकीची वाटत नाहीत.'

एक मात्र जाणवते, ते म्हणजे बोलताना अशा प्रकारची सदोष रूपे लोक योजत असले, तरी लेखनात अशी रूपे सहसा आढळत नाहीत याला कारण मुद्रक या चुका सुधारत असणार, हे नक्की.

**पी** (पिणे) हा ईकारान्त एकाक्षरी धातू आहे. आणखीही काही ईकारात एकाक्षरी धातू मराठीत आहेत. जसे- **भी** (भिणे), **बी** (बिणे), याशिवाय, एकाक्षरी एकारान्त धातू- **ने** (नेणे), **घे** (घेणे), **ले** (लेणे) (लेणे याचा अर्थ परिधान करणे), एकाक्षरी ओकारान्त धातू- **दो** (दोघे) या सर्व धातूची वर्तमानकाळाची रूपे नियमित होतात जसे- पी- पितो, पिते, पितात इत्यादी. नेतो, नेते, नेतात इत्यादी. हो (होणे), 'तू पुढे हो' मात्र इतर रूपे होतो, होतीस इत्यादी भूतकाळी रूपे आहेत. आणखीही वेगळी रूपे होतात, ती पाहू या.

**अनियमित रूपे-** या धातूने प्रत्यय लागून होणारी रूपे- **पी** (पिणे)- प्या, प्यालो, प्यालीस, प्यावे, प्यावी, प्यावेस, प्यायला इत्यादी. **भी**- (भिणे) - भ्या, भ्यावा, भ्यालो, भ्यालास, भ्यालीस, भ्याल्या, भ्यायला इत्यादी. **वी** (विणे)- गाय व्याली, व्याल्या, व्याव्यात, व्यावीस, व्यायता इत्यादी. **ने** (नेणे) - न्या, नेले, नेली, न्यावा, न्यावेस, न्यायी, न्यावीत, न्यायला इत्यादी. **घे** (घेणे)- घ्या, घ्यावा, घ्यावी, घ्याल, घ्यावे, घ्याव्यात, घ्यायला इत्यादी. **ले** (लेणे)- ल्या, ल्याली, ल्यावेत, ल्यावी, ल्यात, ल्यावेस, ल्यायला इत्यादी. **हो** (होणे)- भूतकाळी रूपे- (भी) होतो, होती, होतास, होते, इत्यादी.

**अनियमित रूपे-** व्हा, व्हाल, व्हावा, हाव्या, इत्यादी.

**भूतकाळी अनियमित रूपे-** झालो, झालीस, झालात, झाला, झाली, झाल्या, झालात, झाले इत्यादी.

या अनियमित रूपांकडे दुर्लक्ष न करता योग्य रूपे वाक्यरचना करताना योजावीत. भाषेचे सौंदर्य आणि योग्य शब्दांचा वापर करून भाषेचे स्वरूप टिकवणे वा विद्रूप न करणे हे आपल्या सर्व भाषकांचे कर्तव्यच आहे

**- यास्मिन शेख**





# या कानातली बाळी त्यात कानात...

**आपण आपल्या** अवतीभवती अशी काही माणसं बघतो की, ती काही विशेष उद्योग करत नसतात, पण आपण खूप काही कामे ओढतो आहोत, कामात खूपच व्यग्र आहोत असे भासवत असतात. त्यांच्या बाबतीत ही म्हण वापरली जाते.

शांताबाईंचंच उदाहरण घ्या ना! त्या फार मजेशीर होत्या. आपण फार कामात असतो, आपल्याला अजिबात वेळच नसतो, अशी प्रौढी मिरवण्यात त्यांना फार समाधान मिळत असे. खरे तर काम नाही आणि धाम नाही. उचलला फोन, लाव कानाला आणि मार गप्पा... अशी वागण्याची रीत. आपण न केलेल्या कामाच्या उगाचच बढाया मारणे, दुसऱ्याच्या कामाचे श्रेय स्वत:कडे घेणे हेही त्या सहज करीत असत. हे सारे त्यांच्या सुनेच्या लक्षात येत होतेच. काही दिवस तिने तिकडे डोळेझाक केलीदेखील, पण नंतर नंतर तिला हे सर्व सहन होईना. त्यांच्या या वागण्यावर चांगला उपाय करून त्यांचे पितळ आता उघडे पाडले पाहिजे, असे तिने ठरवले.

एके दिवशी तिच्या सर्व मैत्रिणी तिच्याकडे भिशीसाठी आलेल्या असताना गप्पांच्या ओघात एक मैत्रीण म्हणाली, ''तुझ्या सासूबाई कसल्या



उद्योगी आहेत गं, काय काय करत असतात त्या!'' त्यावर सून म्हणाली, ''कसल्या उद्योगी? तसं भासवण्यात मात्र त्या खूपच यशस्वी होतात. म्हणजे आज भिशीच्या पुरणपोळ्यासुद्धा त्यांनीच केल्या आहेत असं सांगितलं असेल त्यांनी तुम्हाला. होय ना? आणि म्हणाल्याही असतील, 'दमले गं बाई सगळं करून. जरा विश्रांती घेते गं... पडते जरा.' पण हे सर्व नाटक बरं का! काही करत नाहीत त्या! आज सगळं मीच केलंय खरं तर. त्यांचं वर्णन करायचं तर 'रिकाम्या बाई धंदा काय करशी, तर या कानातली बाळी त्या कानात घालशी' असंच करावं लागेल!'' हे ऐकून सगळ्याच जणी आश्चर्यचकित झाल्या.

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचार आणि धार्मिक प्रथा

**आपल्याकडे विविध** धर्म आणि संप्रदाय आहेत. त्यांच्या विविध प्रथांना लोकजीवनात स्थान असते. त्यातील काही प्रथांचे संदर्भ वाक्प्रचारांमध्येही आढळतात. 'ओनामा करणे' हा वाक्प्रचार आपण 'सुरुवात करणे' या अर्थी वापरतो. 'ॐ नमः सिद्धम' या जैनांच्या मंत्राशी त्याचा संबंध असल्याचे काहींचे म्हणणे आहे. पूर्वी 'ओनामासिधं' असे लिहून शिक्षणाची सुरुवात होत असे. वसंत बापट यांनी 'छडी लागे छमछम' या गीतात या मंत्राचा मार्मिक वापर केला आहे, तो असा- 'म्हणा सारे एकदम, ओनामासिधं / छडी लागे छमछम'. संत ज्ञानेश्वर यांच्या 'ज्ञानेश्वरी'मध्ये सुरुवातीला 'ॐ नमो जी आद्या' असे नमन आहे. एकंदरीत 'ॐ नमः'वरून ओनामा हा शब्द रूढ झाला आहे. हैदोसहुल्ला हा वाक्प्रचार मुसलमानांच्या मोहरमशी निगडित आहे. हसन आणि हुसेन यांचा मृत्यू त्यांच्या लग्नानंतर एका लढाईत झाला. त्यामुळे मोहरमच्या वेळी ताबुतांच्या मिरवणुकीत 'हाय दोस्त, हाय दुल्हा' (म्हणजे नवरदेव) असा शोक केला जातो. यातून हैदोसहुल्ला असा शब्द तयार झाला आणि पुढे त्याला आरडाओरडा, गोंधळ असा अर्थ चिकटला. तारांबळ उडणे म्हणजे गडबड गोंधळ उडणे. या वाक्प्रचाराची व्युत्पत्ती मजेशीर आहे. हिंदूंमध्ये



लग्नविधीनुसार लग्नमुहूर्ताची घटिका नेमकी साधण्यासाठी मंगलाष्टकातील 'ताराबलं चंद्रबलं तदेव' हे शब्द फार घाईने म्हटले जातात. त्यातून हा वाक्प्रचार रूढ झाला. 'ताराबलं'चे 'तारांबळ' हे रूप झाल्यामुळे, अनुस्वार देताना अक्षरांची अदलाबदल करून हा वाक्प्रचार गडबडीचे दर्शन घडवतो ! तिलांजली देणे हा वाक्प्रचार हिंदूंच्या एका विधीशी संबंधित आहे. श्राद्धाच्या वेळी मृत व्यक्तीला उद्देशून तीळयुक्त जल वाहतात. त्यातून 'तिलांजली देणे' म्हणजे संबंध संपणे, असा वाक्प्रचार रूढ झाला. गोविंदाग्रज लिहितात- 'दिली तिलांजली अश्रूंची ही त्या प्रेमाच्या नावा, परतायाचे नाही आता त्या प्रेमाच्या गावा.' येळकोट करणे (जयजयकार करणे), पारणे फिटणे (तृप्त होणे), हे वाक्प्रचारही येथे आठवतात. आपल्या जगण्यातील सुखदुःखाचे संदर्भ त्यांना लगडलेले असतात.

– डॉ. नीलिमा गुंडी

nmgundi@gmail.com

भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# परभाषांचा प्रभाव

**परभाषेतले शब्द,** संकल्पना स्वीकारताना ते भाषेचा स्वभाव, उच्चार, व्याकरणिक आचार-विचार यानुसार वळवून घेतले की त्या भाषेत मिसळून जातात. याची आपल्या माहितीतील उदाहरणे म्हणजे हापूस, बटाटा यांसारखे मूळचे पोर्तुगीज शब्द किंवा अजमावणे, छापणे, नावाजणे अशी फारसीतून आलेली काही क्रियापदे. इंग्रजी 'प्लॅटफॉर्म'साठी फलाट, 'कॉन्ट्रॅक्ट'साठी कंत्राट, तर टेबल, बँक असे जसेच्या तसे घेतलेले अनेक शब्द मराठीत आहेत. एकूणच भारतीय किंवा परकीय भाषांतून घेतलेले अनेक शब्द मराठीत आहेत, हे आपल्याला माहीत आहेच. काहींसाठी नवीन प्रतिशब्द तयार केले तर काही परकीय शब्दांना मराठीने जसेच्या तसे आपलेसे केले. कोणत्याही भाषेतला बदल आधी बोलण्याच्या भाषेत दिसतो. हा बदल लेखनाच्या भाषेत उशिरा येतो किंवा कधीकधी येतही नाही. बोलताना, विशेषतः अनौपचारिक बोलताना लोक भाषेचा मोकळेपणाने वापर करतात. शब्द, क्रियापदे आणि एकूणच वाक्यरचना व्याकरणानुसार असतेच असे नाही. त्याशिवाय, बोलण्याच्या भाषेवर घरात किंवा परिसरात बोलल्या जाणाऱ्या इतर भाषा, मित्रमंडळींची भाषा, व्यवसाय-शिक्षणाची भाषा यांतल्या विविध भाषांचा किंवा आपल्याच भाषेच्या



विविध बोलरूपांचा, त्यांच्या प्रादेशिक लकबींचा परिणाम होत असतो. अर्थात ही नैसर्गिक बाब आहे. पण यातून बोलण्याची भाषा विशेषतः नवीन पिढीची भाषा वेगाने बदलत राहते. त्या तुलनेत औपचारिक अभिव्यक्ती किंवा लेखनात असा बदल होत नाही. कारण ते बहुतांश वेळी प्रमाणभाषेचे नियम पाळून केले जाते. त्यामुळे जोपर्यंत प्रमाणभाषेच्या नियमांमध्ये बदल होत नाहीत, तोपर्यंत औपचारिक भाषा फारशी बदलत नाही. अनौपचारिक भाषा वेगाने बदलली तर त्यांच्यामधील अंतर मात्र वाढत राहाते. सर्व भाषांमध्ये, बोलण्याची किंवा अनौपचारिक भाषा आणि लेखनाची किंवा औपचारिक भाषा यांत काही अंतर राहाणे गृहीत धरले असतेच. पण जेव्हा हे अंतर मोठ्या प्रमाणावर वाढते, तेव्हा भाषेमध्ये ताण जाणवू लागतो आणि भाषा टिकवण्यासाठी, ते अंतर कमी करण्यासाठी भाषा अभ्यासकांना भाषेत काही बदलांसाठी विविध प्रकारे प्रयत्न करावे लागतात. परभाषांच्या प्रभावाच्या संदर्भात मराठी भाषेसाठी प्रयत्न करण्याची ती वेळ नक्कीच आली आहे.

**– वैशाली पेंडसे-कार्लेकर**
vaishali.karlekar1@gmail.com





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# ‘पुराणातली वांगी’ आणि ‘लष्करच्या भाकऱ्या’

**काही शब्दांची** किंवा शब्दप्रयोगांची व्युत्पत्ती शोधताना ते अनवधानाने केलेल्या चुकीच्या उच्चारांमुळे रूढ झाल्याचे जाणवते. उदाहरणार्थ, ‘पुराणातली वांगी’ हा शब्दप्रयोग. आपले म्हणणे मांडताना, त्याच्या पुष्ट्यर्थ काही जण उगाचच कुठल्या तरी जुन्या ग्रंथांतील संदर्भ देऊ लागतात. अशा वेळी ‘अहो, ती पुराणातली वांगी पुराणात राहू द्या, आजच्या संदर्भात बोला’ असे त्यांना सुनावले जाते. पण हा शब्दप्रयोग आला कुठून? वांगी ही एक अस्सल भारतीय भाजी. संस्कृतात तिला वंगनः म्हटले आहे व त्यावरूनच बैंगन हे नाव ‘व’चा ‘ब’ होऊन अन्य भारतीय भाषांत गेले असावे. पण कुठल्याही पुराणात वांगी हा प्रकार नोंदलेला नाही! मग ‘पुराणातली वांगी’ हा काय प्रकार आहे? मुळात तो शब्द ‘वांगी’ नसून ‘वानगी’ म्हणजेच ‘उदाहरण’ असा आहे. पण उच्चार करताना ‘वानगी’ शब्दाचा ‘वांगी’ हा चुकीचा उच्चार रूढ झाला आणि ‘पुराणातली वांगी’ हा विचित्र शब्दप्रयोग जन्मास आला! ऐतिहासिक कारणांतून अनेक शब्दप्रयोग भाषेत आले. उदाहरणार्थ, ‘लष्करच्या भाकऱ्या भाजणे’. पूर्वी राजांची फौज मुलुखगिरी करत बाहेर पडायची, तेव्हा वाटेत त्या फौजेचा मुक्काम वेगवेगळ्या गावांत होत असे. त्यांच्या जेवणाची सोय कोण करणार? मग ते सैनिक आसपासच्या गावांतील स्त्रियांना पकडून आणत व जबरदस्तीने स्वतःसाठी भाकऱ्या भाजायच्या कामाला जुंपत.



अर्थातच त्या स्त्रियांना या कामाचा काहीच मोबदला दिला जात नसे. सैनिकांकडे पैसे मागायचे धाडस कोण करणार! अर्थात आजही लोकांकडून फुकटात वस्तू आणि सेवा उकळणारे अधिकारी असतातच! त्यावरून ‘कुठलाही मोबदला न मिळता करावे लागणारे कष्ट’ या अर्थाने ‘लष्करच्या भाकऱ्या भाजणे’ हा शब्दप्रयोग रूढ झाला. हे जबरदस्तीने आणि लाचारीने करावयाचे काम असे. पण या शब्दप्रयोगाला एक चांगला अर्थही काळाच्या ओघात प्राप्त झाला. सामाजिक कार्यकर्ते जेव्हा स्वतःचा काहीही स्वार्थ नसताना, आपल्या कामधंद्याकडे दुर्लक्ष करूनही, केवळ समाजाच्या हितासाठी म्हणून कष्ट उपसतात तेव्हा त्यालाही ‘लष्करच्या भाकऱ्या भाजणे’ म्हटले जाते. पण त्या वेळी मात्र हा शब्दप्रयोग कौतुकदर्शक असतो.

– भानू काळे
bhanukale@gmail.com

लोकसत्ता Fri, 13 May 2022
https://epaper.loksatta.com/c/68004959

# कूस- कुशी, मूस- मुशी

‘**बाळाला डाव्या** कुशीत घेऊन आई पलंगावर पडली होती. थोड्या वेळाने बाळ झोपले आहे, हे लक्षात आल्यावर तिने कुशी बदलली.’ या वाक्यात एक चूक आहे. ती ‘कुशी’ या शब्दासंदर्भात आहे. ‘तिने कुशी बदलली’ मध्ये ‘कुशी’ हा शब्द नाम, स्त्रीलिंगी एकवचनी योजलेला आहे. मग दोन्ही कुशींचा उल्लेख करताना या शब्दाचे अनेकवचन काय होणार? कुशी एकवचन, तर अनेकवचन कुश्या? असे रूप कोठेच आढळत नाही. खरे पाहता, ‘कुशी बदलली’ या वाक्यरचनेचा व्याकरणिक अर्थ असा होतो की ‘कुशी’ हे एकवचनी नाम आहे! मूळ शब्द आहे- कूस (कुशी नव्हे). या नामाचे अनेकवचन कुशी असे आहे. (कूस-नाम, स्त्रिलिंगी, एकवचनी, कुशी- नाम, स्त्रिलिंगी, अनेकवचनी) कूस या एकवचनी शब्दाला विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय लागल्यास त्या शब्दाचे सामान्यरूप कुशीत, कुशीवर, इ. तर अनेकवचनी सामान्यरूप कुशींना, कुशींवर असे होईल. याचा अर्थ असा की, ‘कुशी’ हा एकवचनी, प्रत्यय वा शब्दयोगी अव्यय न लागलेला शब्द नाही. त्यामुळे वरील वाक्य ‘बाळाला डाव्या कुशीत घेऊन आई पलंगावर पडली होती, थोड्या वेळाने बाळ झोपले आहे, हे लक्षात आल्यावर तिने कूस बदलली.’ असे असायला हवे.

संस्कृत शब्द कुक्षी (नाम, स्त्रीलिंगी एकवचनी) आहे. त्याचे मराठीत आलेले तत्भव रूप ‘कूस’ आहे. कुक्षी या शब्दाचा अर्थ आहे शरीराची एक बाजू, कड. मराठीतही कूस शब्दाचा तोच अर्थ आहे. आणखी असेच काही स्त्रीलिंगी शब्द पाहा : घूस- अर्थ- उंदरासारखा एक प्राणी. घूस- स्त्रीलिंगी, एकवचनी नाम. घुशी- अनेकवचनी व सामान्यरूपही.

मूस- अर्थ- धातूचा रस काढण्याचे पात्र, साचा. मूस- स्त्रीलिंगी- एकवचनी. मुशी- (अनेकवचनी)

## काही शाब्दिक चुका

कोटी- कोट्यधीश- बरोबर (कोट्याधीश- चूक), कोट्यवधी-बरोबर (कोट्यावधी- चूक)

कुटुंब- कुटुंबीय- बरोबर (कुटुंबिय- चूक), कुटुंबीयांना- बरोबर (कुटुंबियांना-चूक)

अलंकार- आलंकारिक- बरोबर (अलंकारिक- चूक)

अध्यात्म- आध्यात्मिक- बरोबर (अध्यात्मिक- चूक)

परंपरा- पारंपरिक- बरोबर (पारंपारिक- चूक)

– यास्मिन शेख





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# अतिउत्साह आणि नाचानाच...

**एक फार** मजेशीर म्हण आहे. छोट्याशा म्हणीत नाद आणि लय तर आहेच, शिवाय एक मजेशीर वृत्तीही दडलेली आहे. एखादी व्यक्ती अशी असते, की आपण तिला म्हणतोदेखील, 'अरे! कशाला लुडबुड करतोस? काही कळत तर नाही तुला, काहीतरी भलतंच करून ठेवतोस बघ.' पण त्या माणसाला आपण सांगितलेले पटण्याची सुतराम शक्यता नसते. उलट त्याचा उत्साह आणि नाचानाच काही कमी होत नाही. इतका उत्साह ओसंडत असतो, की त्यावर नियंत्रण ठेवणे इतरांना जमत नाही. अशा व्यक्ती आपल्या आसपास किती तरी वेळा दिसतात. आमच्या घरातले बापूअण्णा असेच व्यक्तिमत्त्व! घरात एखादे कार्य असेल तर यांच्या उत्साहाला काही पारावारच राहायचा नाही. कामे करण्यात सदैव पुढे पुढे करणार! आपल्याला त्या कामातले काही कळते का, हा विचारच नाही. एकदा एका लग्नाच्या सोहळ्यात स्वागत समारंभात सुवासिक गजरे पाहिजे होते. म्हणाले, 'काळजी करू नका! आत्ता आणतो.' मुलीची आई म्हणालीच, 'तुम्हाला काय कळतं हो गजऱ्यातलं? ब्रह्मचारी तुम्ही!' बापूअण्णा म्हणाले, 'म्हणून काय झालं? चांगले टपोऱ्या कळ्यांचे गजरे घेऊन येतो बघा... हा गेलो आणि आलो!' बापूअण्णा गेले आणि हाराभर गजरे घेऊन आले, पण ते गजरे मोगऱ्याचे नव्हते तर तगरीच्या कळ्यांचे होते. त्यासाठी अर्थात हाराभर बोलणीही खाल्ली त्यांनी. मुलीची आई म्हणालीच, 'माहीतच होतं असं काही तरी होईल म्हणून! लांडे लुडबुडे आणि नाचे पुढे पुढे, तशातली गत आहे या बापूअण्णांची. झालं. आता माळा तगरीचे गजरे केसात आणि करा हौस पुरी' हसावे की रडावे अशी परिस्थिती!



– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचार आणि 'अंक'लिपी

**काही वाक्प्रचारांमध्ये** अंक म्हणजे संख्या असतात. 'पोबारा करणे' या वाक्प्रचाराचा अर्थ आहे, पळ काढणे. यामागे एका खेळाचा संदर्भ आहे. पव किंवा पो म्हणजे खेळातल्या फाशावरची 'एक' या अर्थाची खूण होय. जेव्हा तीन फाशांपैकी एकावर १ हे दान येते व इतर दोहोंवर सहा, सहा ठिपके मिळून १२ असे दान पडते; तेव्हा एकूण दान १३ झाल्यामुळे सोंगटी दूर जाते. यावरून हा वाक्प्रचार रूढ झाला.

'चौदा चौकड्यांचे राज्य' या वाक्प्रचाराचा संदर्भ असा आहे- कृत, त्रेता, द्वापार आणि कली अशा चार युगांचा मिळून होणारा काल म्हणजे एक चौकडी. अशा १४ चौकड्या होईपर्यंतचा काळ, त्यामुळे लक्षणेने अर्थ आहे अतिशय दीर्घकाळ टिकणारे, संपन्न राज्य. रावणाचे राज्य असे होते, असे मानले जाते.

'अठरा विसे दारिद्र्य असणे', याचा अर्थ आहे अत्यंत हलाखीची परिस्थिती असणे. मुळात 'अठरा विसे' असा शब्द असणार, असे डॉ. ब्रह्मानंद देशपांडे यांनी म्हटले आहे. ('भाषा आणि जीवन' त्रैमासिक, वर्ष २७ अंक ३) त्यांच्या मते लोकभाषेत 'विसा' हा शब्द वीस या संख्येचे अनेकवचन म्हणून रूढ आहे. त्यामुळे १८ गुणिले २० म्हणजे ३६० दिवस अर्थातच वर्षभर दारिद्र्य असे गणित जुळते.



'छत्तिसाचा आकडा असणे', हाही असाच एक वाक्प्रचार आहे. ३६ या संख्येत तीन आणि सहा हे आकडे परस्परांकडे पाठ करून असतात. संख्येच्या या दृश्यरूपामुळे वाक्प्रचाराचा अर्थ झाला आहे- शत्रुत्व असणे. यात गणिती अर्थ महत्त्वाचा नाही.

'चौदावे रत्न दाखवणे', या वाक्प्रचारामागे समुद्रमंथनाची पौराणिक गोष्ट आहे. समुद्रमंथनात चौदावे रत्न मिळाले, ते होते अमृत. मात्र त्या वेळी देव - दानव यांच्यात युद्ध झाले व दानवांना मार बसला. त्यामुळे चौदावे रत्न याचा अर्थ लक्षणेने ठरला चाबूक आणि या वाक्प्रचाराचा अर्थ रूढ झाला- चाबकाने मारणे, चोप देणे.

अशी ही अंकलिपी उलगडली, की त्यातील आकड्यांची किंमत (अर्थपूर्णता) कळते.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# परकीय शब्दांसाठी मराठी पर्याय



**परकीय शब्दांना** मराठी पर्यायी शब्द सुचवण्याने काय होणार आहे किंवा तयार केलेल्या या पारिभाषिक शब्दांचा कोठे उपयोग करणार, असे प्रश्न पडू शकतात. परंतु, आपण प्रचलित शब्दांच्या साहाय्याने नवीन सामासिक शब्द निर्माण करून त्या परकीय शब्दांऐवजी हे नवीन शब्द प्रचारात आणू शकतो. हे करताना अतितांत्रिक परिभाषा पद्धतीचा अवलंब करून चालणार नाही. कारण अशाप्रकारे तयार केलेल्या शब्दांमध्ये अर्थवाहकता कमी असते आणि असे शब्द समाजाकडून स्वीकारले जाण्याची शक्यताही कमी असते.

'पाठचिकित्से'मधील असे काही शब्द पाहू या.

आता 'ऑथेंटिसिटी' हा शब्द आहे, त्याऐवजी 'अधिकृततत्व' हा शब्द आपण वापरू शकतो. एखाद्या गोष्टीचे प्रामाण्य दाखवायचे असेल तर त्या संदर्भात या शब्दाची आवश्यकता भासते. सप्रमाणता/ अधिप्रमाणता/ यथार्थता/ अस्सलपणा असेही शब्द संदर्भानुसार वापरता येतील.

एखादे संशोधन करत असताना मूळ हस्तलिखिताचा आपणास काहीच तपास लागत नाही आणि ज्याच्या अस्तित्वाविषयी देखील आपल्याला खात्री नाही त्या वेळी 'अनट्रेस्ड' या ऐवजी आपण 'अनुपलब्ध' हा शब्द वापरू शकतो. 'करप्ट रिडिंग'ला 'अपपाठ' म्हणू शकतो. मूळ ग्रंथकाराच्या ग्रंथात नसलेला शब्द म्हणजे 'अपपाठ'. अशा शब्दाला 'प्रक्षिप्त' असेही म्हटले जाते. 'हायपोथेटिकल'ला 'कल्पित' वा 'गृहीत' शब्द वापरता येईल. 'ट्रॅडिशनल रीडिंग'ला 'रूढपाठ', 'परंपरागत पाठ', 'प्रचलित पाठ' असे शब्द वापरता येतील. मॅन्युस्क्रिप्टला/ कोडेक्स मॅन्युस्क्रिप्टला पोथी, हस्तलिखित असेही शब्द आहेत. ब्रिक मॅन्युस्क्रिप्टला 'इष्टिकालेख' म्हणजेच विटांवर कोरलेले लेख, वुडन बोर्ड मॅन्युस्क्रिप्टला 'फलकलेख', सिल्क मॅन्युस्क्रिप्टला 'कौशेयलेख' म्हणजेच रेशमी वस्त्रावर लिहिलेले लेख असा शब्द वापरता येईल. लेदर मॅन्युस्क्रिप्टला 'चर्मपटलेख', अर्थ मॅन्युस्क्रिप्टला 'भूलेख' हा पर्यायी शब्द आहे. जमिनीवर कवड्या, काचा, मणी कंकणे इत्यादींच्या साहाय्याने केलेल्या लिखाणाला 'कुट्टिमलेख' असे नाव वेंकटेशशास्त्री जोशींनी सुचविले आहे. त्यांचा 'पाठचिकित्साविषयक परिभाषा' हा लेख जिज्ञासूंनी मुळातून वाचायला हवा.

– डॉ. निधी पटवर्धन
nidheepatwardhan@gmail.com

भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# गौडबंगाल

**एखादी गोष्ट** आपल्या लक्षात येत नसेल, तर 'हे काय गौडबंगाल आहे?' असे आपण म्हणतो. शब्दकोशात गौडबंगाल शब्दाचे अनाकलनीय, गारूड, मंत्रतंत्र, रहस्यमय, जादूटोणा असे अर्थ दिलेले असतात. बंगाल शब्द आपल्याला ठाऊक असतो. पण गौड हा जोडशब्द कुठून आला? आणि त्या दोन्ही शब्दांचा जादूविद्येशी संबंध काय? गौड हा भारताचा पूर्वेकडील एक विस्तीर्ण प्राचीन भूभाग. कृ. पां. कुलकर्णी यांच्या 'मराठी व्युत्पत्ति कोशा'नुसार प्राचीन काळी ब्राह्मणांच्या १० प्रमुख पोटजाती मानल्या गेल्या होत्या : पंचगौड आणि पंचद्रविड. द्रविड भागाशी जोडल्या गेलेल्या दक्षिणेकडच्या पाच आणि गौड भागाशी जोडल्या गेलेल्या पूर्वेकडच्या पाच. गौड सारस्वत त्यांतलीच एक पोटजात. बंदोपाध्याय (बॅनर्जी), चट्टोपाध्याय (चॅटर्जी), मुखोपाध्याय (मुखर्जी) आणि गंगोपाध्याय (गांगुली) ही प्रसिद्ध बंगाली आडनावे पंचगौडांपैकीच. बंगालचा समावेश प्राचीन काळी गौड भागात करत. स्कंदपुराणात गौड देश म्हणजे वंगदेशापासून भुवनेश्वरपर्यंतचा भाग असा उल्लेख आहे. सध्याच्या बंगालमधील मुर्शिदाबाद जिल्हा आणि मालदा जिल्हा हे प्राचीन गौड भागाचे मुख्य स्थान. पुढे मुस्लिम राज्यकर्त्यांनी गौड आणि बंगाल या दोन्ही भागांचा एकत्रित उल्लेख बंगाल म्हणून



करायला सुरुवात केली. सुपीक जमीन आणि भरपूर पाणी असल्याने बंगाल अतिशय संपन्न होता. गूढतेचे व रहस्यमयतेचे आकर्षण इथे फार. सत्यजित रे यांच्यासारख्या प्रतिभावंतांनीही अनेक रहस्यकथा लिहिल्या. एरवी पुरोगामी असलेला बंगाल जारणमारण, मंत्रतंत्र, गारूड, जादूटोणा या गूढविद्यांसाठीही पूर्वीपासून प्रसिद्ध आहे. बंगाली जादूगार 'महाबली... काली कलकत्तेवाली... छू मंतर' वगैरे म्हणत पिशाच्चबाधा उतरवणे, रोगांवर मांत्रिक उपचार करणे असले अंधश्रद्ध प्रकार करत असत. पी. सी. सरकार यांच्यासारखे जगप्रसिद्ध जादूगार इथलेच. इंग्रज लेखकांना चक्रावून टाकणारी 'इंडियन रोप ट्रिक' ही जादू इथलीच. गूढबंगाल म्हणजे गौडबंगाल अशीही एक व्युत्पत्ती केली जाते. ज्या प्रांताने रवींद्रनाथ टागोर, अमर्त्य सेन आणि अभिजित बॅनर्जींसारखे नोबेल पुरस्कार विजेते निर्माण केले, तोच बंगाल प्रांत जादूटोण्यासाठी देखील का प्रसिद्ध असावा हेही एक गौडबंगाल आहे!

– भानू काळे
bhanukale@gmail.com





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# 'कळतंय ना, मग झालं!' हेच भाषाप्रेम?

'**या कादंबरीचे** त्या टीकाकाराने जे परीक्षण केले आहे, तिच्यात बऱ्याच त्रुटी आढळतात.'

या वाक्यात एक चूक आहे, ती म्हणजे 'तिच्यात' या शब्दाची सदोष योजना. 'तिच्यात' या सार्वनामिक शब्दातील मूळ सर्वनाम आहे- 'ती' (स्त्रीलिंगी एकवचनी). 'ती' या शब्दाला प्रत्यय वा शब्दयोग लागून शब्द होतील तीत, तिच्या, तिच्यात, तिच्यामध्ये इ. वरील वाक्यात 'तिच्यात' हा शब्द 'परीक्षण' या शब्दासाठी योजलेला आहे. 'परीक्षण' हे नाम नपुंसकलिंगी, एकवचनी आहे; 'तिच्यात' हा शब्द 'कादंबरी' या स्त्रीलिंगी एकवचनी नामासाठी नाही. त्रुटी आहेत त्या परीक्षणात; कादंबरीत त्रुटी नाहीत, पण फारसा विचार न करता कित्येक मराठी भाषक अशी चूक करतात. चूक लक्षात आली, तरी ऐकणारा त्या वाक्यातील अर्थ समजून घेतो; पण नेमकी सदोष वाक्यरचना कोणती, ती दुरुस्त करणे आपले कर्तव्य आहे, असा विचार सहसा कोणी करत नाही! आणि समजा, ती चूक बोलणाऱ्याच्या वा लिहिणाऱ्याच्या निदर्शनास एखाद्याने आणली तर तो काय म्हणणार? 'चालायचंच!' ती चूक दुरुस्त करणे आवश्यक आहे, असे त्याला वाटत नाही. आपणच आपल्या भाषेवर अन्याय करत आहोत, याची जाणीवच अनेकांना नसते.

या संदर्भात माझा एक अनुभव येथे नोंदवावासा वाटतो. एक प्रतिष्ठित सद्गृहस्थ 'मला तुमचं मत पायजेल' असे म्हणाले. 'पाहिजे' ऐवजी 'पायजेल' असा चुकीचा प्रयोग ते अनेकदा करायचे. एका मराठी भाषाप्रेमीने ही चूक अत्यंत सौम्यपणे, त्यांचा अनादर न करता त्यांच्या निदर्शनास आणून दिली. त्या सद्गृहस्थांनी काय उत्तर द्यावे? 'अहो, कळतंय ना मी काय म्हणतोय ते? मग झालं तर' चूक दाखवणारा यावर काय बोलणार?

आता काही शाब्दिक चुका पाहू. येरझाऱ्या- चूक, येरझारा-बरोबर (मूळ शब्द आहे येरझार- स्त्रीलिंगी एकवचनी) या शब्दाचा अर्थ आहे-खेप. त्यामुळे 'येरझार' चे अनेकवचन येरझारा होईल (येरझाऱ्या नव्हे.) आणखी एक शब्द अनेकदा चुकीचाच बोलला व लिहिला जातो. तो शब्द आहे- देदीप्यमान-हा बरोबर शब्द आहे. दैदीप्यमान किंवा दैदिप्यमान - हे दोन शब्द चुकीचे आहेत.

**-यास्मिन शेख**

लोकसत्ता Mon, 23 May 2022
https://epaper.loksatta.com/c/68204523



भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# लिंब पडला ठेंगणा आणि बाभळ गेली गगना

**एकदा महिला** मंडळातील बायका आपल्या मैत्रिणीच्या नातवाच्या मौजीबंधनाला गेल्या. मुंज अगदी थाटात होत होती. मैत्रिणीच्या सुनेने तिचे लग्न झाल्यावर खूपच प्रगती केली होती. त्यावरून महिला मंडळात जोरदार कुजबूज सुरू होती. एक बाई म्हणाली, 'तिच्या सुनेचं पाणी काही वेगळंच आहे बरं का!' दुसरी म्हणाली, 'हो तर! अहो, खरं सांगायचं तर घरात सर्वांत जास्त कमावती तीच आहे.' तिसरी म्हणाली. 'रूप, गुण सगळ्याच बाबतीत तिचा नवरा तिच्यापेक्षा जरा कमीच आहे बरं का.' आणखी एक जण म्हणाली, 'खरंच गं बाई, याच्यापेक्षा कितीतरी पटींनी चांगला नवरा मिळाला असता तिला.' आणखी एक जण म्हणाली, 'गप्प बसा बघू आता जरा. अगं बायांनो, त्यांच्या लग्नाला आता इतकी वर्षं झाली आहेत. मजेत संसार चालला आहे त्यांचा आणि तुम्ही कसली चर्चा करत बसलायत इथे?' पण तरीही एकीला रहावले नाहीच. ती म्हणाली, ''नाही, आम्हाला इतकंच म्हणायचं आहे की 'लिंब पडला ठेंगणा आणि बाभळ गेली गगना' तशातली गत आहे या नवराबायकोच्या जोडीची! इतकंच.'' अनेक बायका एकत्र जमल्या की अशा चर्चांना उधाण येते.

समाजाच्या काही कल्पना अगदी ठाम झालेल्या असत. उदा. बाईने नम्र असावे. तिने कोणाला उलट बोलू नये. घरातली सर्व कष्टाची कामे करावीत. स्त्री दिसायला सुंदर असावी इत्यादी. पती-पत्नीची जोडी कशी असावी या विषयीही काही मते समाजात पक्की रुजलेली आहेत. म्हणजे पत्नी सुंदरच असावी, पती गुणाने उजवा असावा. पण कधी याविरुद्ध दृश्य असेल तर समाज ते चटकन सकारात्मकतेने स्वीकारत नाही. त्यावर टीका केली जाते. आता हे चित्र हळूहळू बदलत आहे, हेही चांगलेच आहे.

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com





कांचन कराई द्वारा संकलित

# एकाक्षरप्रधान वाक्प्रचार

**भाषा ही** चिन्हव्यवस्था मानली जाते. काही वाक्प्रचार म्हणजे भाषेच्या चिन्हव्यवस्थेतील चिन्हरूपे आहेत. 'ओ की ठो न कळणे' या वाक्प्रचाराचा अर्थ आहे मुळीच न कळणे . 'ओ' हे अक्षर 'ओनामासिधम्' या मंत्राचे आद्याक्षर असून येथे ते त्या मूळशब्दाचे प्रतीक/ चिन्ह ठरते. शिक्षण सुरू करताना पूर्वी हा मंत्र लिहिला जात असे. त्यामुळे 'ओ' न कळणे म्हणजे शिक्षण नसणे, काहीही न कळणे. 'ठो' हे अक्षर 'ओ' या अक्षराला अनुप्रास साधणारे म्हणून घेतले आहे. 'ठो' म्हणताना 'ठोंब्या' हा शब्द आठवतोच! ठोंब्या म्हणजे अक्षरशत्रू. त्यामुळे हा वाक्प्रचार चपखल ठरतो.

'त/ता' वरून ताकभात ओळखणे म्हणजे अचूक तर्क करणे. पहिले अक्षर ऐकताक्षणी पुढची अक्षरे हेरून संपूर्ण शब्द ओळखणे, यातून तल्लख तर्कबुद्धी कळते. मनकवडेपणा असणाऱ्या व्यक्तीसाठीदेखील हा वाक्प्रचार वापरला जातो. साधारणतः स्त्रियांमध्ये 'त' वरून ताकभात ओळखण्याची ताकद असते, असा समज आहे.

'ध' चा 'मा' करणे, हा वाक्प्रचार एका ऐतिहासिक घटनेशी जोडला गेला आहे. राघोबादादा पेशवे यांनी 'नारायणराव यांना धरावे' असा हुकूम गारद्यांना दिला होता. राघोबादादा यांच्या पत्नी आनंदीबाई यांनी त्यात 'ध' च्या ठिकाणी 'मा' करून 'धरावे' या ऐवजी 'मारावे' असे केले; असा प्रवाद आहे. यावरून 'मूळ गोष्टीत फेरफार करणे' या अर्थी हा वाक्प्रचार रूढ झाला.



'मी मी म्हणणे' म्हणजे बढाई दाखवणे. 'मी' चा दोनदा वापर केल्यामुळे त्यातून फाजील स्वाभिमान व्यक्त होतो. 'मी म्हणणे' असाही वाक्प्रचार आहे. त्याचा अर्थ आहे प्रभाव दाखवणे. 'मी' हे सर्वनाम स्वतःसाठी वापरले जाते. त्यामुळे स्वतःच्या अस्तित्वाची जाणीव करून देणे त्यातून घडते. उदा. ऊन मी म्हणत होते. या वाक्याचा अर्थ आहे- ऊन आपला प्रभाव दाखवत होते.

हे वाक्प्रचार कोड्यासारखे वाटतात. त्यांच्यातील एकाक्षरांमधील गर्भितार्थ ओळखणे महत्त्वाचे आहे. संक्षेप ही भाषेची किती मोठी शक्ती आहे, हे अशा वाक्प्रचारांमधून कळते.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# भाषा का बदलते?



**राज्यक्रांती, धर्मक्रांती,** समाजक्रांती, विचारक्रांती अशा क्रांतीच्या विविध प्रकारांमुळे भाषेत क्रांती घडून आली, बदल घडले असे इतिहास सांगतो. इंग्रजीच्या प्रभावाच्या संदर्भात सद्यकाळात त्यात 'माध्यम'क्रांती या कारणाची भर पडली आहे, असे म्हणायला हरकत नाही.

भाषेतील बदल हा आधी बोलण्याच्या भाषेत आणि नवीन पिढीच्या भाषेत दिसतो. आज बाल किंवा तरुण पिढीच्या शिक्षणाचे माध्यम, त्यांची विविध भाषक मित्रमंडळी, समाज माध्यमांमधील लघुरूपे किंवा भावचिन्हे वापरून झालेली मुक्त-वैश्विक भाषा आणि या पिढीचे जगभरात होणारे स्थलांतर, असे घटक त्यांच्या भाषेवर परिणाम करत आहेत. त्या तुलनेत आज चाळिशी गाठलेल्या आणि त्यापुढच्या वयातल्या मराठी माणसांची भाषा बहुतांश स्थिर आहे. आणखी २५-३० वर्षांनंतर आजच्या नवीन पिढीची भाषा हीच तेव्हाची 'जिवंत' समाजभाषा असणार, आहे हे वास्तव लक्षात घ्यायला हवे.

आज विविध कारणांमुळे हिंदी, गुजराती अशा प्रादेशिक भाषक शेजाऱ्यांबरोबरच मालवणी, वऱ्हाडी, अहिराणी अशा विविध बोलींचे भाषकही आधीपेक्षा एकमेकांच्या जास्त संपर्कात येत आहेत. ते एकमेकांच्या बोली, त्यातले साहित्य समजून घेत आहेत. मराठीत मोठ्या प्रमाणावर अनुवादित साहित्य येत आहे आणि त्याला वाचकांकडून भरपूर मागणी आहे. त्यामुळे ही ललित, वैचारिक भाषांतरे, वृत्तपत्रीय भाषांतरित बातम्या या सर्वांची काहीशी मूळ भाषेशी साम्य असलेली वाक्यरचना यांचाही अप्रत्यक्ष परिणाम भाषेवर होत आहे. उदा. 'कराल का?' ऐवजी 'करू शकाल का?' '...ने सांगितलं.' ऐवजी '...कडून सांगण्यात आलं.'

भाषेच्या बाह्य व आंतर स्वरूपांत सातत्याने फरक पडणे हा भाषेचा स्वभाव आहे, असे ज्येष्ठ भाषा अभ्यासक कृ. पां. कुलकर्णी यांनी म्हटले आहे. भाषेत फरक पडणे ही नवीन वा चिंतेची बाब नाही. मात्र, भाषेतील आजच्या झंझावाती बदलांची मराठी भाषकांनी आणि अभ्यासकांनी नोंद घेतली आहे का आणि ते बदल पचवून भाषेचे तारू अधिक वेगाने पुढे नेण्यासाठी ते तयार आहेत का?

– वैशाली पेंडसे-कार्लेकर
vaishali.karlekar1@gmail.com





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# खांदेपालट आणि गंगाजळी

**काही शब्दांची** व्युत्पत्ती धार्मिक परंपरांशी जोडलेली असते; पण काळाच्या ओघात त्यांच्यात बराच अर्थबदल झालेला असतो. खांदेपालट आणि गंगाजळी हे असेच दोन शब्द. दोन्ही शब्दांचा संबंध मृत्यूशी जोडलेला आहे, हा एक योगायोग. खांदेपालट शब्दाचा संबंध अंत्ययात्रेशी आहे. हल्ली बहुतेकदा रुग्णवाहिकेतून किंवा शववाहिकेतून मृतदेह स्मशानभूमीवर नेला जातो; पण तरीही मृतदेह तिरडीवर ठेवलेला असतो आणि तिरडीच्या चारही बाजूंना असलेले बांबू आपापल्या खांद्यावर घेऊन नातेवाईक काही पाऊले चालतात. पूर्वी स्मशानभूमी गावाबाहेर असे आणि अशा वेळी दीर्घकाळ तिरडी खांद्यावर घेऊन थकलेले नातेवाईक बाजूला होत आणि त्यांची जागा अन्य नातेवाईक घेत. हा खरा खांदेपालट शब्दाचा अर्थ. आज आपण हा शब्द 'रिशफल' या इंग्रजी शब्दाला समानार्थी वापरतो. एखाद्या व्यक्तीकडे असलेली विशिष्ट जबाबदारी त्याच्याकडून काढून घेऊन ती दुसऱ्या व्यक्तीकडे सोपवणे याला सामान्यतः खांदेपालट असे म्हटले जाते. उदाहरणार्थ, मंत्रिमंडळात, प्रशासनात किंवा एखाद्या आस्थापनेत जेव्हा खात्यांची अदलाबदल केली जाते, तेव्हा त्या बदलाचा उल्लेख खांदेपालट असा केला जातो. 'गंगाजळी' हा असाच एक धार्मिक परंपरेशी



निगडित पण आज वेगळ्या अर्थाने वापरला जाणारा शब्द. गंगा नदी पवित्र मानली जाते; तिच्यात डुबकी घेतली की पापे धुतली जातात; गंगाजल प्राशन केले की पुण्य मिळते ही बहुमान्य श्रद्धा. तिचे घोटभर पाणी मरणोन्मुख व्यक्तीला अगदी अखेरच्या क्षणी पाजायचे ही त्याच श्रद्धेतून आलेली एक जुनी परंपरा. म्हणून अनेक घरांमध्ये गंगेचे पाणी एखाद्या बाटलीत, गडूत किंवा कुपीत जपून ठेवलेले असे. आज ही परंपरा मागे पडत आहे आणि त्याऐवजी गंगाजळी हा तद्भव शब्द राखीव निधी म्हणजेच 'रिझर्व्हज' या शब्दाला समानार्थी म्हणून रूढ झाला आहे. कंपनीच्या किंवा संस्थांच्या 'बॅलन्स शीट'मध्ये असा निधी दर्शवलेला असतो आणि अडचणीच्या वेळी किंवा व्यवसाय वाढवण्यासाठी त्याचा वापर करता येतो. सरकारकडेही असा धनसंचय असतो; विदेशी चलनाचीही गंगाजळी असते. गंगाजळी शब्द जमवलेल्या माहितीच्या संदर्भातही वापरला जातो. असे शब्द भाषा समृद्ध करणारे धार्मिकतेचे एक आगळे अंग ठरतात.

– भानू काळे
bhanukale@gmail.com





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# ‘र’लाही दीर्घ ऊकार असतो

**माझ्या एका** विद्यार्थिनीने स्वतः लिहिलेली एक लघुकथा मला वाचायला दिली. कथा छान होती, पण कथेतील काही शब्द मला खटकले. ती भेटल्यावर मी तिच्या कथेबद्दल अनुकूल अभिप्राय दिला, ती खूष झाली. मी तिला म्हणाले, ‘या कथेतील काही शब्द तू चुकीचे लिहिले आहेस. ते शब्द आहेत- ‘तरु, भरुन, रुपक, करुन.’ तिला आश्चर्य वाटले. ‘काय चूक? हे शब्द मी बिनचूक लिहिले आहेत.’ मी तिला म्हणाले, ‘या शब्दांतील रु तू ऱ्हस्व लिहिला आहेस. तो ऱ्हस्व रु नसून दीर्घ रू आहे.’ यावर ती काय म्हणाली, ते पाहा. ‘र ला दीर्घ ऊकार असतो?’ मी गमतीने म्हणाले, ‘इतर सर्व व्यंजनांना दीर्घ ऊकार असतो... ऱ्हस्व आणि दीर्घ उ र या व्यंजनाला का नाही? त्याने काही अपराध केला आहे का?’ त्यावर ‘मग तो कसा लिहायचा?’ असा प्रश्न तिने विचारला, मी तिला ऱ्हस्व रु आणि दीर्घ रू लिहून दाखविले. ती मला म्हणाली, ‘मला माहीतच नव्हतं हो!’

इतर व्यंजनांत आणि र मध्ये एक महत्त्वाचा फरक आहे - फक्त लेखनात, हे मी तिला दाखवून दिले. कु, खु, चु, टु, तु, पु, क्षु या व अशा सर्व व्यंजनांना ऱ्हस्व उकार त्या व्यंजनाखाली लागतो, तसाच दीर्घ ऊकारही व्यंजनाच्या खाली लागतो. फक्त मराठीत ‘र’ या व्यंजनाला उकार-ऊकार थोडे वेगळ्या पद्धतीने लागतात. जसे रु-रू. म्हणजे र या व्यंजनाच्या मध्यावर उकार (रु) लागतो. तसेच रू हे दीर्घ ऊकार लागलेले रूप आहे.

आता आपण काही ऱ्हस्व उकार ‘रु’ आणि दीर्घ ऊकार ‘रू’ असे शब्द पाहू या.

र- ऱ्हस्व-रु - रुपया, रुसणे, रुची, रुमाल, वरुण, करुणरस, रुचकर.

र-दीर्घ- रू - वरून, दुरून, विरून, रूप, रूपवान, लेकरू, वासरू, अंथरूण, पांघरूण, गुरू, सामान्यरूप, बुरूज.

आणखी काही शब्द - या शब्दांचे चुकीचे उच्चार आणि चुकीचे लेखन -

अक्षता-बरोबर, अक्षदा-चूक, गौरीहर-बरोबर, गौरीहार-चूक, अधीन-बरोबर, आधीन-चूक, ऊर्मी-बरोबर, उर्मी-चूक, कोणता-बरोबर, कोणचा- चूक, जादा-बरोबर, ज्यादा-चूक, डाहळी-बरोबर, डहाळी-चूक, दक्षिणा-बरोबर, दक्षणा-चूक, दूर्वा-बरोबर, दुर्वा-चूक.

– यास्मिन शेख





# वजनाचा धोंडा अन् फुकण्याचा कोंडा

**काही माणसे** दिसायला अवाढव्य असतात पण तशी अगदीच फोपशी असतात. आपण एखाद वेळेस म्हणतो देखील 'नुसता एरंडासारखा वाढलायस पण काही उपयोग नाही तुझा!' असे म्हणतात की एरंड वाढतो अफाट पण आतून अगदी पोकळ असतो. अशीच यांची स्थिती असते. ते असतात फक्त आकारानेच मोठे पण कामाला मात्र खोटे! धान्य उखळात घालून सडल्यावर जो कोंडा निघतो त्याचा काहीच उपयोग होत नाही तशासारखी यांची स्थिती असते.

यश आणि जय दोघे सख्खे भाऊ. यश जरा प्रकृतीने दणकट पण जय यशच्या मानाने



अंगापिंडाने बेताचाच. अगदी किरकोळ शरीरयष्टीचा. सगळे त्यांना 'लॉरेल-हार्डी'ची जोडी असेही चिडवत असत.

यशच्या दणकट शरीरयष्टीकडे पाहून साहजिकच त्यालाच काम करण्यासाठी बोलावण्यात येई. यश अगदी अभिमानाने कामासाठी होकारही देत असे पण थोड्याच वेळात दिलेले काम करताना तो अगदी घामाघूम होऊन जात असे. त्यामुळे ते काम त्याला सोडून द्यावे लागत असे. मग अर्थात जयला बोलावले जात असे. त्याची किरकोळ शरीरयष्टी बघून सगळीकडे एकच हशा पिकात असे.

सगळ्यांच्या मनात एकच भाव असे की जे काम यशला जमू शकले नाही ते जय काय करून दाखवणार? आणि थोड्याच वेळात जय ते काम करून मोकळाही होत असे. हे बघून घरातली सगळी मंडळी अचंबित होत. मग कोपऱ्यात बसून हे सर्व नाटक बघणारे आजोबा म्हणत, ''मला माहीतच होतं की हे काम यश नाही जयच करून दाखवेल म्हणून. तो जरी शरीराने यश इतका दणकट नसला तरी फोपसा नाही, चांगला काटक आहे. यशसारखा 'वजनाचा धोंडा अन् फुकण्याचा कोंडा' नाही. आणि बरं का! शक्ती-युक्ती जिये ठायी, तिथे भगवंत नांदती! हे म्हणणेही जयच्या बाबतीत खरे आहे.''

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचारांमधील देहबोली



**आपल्या लहानसहान** हालचाली कळतनकळत आपल्या भावभावना प्रकट करीत असतात. हीच देहबोली होय. वाक्प्रचारांमधून ही देहबोली कशी व्यक्त होते, याची काही उदाहरणे पाहू या.

भावना व्यक्त करण्याचे काम डोळे प्रभावीपणे करतात. डोळ्यांच्या खुणांवर आधारित संवादाला 'नेत्रपल्लवी' असेही म्हटले जाते. त्यामुळे डोळ्यांच्या हालचालीशी निगडित वाक्प्रचार आढळतात. लहानपणी भीम बकासुराची गोष्ट ऐकताना 'डोळे गरागरा फिरवणे, डोळे मोठे करणे' या वाक्प्रचारांची ओळख आपल्याला झालेली असते. राग येणे हा त्याचा अर्थ आपल्याला त्या नाट्यपूर्ण हालचालींमधून प्रत्ययाला आलेला असतो. तसेच डोळे मोडणे/ मुरडणे हा वाक्प्रचार 'नेत्रकटाक्ष टाकणे' असा अर्थ व्यक्त करतो. संत एकनाथांच्या एका रचनेत राधेच्या डोळ्यांच्या लाडिक विभ्रमाचे वर्णन आले आहे, ते असे : 'वारियाने कुंडल हाले, डोळे मोडीत राधा चाले'.

बोलताना वापरावयाचे दर्शनी अवयव म्हणजे तोंड, दात, जीभ हे होय. तोंड वेंगाडणे याचा शब्दशः अर्थ आहे, तोंड पसरणे नि वाक्प्रचाराचा अर्थ आहे - गयावया करणे. उदा. कोणत्याही स्वाभिमानी माणसाला कोणापुढे तोंड वेंगाडायला आवडत नाही. दात विचकणे हा वाक्प्रचारही चित्रदर्शी आहे. हसण्याचे नाना प्रकार असतात. जेव्हा हसण्यात उपहासाची छटा मिसळते तेव्हा त्याला दात विचकणे म्हणतात. जीभ ही रसना असल्यामुळे आस्वाद घ्यायला आसुसलेली असते. तिचा तो स्वभाव अवाजवी रूपात जेव्हा प्रकट होतो, तेव्हा 'जिभल्या चाटणे' हा वाक्प्रचार चपखल ठरतो, त्याचा अर्थ आहे आशाळभूत, दयनीय होणे. 'बोबडी वळणे' ही अवस्था बोलणाऱ्याच्या मानसिक अवस्थेचे प्रत्यंतर देते. अडखळत बोलणे, सुसंगतपणे बोलता न येणे हा त्याचा सूचित अर्थ 'भीती वाटणे' या मनःस्थितीची अचूक कल्पना देतो. उदा. 'गोष्टीत भूत हा शब्द येताच काही मुलांची बोबडी वळते.' पायाच्या हालचालीसुद्धा बोलक्या असतात. हातपाय आपटणे या वाक्प्रचाराचा अर्थ 'रागावणे, नापसंती व्यक्त करणे' असा आहे, हे न सांगताच कळते. देहबोली टिपणारे असे वाक्प्रचार साहजिकच अधिक प्रमाणात वापरले जातात.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# कात टाकून टिकणारी भाषा

**आपण रोज** आरशात पाहतो आणि हळूहळू जाणवू लागते, की आपला चेहरा बदलत चालला आहे! आपण आता म्हातारे होत आहोत. तसेच, आपली भाषाही म्हातारी होत असेल का? भाषा म्हातारी होत नाही, ती रूप बदलते. बदल शाश्वत आहे. 'भाषिक बदल' ही अगदी नैसर्गिक प्रक्रिया आहे. तिला कोणी थोपवू शकत नाही. हा बदल ध्वनी, शब्द, वाक्य, अर्थ या सर्व पातळ्यांवर होतो.

चक्रधरकालीन वा ज्ञानेश्वरकालीन मराठी भाषा आणि आजची मराठी भाषा यामध्ये फरक आहे. प्रपंचु, रसु, रामचंद्रु हे शब्द कालौघात प्रपंच, रस, रामचंद्र असे झाले. हे बदल कधी रूपात होतात, तर कधी अर्थात होतात. परभाषेतील शब्द मराठीत सामावून घेत असताना व्याकरणिक पातळीवरसुद्धा बदल होतात. जसे, मूळ भाषेत नपुसकलिंगी असणारी सायकल मराठीत स्त्रीलिंगी होते, तर नपुसकलिंगी फ्रिज पुल्लिंगी होतो.

आम्ही वाढदिवस 'मनवतो', पाहुण्यांना काही 'खिलवतो', असे म्हणावेसे वाटते याचे कारण भाषिक अभिव्यक्तीमध्ये नावीन्य हवे असते. अगदी कवीसुद्धा आपापल्या परीने साहित्याची भाषा बदलत असतात. 'मनमोर', 'उधळ', 'मोकळा' असे शब्द कवींनी आपल्याला दिले आहेत. कधी



हा भाषेतला बदल अमर्याद उत्साह, अनुकरणाची प्रवृत्ती, वेगळ्या पद्धतीने काहीतरी सांगतोय असा आविर्भाव यातूनही झालेला असतो. तरुणांना 'रापचिक', 'डिमलाईट', 'अड्डस', 'चाबूक', 'सख्याहरी', 'फंडू', 'चिल' हे शब्द वेगळेपणा, बंडखोरी, धाडसातून वापरावेसे वाटतात.

राजकीय-सामाजिक स्थित्यंतरातून, औद्योगिक-आर्थिक स्थित्यंतरातून भाषेत नवीन शब्द येतात, रुळतात, स्थिरावतात. भाषिक बदलाची एकच एक दिशा सांगता येत नाही. विविध भाषांच्या प्रभावातून येणारी स्थित्यंतरे मराठीने पचवली आहेत. त्यातून मराठी भाषा रोडावली नसून तिचे रूप बदलते आहे. खेड्यापाड्यांतील मराठी आणि जागतिकीकरणाच्या रेट्यातील महानगरातील मराठी यातही वेगळेपण दिसतेच. भाषांचे सततचे संपर्क आणि सहअस्तित्वातून होणारी स्थित्यंतरे आपण टाळू शकत नाही, हे सत्य आहे, ते स्वीकारायला हवे. थोडक्यात काय, कात टाकते तीच भाषा टिकते.

**– डॉ. निधी पटवर्धन**
nidheepatwardhan@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# झेरॉक्स काढून मिळेल !

**काही दिवसांपूर्वी** 'डालडा' शब्दाच्या व्युत्पत्तीविषयी या सदरात लिहिले होते. ते एका कंपनीने वनस्पती तुपाला दिलेले नाव आहे; पण ते इतके लोकप्रिय ठरले, की 'डालडा' हाच वनस्पती तुपाला प्रतिशब्द झाला ! असाच दुसरा एक शब्द आज जवळपास सर्वच भाषांत रूढ झाला आहे. तो शब्द आहे झेरॉक्स. आजही 'झेरॉक्स काढून मिळेल' अशा पाट्या सर्वत्र दिसतात; 'फोटोकॉपी काढून मिळेल' अशी पाटी कुठेच दिसत नाही !

या शब्दाचे निर्माते चेस्टर कार्लसन हे न्यू यॉर्क येथील पेटंट कार्यालयात वकिली करत. तिथे दस्तावेजांच्या अनेक प्रती लागत व त्या टाइप करून घेणे खूप कष्टाचे काम होते. त्यावर बराच अभ्यास करून त्यांनी १९३८ साली अशा प्रती काढायची प्रक्रिया शोधली. तिला झेरॉग्राफी असे नाव देऊन तिचे पेटंटदेखील घेतले. 'झेरो' आणि 'ग्राफी' हे 'कोरडे' आणि 'लेखन' या अर्थाचे दोन ग्रीक शब्द. या प्रक्रियेत ओल्या शाईचा नव्हे, तर कोरड्या पावडरीचा वापर होत असे. संशोधनाला जोवर व्यावसायिक स्वरूप लाभत नाही, तोवर ते तसे उपयुक्त ठरत नाही. कार्लसन यांच्या बाबतीत तेच घडले. आयबीएमसारख्या बड्या कंपन्यांनी ते पेटंट खरेदी करायला नकार दिला. पुढे २० वर्षांनी त्यांना जोसेफ विल्सन हे उद्योजक भेटले. त्यांनी कार्लसन



यांच्याशी भागीदारी करून १९५९ साली झेरॉक्स ९१४ हे यंत्र बाजारात आणले. ते प्रचंड लोकप्रिय झाले. 'सर्वाधिक यशस्वी एकल उत्पादन' ('द मोस्ट सक्सेसफुल सिंगल प्रॉडक्ट') म्हणून त्याचा जगभर गौरव झाला. पुढे काही जपानी कंपन्यांनी झेरॉक्सला जोरदार टक्कर दिली, पण त्यांच्यावर झेरॉक्सने मात केली. याच झेरॉक्सने १९६९ साली पहिल्या लेझर प्रिंटरची निर्मिती केली. आजच्या प्रकाशन व्यवसायात क्रांती करणारे आणि पुस्तकाच्या एक ते ३०० कितीही प्रती काढायची सोय असलेले 'प्रिंट ऑन डिमांड' हे यंत्रही याच कंपनीचे. अध्यक्षपदी आफ्रिकन-अमेरिकन महिलेची नेमणूक करणारी पहिली 'फॉर्च्युन ५०० कंपनी' हीच. आपल्या दृष्टीने एक रोचक बाब म्हणजे कार्लसन भगवद्गीतेचे अभ्यासक होते.

आजही आपल्याला विविध अर्जांसोबत कागदपत्रांच्या प्रती जोडाव्या लागतात. त्यासाठी कोणी छायाप्रत काढत नाही, फोटोकॉपीही काढत नाही; सगळे 'झेरॉक्स' काढतात !

– भानू काळे
bhanukale@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# तत्सम शब्दाचे अनेकवचन

| संस्कृत शब्द | मराठीतील तत्सम शब्द | एकवचन - अनेकवचन |
|---|---|---|
| समाधि | समाधी | समाधी |
| त्रुटि | त्रुटी | त्रुटी |

'**मी गणेशचतुर्थीच्या** दोन दिवस आधी गणपतीची मूर्ती विकत घ्यायला गेलो. त्या दुकानात इतक्या विविध प्रकारच्या मूर्त्या होत्या की, त्यांतली कोणती मूर्ती घ्यावी हेच मला कळेना.'

ही वाक्ये वाचल्यावर वाचकांच्या लक्षात चूक आली असेल. ती चूक म्हणजे- 'मूर्त्या' या शब्दाची. मूर्ती (संस्कृत शब्द मूर्ति), मराठीत हा शब्द मूर्ती- र्ती- दीर्घ ईकारान्त असा स्वीकारलेला आहे. हा शब्द तत्सम शब्द होय. तत्सम शब्द याचा अर्थ संस्कृतातील काहीही बदल न करता मराठी भाषेने स्वीकारलेला शब्द. मात्र संस्कृतातील ऱ्हस्व इकारान्त किंवा ऱ्हस्व उकारान्त असलेले शब्द मराठीत दीर्घ ईकारान्त, दीर्घ ऊकारान्त लिहितात. हा लहानसा फरक असला, तरी त्या शब्दांना तत्सम शब्द म्हटले जाते. उदा. व्यक्ती (सं. व्यक्ति), मती (सं. मति), रीती इ.

महत्त्वाचे म्हणजे हे शब्द जेव्हा समासात पूर्वपदी येतात, तेव्हा ते ऱ्हस्व (संस्कृत शब्दांप्रमाणे) लिहितात. उदा. प्रीति (सं)- मराठी प्रीती- समास (संस्कृताप्रमाणे) प्रीतिविवाह,

मति (सं) मराठी-मती-समास-मतिमंद, ऋतु (सं.) मराठी- ऋतू-समास (संस्कृताप्रमाणे) ऋतुकाल इ.

वरील वाक्यांत मूर्ती हा तत्सम शब्द आहे. संस्कृतात मूर्ति-मराठी मूर्ती- सामासिक शब्द संस्कृताप्रमाणे- मूर्तिरूप, (पति, (सं.) पती- (म)मराठी सामासिक शब्द संस्कृताप्रमाणे- पतिपत्नी.) 'मूर्ती' या शब्दाचे अनेकवचन 'मूर्त्या' होत नाही. मूर्तीचे अनेकवचन मूर्ती होते. फक्त क्रियापद जर मूर्ती या अनेकवचनी शब्दासाठी असेल तर ते अनेकवचनी होते. जसे- 'गणपतीच्या विविध प्रकारच्या मूर्ती होत्या' या वाक्यात विविध प्रकारच्या हे अनेकवचनी रूप (अनेक मूर्तींच्या संदर्भात) होते. जसे - एक प्रकारची मूर्ती - अनेक प्रकारच्या मूर्ती.



या ठिकाणी प्रसिद्ध लेखक **पु.ल.देशपांडे** यांच्या 'एक शून्य मी' या पुस्तकातील 'धर्म, अंधश्रद्धा नि तुम्ही, आम्ही...' या लेखातील ही वाक्ये उद्धृत करावीशी वाटतात.

'*शिल्पकारांचे कौशल्य म्हणून मला मूर्ती पाहायला आवडतात. समजू लागलेल्या वयापासून माझा कोणत्याही मूर्तीला नमस्कार घडलेला नाही.*' असेच काही शब्द वरच्या चौकटीत दिलेले आहेत.

**-यास्मिन शेख**

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# वडिलांचे बुडुख आणि नाचे तुडुक तुडुक

**बुडुख म्हणजे** बुंधा, आधार. एकदा आधार घट्ट असला की पुढे सरणे सोपे जाते. झाडाचा बुंधा चांगला असला की पर्णसंभार चांगला फोफावतो, विस्ताराला अडचण येत नाही, असा या म्हणीचा अर्थ घेता येईल. काही जण फार भाग्यवान असतात. जगण्यासाठी त्यांना भक्कम व्यासपीठ दैवानुसार मिळालेलेच असते. त्याचा त्यांच्या जगण्यासाठी त्यांना चांगला उपयोग होऊ शकतो. वडीलधाऱ्या लोकांच्या मोठेपणाच्या पार्श्वभूमीवर त्यांना यशाचा टप्पा गाठता येऊ शकतो. अर्थात असे व्हायला त्यांच्या अंगीही काही गुण, कर्तृत्व असणे आवश्यक असते. पण तसे सर्वांच्या जवळ असतेच असे नाही ना! वडिलांचे नाव मोठे आणि यांचे मात्र लक्षण खोटे असेही होऊ शकतेच. तेव्हा ही म्हण त्यांना लागू पडेल असे वाटते. उदा. एका अतिशय विद्वान पंडिताची मुलगी मेघना. ती इतक्या विद्वान पंडिताची मुलगी म्हणून तिला सारेच जण खूप मान द्यायचे, तिची प्रशंसा करायचे. पण ती वडिलांच्या कीर्तीवरच जगल्यासारखी होती. वडिलांच्या पुण्याईचा ती फायदा घ्यायची. मग काय लोक बोलायला कमी करतात की काय! लोक म्हणायचेच, ''मेघनाचं बरं आहे म्हणायचं, 'वडिलांचे बुडुख आणि नाचे तुडुक तुडुक!' आयजीच्या जिवावर बायजी उदार! असंच म्हणा की!''



किंवा या म्हणीचा अर्थ असाही होऊ शकतो की काही मंडळींना आयुष्यात वडीलपणाचा अधिकार येनकेन प्रकारेण मिळतो. तो कधी नात्याने येतो, कधी अंगच्या गुणांमुळे येतो, कधी नोकरीमुळे येतो. पण असा वडिलकीचा अधिकार मिळाला की त्या माणसाच्या वागण्याच्या चलनवलनात फरक पडलेला दिसतो. सुलभाताई नगरसेविका म्हणून निवडून आल्या. आणि त्यांच्या हाती अधिकार आले. तेव्हा त्यांच्या मैत्रिणी त्यांच्या मागे कुजबुज लागल्या. 'आता बघून घ्या थाट त्यांचा!' ''वडिलकीचे बुडुख आणि नाचते आहे पहा कशी तुडुक तुडुक! खरा कारभारी तर तिचा नवराच आहे बरं का!''

आपल्याला सांगायचा आहे तो आशय अश नादानुसारी शब्द बांधणीतून सांगितल्यास तो किती परिणाम साधतो, याचे ही म्हण उत्तम उदाहरण आहे असे म्हणता येईल.

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचार आणि अश्रूंची अभिव्यक्ती

**दु:खाची अश्रूंद्वारे** होणारी अभिव्यक्ती विविध वाक्प्रचारांतून विविध प्रकारे टिपलेली दिसते. त्यातून दु:खाच्या स्वरूपाचे वेगळेपण आणि तीव्रता नेमकेपणे लक्षात येते.

'गाई पाण्यावर काय म्हणुनी आल्या? का ग गंगायमुनाही ह्या मिळाल्या?' या बी कवींच्या ओळी प्रसिद्ध आहेत. रडणाऱ्या छोट्या मुलीला विचारलेले हे प्रश्न आहेत. गाई पाण्यावर येणे म्हणजे डोळ्यातून अश्रू येणे, गाल फुगवून रडणे. यात दुसराही वाक्प्रचार आला आहे. त्यात दोन डोळ्यांतून वाहणाऱ्या अश्रूंना गंगायमुना या नद्यांची उपमा दिली आहे. 'गंगायमुना डोळ्यात उभ्या का? जा मुली जा, दिल्या घरी तू सुखी रहा!' सासरी जाणाऱ्या मुलीच्या भावना चित्रित करणाऱ्या या प्रसिद्ध गीतामुळे समाजमनात या वाक्प्रचाराला अढळ स्थान मिळाले आहे.

वयपरत्वे रडण्याचे स्वरूप बदलते. जरा काही मनाजोगे झाले नाही की लहान मुले रडताना मोठा आ वासतात. त्यासाठी 'भोकांड/ भोकाड पसरणे' हा वाक्प्रचार वापरतात. बोक्क (म्हणजे दंतविरहित तोंड) या कन्नड शब्दापासून हा शब्द तयार झाला आहे, असे कृ. पां. कुलकर्णी यांनी 'मराठी व्युत्पत्तिकोश' मध्ये लिहिले आहे.

काही वेळा रडण्याचा मोठा उद्रेक होतो. त्यासाठी



टाहो फोडणे, हंबरडा फोडणे, ओक्साबोक्शी रडणे यांच्या प्रमाणे धाय मोकलणे हाही वाक्प्रचार रूढ आहे. धाय म्हणजे मोठी आरोळी आणि मोकलणे म्हणजे कसलेही बंधन न मानता आकांत करणे. मुक्तेश्वर यांनी द्रौपदी वस्त्रहरण प्रसंगाचे वर्णन करताना लिहिले आहे :

***'सहस्र व्याघ्रांमाजी गाय। सांपडता जेवी बोभाय***
***तेवीं तूंतें मोकलिली धाय। कृष्णा! धांवें म्हणउनी'***

खोटे अश्रू हेही अश्रूंचे रूप असू शकते त्यासाठी भाषेत! 'नक्राश्रू ढाळणे' हा वाक्प्रचार रूढ आहे. नक्र म्हणजे मगर. मगर जेव्हा भक्ष्य खात असते, तेव्हा तिच्या डोळ्यांत अश्रू येतात. त्यामागचे कारण काय असेल ते असो! त्यामुळे खोटा कळवळा येऊन रडणे यासाठी हा वाक्प्रचार वापरतात. हे वाक्प्रचार कधी कधी चित्रदर्शी असतात, कधी सूक्ष्म रीत्या भावनाट्य देखील टिपतात.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# भाषा बदलतेय...



'**आभाळ ढगांनी** भरलेलं पाहून आठवणीनं त्यानं छत्री घेतली.' लेखाचं हे सुरुवातीचं वाक्य वाचताच तुम्ही म्हणाल, की आजच्या भाषासूत्राचंही हवामान बदललं की काय? तर होय. आपण या वाक्यातून भाषेच्या हवामानातल्या बदलांकडेच जाणार आहोत. दुसरं वाक्य- 'आभाळ ढगांनी भरलेले पाहून आठवणीने त्याने छत्री घेतली.' या वाक्यांची तुलना केल्यावर लक्षात येईल, की पहिल्या वाक्यात लं, नं असे शिरोबिंदू देण्याची पद्धत वापरली आहे. डॉ. द. न. गोखले यांनी याला 'दीर्घ अ' म्हटलं आहे. तर दुसऱ्या वाक्यातल्या पद्धतीला त्यांनी 'ए ची भाषा' असं म्हटलं आहे.

कोणतीही भाषा सुलभीकरणाच्या दिशेने प्रवास करत असते. पहिल्या उदाहरणातली शिरोबिंदुयुक्त भाषा सहजसोपी, बोलभाषेशी जवळीक साधणारी असल्याने प्रमाण लेखनामध्ये अशी पद्धत दिवसेंदिवस अधिकाधिक रूढ होत आहे. खरं तर १३ क्रमांकाच्या लेखननियमानुसार 'लेखनात पात्राच्या किंवा वक्त्याच्या तोंडी अशी बोलण्याची भाषा घालावी. अन्य प्रसंगी ही रूपे एकारांत लिहावी' असं सांगितलं आहे. तरीही आज आपण गंभीर प्रवृत्तीचं लेखन असो किंवा ललित, हलकंफुलकं लेखन सगळ्यासाठी अशी भाषा वापरतो. प्रस्तुत लेखाची भाषाही याच प्रकारची आहे. ही पद्धत रूढ झालेली दिसते आहे तर त्याची दखल घेऊन लेखनभाषेच्या या नियमाचा विस्तार करणं आवश्यक आहे. अर्थात हा मुद्दा यापूर्वी अनेक भाषा अभ्यासकांनी मांडला आहेच, पण आता त्याची आत्यंतिक गरज आहे.

शिरोबिंदुयुक्त भाषेच्या लेखनातही त्याने- त्यानं- त्यानी, इकडे- इकडं, इथे- इथं, आतील- आतलं, मधील- मधलं अशा काही शब्दांच्या लेखनाबाबत व्यक्तीगणिक विविधता आढळते. या सर्व लेखनाची नोंद घेऊन त्याविषयीच्या स्पष्टीकरणाचा या नियमाच्या विस्तारात समावेश करायला हवा.

त्याचबरोबर, बदलते आहे- बदलतेय, गेली आहे- गेलीय- गेलेय, बोलतो आहे- बोलतोय अशा प्रकारचे मराठीतले संधिशब्द सध्या लेखनामध्येही मोठ्या प्रमाणावर वापरले जात आहेत. प्रादेशिक बोलींच्या प्रभावाने अजूनही अनेक वेगवेगळे शब्द, क्रियापदं लेखनात येत आहेत. या सर्वांची दखल लेखनाच्या नियमांचा विस्तार करताना घ्यायला हवी.

बोलण्याची भाषा वेगाने बदलते आहेच, पण लेखनाच्या भाषेमध्येही घडणाऱ्या अशा काही बदलांकडे लक्ष द्यायला हवं.

**– वैशाली पेंडसे-कार्लेकर**
vaishali.karlekar1@gmail.com





# अत्तर आणि उदबत्ती

**पार्टी असो** की लग्न, नाटक असो की वाढदिवस; अत्तर (परफ्यूम) आपण सगळेच प्रसंगपरत्वे वापरत असतो. अगदी अत्तर म्हणून नाही, तरी आफ्टर-शेव्ह लोशन आणि शॅम्पूपासून अनेक ठिकाणी अत्तराचा वापर होतच असतो. भेटवस्तू म्हणूनही, प्रेमाचे प्रतीक म्हणूनही. अगदी खाद्यपदार्थांतसुद्धा सुगंधी द्रव्ये वापरतात. हा अत्तर शब्द आला कुठून?

'अत्तर' शब्द 'इत्र' या अरेबिक शब्दापासून आला. अत्तर म्हणजे एक प्रकारचे सुगंधी तेल. मुळात तो फुलांचा अर्क असतो. ही अत्तरे कृत्रिम तशीच नैसर्गिक अशा दोन्ही प्रकारची असतात. २०० किलो गुलाबाच्या पाकळ्यांपासून फक्त एक ग्रॅम नैसर्गिक गुलाबतेल मिळते! म्हणूनच कृत्रिम गुलाबतेलाचा भाव लिटरला सात-आठशे रुपये असतो, तर नैसर्गिक गुलाबतेलाचा भाव सुमारे १८ हजार रुपये!

काही महिन्यांपूर्वी वृत्तपत्रांत एक बातमी आली होती. कनोज येथील एका अत्तर उत्पादकाच्या घरावर आयकर विभागाने छापा घातला आणि तब्बल २५७ कोटी रुपये रोख आणि २३ किलो सोने जप्त केले. कानपूरजवळील कनोज ही भारतातील अत्तरांची राजधानी मानली जाते. जहाँगीर बादशहाने आपली पत्नी नूरजहाँ हिच्यासाठी



इराणमधून तिच्या आवडीचे गुलाब आणले आणि कनोज येथे अत्तर बनवायला सुरुवात केली. पण तरीही तिथे एवढी संपत्ती एखाद्या अत्तर निर्मात्याच्या घरात सापडावी हे थक्क करणारे होते. आसाममध्ये अगर नावाचे एक दुर्मीळ झाड सापडते. त्याच्या खोडाची साल काढतात व त्यापासून उद (oud) नावाचे भारतातील सर्वांत महागडे अत्तर तयार होते. त्याची किंमत एका मिलिलिटरला चार-पाच हजार रुपये असते! देवघरातली अगरबत्ती किंवा उदबत्ती हे शब्द 'अगर' आणि 'उद' याच शब्दांना 'बत्ती' शब्दाची जोड देऊन बनले. चेन्नईमधील मोगऱ्याचे अत्तर आणि बंगलोरमधील चंदनाचे अत्तर प्रसिद्ध आहे. ग्रास हे फ्रान्समधील गाव परफ्यूमची जागतिक राजधानी मानली जाते. अत्तराला देवघरात स्थान आहे तसेच शृंगारातही. म्हणूनच 'अत्तराचा फाया तुम्ही, मला आणा राया' अशा ओळी लिहिल्या गेल्या. स्वागतार्थ गुलाबपाणी शिंपडतात आणि मृतदेहावरही फुले वाहतातच. मानवी स्मृतिकोशात सुगंधाची आठवण सर्वाधिक काळ टिकते.

– भानू काळे
bhanukale@gmail.com





# औपचारिक लेखनात बोली आढळू नये...

**हे वाक्य** वाचा- 'मला हवी होती ती पालेभाजी त्या मंडईत मला भेटली.' आणखी एक मला आलेला अनुभव सांगते. माझ्या परिचयाचा एक मुलगा मला म्हणाला, 'अहो, ऐका ना ! माझ्या बोटातली अंगठी कुठे पडली, हे मला कळेना. घरभर शोधली. अचानक खुर्चीच्या पलीकडे पडलेली दिसली. माझी हरवलेली अंगठी मला भेटली, याचा मला खूप आनंद झाला.' पहिल्या वाक्यात आणि दुसऱ्या वाक्यांतील शेवटच्या वाक्यात 'भेटली' हे क्रियापद वापरले आहे. भेट-भेटणे याचा अर्थ-गाठ पडणे, आलिंगणे, कवटाळणे हा आहे. व्यक्तीची, माणसाची रस्त्यात भेट होते. पालेभाजी, अंगठी इ. ची भेट होत नाही. ही वाक्ये अशी हवीत- '...त्या मंडईत मला ती पालेभाजी मिळाली.' आणि दुसरे वाक्य- '...माझी हरवलेली अंगठी मला मिळाली,(किंवा **सापडली**)'. मिळणे याचा अर्थ हातात येणे, सापडणे, आढळणे, प्राप्त होणे असा आहे. मराठीच्या कोल्हापुरी बोलीत 'मिळणे' या अर्थी 'भेटणे', हा शब्द वापरतात. मराठीच्या लेखनात, विशेषतः औपचारिक लिखाणात आणि आपण बोलतो त्या प्रमाणे भाषेत 'मिळणे' ऐवजी 'भेटणे' हा शब्द योजणे योग्य नाही.

औपचारिक लेखनात 'भाजी भेटली', 'अंगठी भेटली' अशी सदोष वाक्यरचना करू नये. ऐकणाऱ्याला अशा वाक्यांचा अर्थ अंदाजाने कळेलही, पण 'भेटणे' शब्दाचा खरा अर्थ लक्षात घेऊन अशा प्रकारची वाक्यरचना मराठी भाषकांनी टाळावी हे उत्तम. भाषेचे, तिच्यातील शब्दांचे योग्य रूप जपणे आपले कर्तव्य आहे.

आता काही शाब्दिक चुका :

आधी **बरोबर** शब्द - नंतर चूक शब्द/लेखन :

**साहाय्य** - सहाय्य, **साहाय्यक** - सहाय्यक
**निर्भर्त्सना** - निर्भत्सना, **औदासीन्य** - औदासिन्य,
**कळसूत्री** - कळसुत्री,
**प्रथितयश** - प्रतिथयश,
**अनुरूप** - अनुरुप,
**दुर्मीळ** - दुर्मिळ
**नेहमी** - नेहेमी,
**एखादा** - एकादा
**अनिर्णीत** - अनिर्णित,
**तत्काळ** - तात्काळ
**हत्या** - हत्त्या, **गुरुवार** - गुरवार

**- यास्मिन शेख**





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# वेठीच्या घोड्यास तरवडीचा फोक

**वेठ म्हणजे** रोख मजुरी न देता गरिबाकडून काम करून घेणे. किंवा पैसे न देता एखादा जिन्नस सहज उपलब्ध होणे. पूर्वी खोत, पाटील किंवा गावचे कुलकर्णी यांच्याकडे या प्रकारचा अधिकार होता.

वेठीचा घोडा म्हणजे फुकटात, काही किंमत न देता काही कामापुरता आणलेला घोडा. फुकटात मिळालेल्या कोणत्याही गोष्टीचे अपरूप नसते. त्याची खरी किंमत कळत नाही. मग तिचा वापर करताना बेपर्वाई होते. फोक म्हणजे जरा जाडसर आकाराची झाडाची ओली फांदी. 'फुकटात मिळालेल्या वेठीच्या घोड्याला मारण्यासाठी तो तरवडीच्या फोकाने (फांदीने) मारायलाही कमी करत नाही.' कारण फुकट मिळालेल्या वस्तूच्या वापराविषयी जागरूक नसणे, हा मनुष्य स्वभाव आहे, असतो.

तरवड ही माळरानावर सहज आणि विपुल प्रमाणात उपलब्ध असणारी औषधी वनस्पती आहे. ती चटकन विनासायास हाताशी उपलब्ध होते. सहज फुकट मिळालेल्या घोड्याला मारण्यासाठी तशीच सहज उपलब्ध होणारी फांदीच पाहिजे नाही का? एखादी वस्तू स्वतःच्या खिशास जरा तोशीस पडून जर आणली तर तिची जपणूक, देखभाल माणसाकडून आस्थेने केली जाते, एरवी नाही, हा



या म्हणीचा आशय आहे.

आता हेच बघा ना! रमेशला त्याच्या काकांनी एक जमिनीचा तुकडा भेट म्हणून दिला. पण त्याने तिची निगा राखली नाही. कारण ही जमीन त्याला अगदी फुकटात मिळालेली होती. त्याच्या काकांनी मात्र ही जमीन घेण्यासाठी जीवाचा खूप आटापिटा केलेला होता.

जमिनीचा तो अनमोल तुकडा आपल्या पुतण्याच्या हाती त्यांनी विश्वासाने दिला होता. पण त्याने त्याची बूज ठेवली नाही. त्याच्या काकांनी आणि काकूंनी जेव्हा ती जमीन बघितली तेव्हा त्याची काकू चिडून म्हणाली, ''तरी मी म्हणत होते, इतक्या सहजपणे अशी देऊ नका जमीन तुम्ही त्याला. त्याची किंमत त्याला काय कळणार? अहो, 'वेठीच्या घोड्यास तरवडीचा फोक!' हेच खरं असतं.''

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचारांमधील ग्रामीण संदर्भविश्व

**मराठी भाषा** ही शतकानुशतके गावपातळीवरील लोकांच्या तोंडी रुळलेली भाषा आहे. त्यामुळे अनेक वाक्प्रचारांमधून लोकजीवनातील संदर्भविश्व उलगडत जाते.

'रामप्रहर' हा वाक्प्रचार ग्रामीण भागात वापरला जातो. त्याचा बोलीभाषेतील उच्चार 'रामाच्या पारी' असा होतो. रामप्रहर म्हणजे सूर्योदयापासून पहिले तीन तास म्हणजेच प्रातःकालचा प्रहर होय. (दिवस २४ तासांचा म्हणजेच आठ प्रहरांचा असतो.) हा प्रहर पवित्र मानला जातो. जगदीश खेबुडकर यांच्या गीतात या प्रहराचे वर्णन आहे, ते असे : 'उजळून आलं आभाळ रामाच्या पारी, गाव जागवीत आली वासुदेवाची स्वारी'

'ससा भानवसी येणे' हा एक वाक्प्रचार जुन्या काळात प्रचलित होता. भानवसा/ भानोसा म्हणजे चुलीच्या मागचा ओटा. हा ग्रामीण भागात वापरला जाणारा शब्द आहे. ससा चुलीच्या मागे सापडणे म्हणजे भक्ष्य आयते तावडीत सापडणे. या वाक्प्रचारातील अलंकरण लक्ष वेधून घेते. याचा भावार्थ आहे, घरबसल्या प्राप्ती होणे. 'भाऊसाहेबांची बखर' मध्ये हा वाक्प्रचार वापरला आहे.

'वेठीस धरणे' हा वाक्प्रचार शेतमजुरांवर एकेकाळी होणाऱ्या अन्यायाची आठवण करून देतो. वेठ म्हणजे रोख मेहनतान्यावाचून करावे लागणारे काम. त्यातून हा वाक्प्रचार रूढ झाला. त्याचा अर्थ, एखाद्याला आपले काम करण्यासाठी भाग पाडणे. 'आली भेटीला नि धरली वेठीला' ही म्हणही रूढ आहे.



'गेला बाजार' हाही अस्सल ग्रामीण वाक्प्रचार आहे. आठवड्याचा बाजार भरणे, ही खेड्यातील पद्धत असते. अशा बाजारात, बाजार उठायची वेळ झाल्यावर येणाऱ्या मालाला कमी भाव मिळतो. त्यामुळे 'गेला बाजार (तरी)' याचा अर्थ 'कमीत कमी' असा रूढ झाला आहे.

उखळ आणि मुसळ ही धान्य कांडण्याची साधने असतात. धान्य कुटल्यानंतर उखळ पांढरे होते. त्यामुळे 'उखळ पांढरे होणे' या वाक्प्रचाराचा अर्थ आहे, समृद्धी येणे. हा वाक्प्रचार निंदाव्यंजक रूपात वापरला जातो. उदा. शेतकऱ्यांना मिळालेल्या सवलती लाटून स्वतःचे उखळ पांढरे करून घेणारेही काही जण असतात. एकंदरीत ग्रामीण जीवनव्यवहार असा वाक्प्रचारांमध्ये गोंदला गेला आहे.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com

लोकसत्ता Wed, 15 June 2022
https://epaper.loksatta.com/c/68626997

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# भौतिक विज्ञानाची परिभाषा

**प्रसिद्ध शास्त्रज्ञ** एडिसन यांनी स्वतःच्या कर्मशाळेत व प्रयोगशाळेत निरनिराळे शोध लावण्याचे काम ५० वर्षांहून अधिक काळ अविरतपणे केले. एप्रिल १९२८ पर्यंत त्यांनी १,०३३ स्वामित्वहक्क (पेटंट्स) मिळविले. दिवा तयार करण्यासाठी त्यांनी केलेले अनेक प्रयोग निष्फळही झाले असे म्हणतात. एडिसन यांचा सर्वपरिचित व महत्त्वाचा शोध ध्वनिलेखयंत्र (फोनोग्राफचा) होय. या फोनोग्राफलाच नंतर ग्रामोफोन म्हटले जाऊ लागले. नव्या पिढीला भौतिकशास्त्रातील काही शब्द/संकल्पना मराठीतून समजून देण्याचा या लेखाचा मानस आहे. पदार्थांच्या अवस्था म्हणजे स्टेट ऑफ मॅटर, गती म्हणजे मोशन, वेग म्हणजे वेलॉसिटी, बल म्हणजे फोर्स, त्वरण म्हणजे एक्सिलरेशन, घर्षण म्हणजे फ्रिक्शन, वस्तुमान म्हणजे मास, वजन म्हणजे वेट, ग्रॅव्हिटेशन म्हणजे गुरुत्वाकर्षण, प्रेशर म्हणजे दाब, कॅपॅसिटी म्हणजे धारणक्षमता, व्हॉल्युम म्हणजे आकारमान!

थॉमस युंग याने ऊर्जा ही संकल्पना १८०० साली सर्वप्रथम विशद केली. ऊर्जागतिशास्त्राची (थर्मोडायनॅमिक्स) मांडणीही त्याचीच. आता ऊर्जा आणि ऊर्जेचे प्रकार पाहू - मेकॅनिकल एनर्जी म्हणजे यांत्रिक ऊर्जा, पोटेन्शिअल एनर्जी म्हणजे स्थितिज ऊर्जा, कायनेटिक एनर्जी म्हणजे गतिज ऊर्जा, साऊंड एनर्जी म्हणजे ध्वनि ऊर्जा, लाइट एनर्जी म्हणजे प्रकाश ऊर्जा, केमिकल एनर्जी - रासायनिक ऊर्जा, थर्मल एनर्जी - औष्णिक ऊर्जा, विंड एनर्जी - पवन ऊर्जा, इलेक्ट्रिक एनर्जी - विद्युत ऊर्जा, ॲटॉमिक एनर्जी -अणु ऊर्जा. विल्यम थॉम्सन (याला केल्व्हिन म्हणूनही ओळखले जाते) या ब्रिटिश शास्त्रज्ञाने १८४८ साली तापमानाची संकल्पना मांडली. टेंपरेचर म्हणजे तापमान. प्रोपगेशन म्हणजे प्रसारण, रिफ्लेक्शन म्हणजे परावर्तन, रिफ्रॅक्शन म्हणजे अपवर्तन, डिस्पर्शन म्हणजे अपस्करण, ट्रान्समिशन म्हणजे पारेषण. बहुतेकदा हे सर्व शब्द प्रकाशाच्या बाबतीत वापरले जातात. सेल हा शब्द मोठा मजेशीर आहे भौतिकशास्त्रात तो विद्युत घट होतो, जीवशास्त्रात सेल म्हणजे पेशी होते. सेलफोन म्हटला की तो चलभाष होतो आणि सेल लागलाय असं म्हटलं की मागचापुढचा विचार न करता दुकानांमध्ये गर्दी होते. शब्द ज्या संदर्भात वापरले जातात तेव्हाच त्यांची अर्थ निश्चिती होते. इलेक्ट्रिकल सर्किटला 'विद्युत परिपथ' म्हणतात. ओपन सर्किटला 'खुला परिपथ' म्हणतात. पण शॉर्ट सर्किटला काय म्हणावे? वीज-विस्कलन, विद्युतप्रवाहातला व्यत्यय/विरूपन/विचलन? तुम्ही काय पर्याय सुचवाल?

– डॉ. निधी पटवर्धन
nidheepatwardhan@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# देश-विदेशातील न्याहारी

**सकाळी 'ब्रेकफास्ट'** करूनच आपण कामासाठी बाहेर पडतो. यात इंग्रजी शब्दाची व्युत्पत्ती स्वयंस्पष्ट आहे; रात्रीच्या जेवणानंतरचा सुमारे १२ तासांचा 'फास्ट', म्हणजे उपास सोडणे म्हणजे 'ब्रेकफास्ट'. आपल्याकडे एकेकाळी याला 'फराळ' म्हणायचे. 'फल' आणि 'आहार' या संस्कृत शब्दांपासून बनलेला तो शब्द. 'नाश्ता' किंवा 'न्याहारी' हे अलीकडे वापरले जाणारे प्रतिशब्द. पण आपल्याला वाटते तसे ते अस्सल देशी नसून फारसीमधील 'नाश्तह्' आणि 'नहारी' या शब्दांपासून आलेले आहेत. हा सकाळचा आहार तसा माफकच असावा, अन्यथा सुस्ती येऊन कामात लक्ष लागणार नाही. पण हल्ली अनेकदा, विशेषतः प्रवासासाठी गेल्यावर, लोक अंमळ जास्तच न्याहारी करतात. अर्थात याचे कारण उघड आहे; न्याहारीचा खर्च हा हॉटेलच्या भाड्यातच पकडलेला असतो!

अशावेळी ब्रेड हमखास खाल्ला जातो. ब्रेडला पाव म्हटले तरी त्यामुळे तो देशी शब्द ठरत नाही, कारण पाव हा शब्ददेखील पोर्तुगीज आहे! त्याला लावतो तेही बटरच म्हणायचे. लोणी शब्द तिथे वापरला जात नाही, कारण लोणी म्हटल्यावर ताक घुसळून काढलेले घरचे पांढरेशुभ्र लोणी डोळ्यांपुढे उभे राहते. आपण गरमागरम भाकरीवर थापतो ते. आणि या ब्रेड-बटरबरोबर बहुतेकदा खाल्ला जाणारा एक पदार्थ म्हणजे आमलेट.



आमलेट किंवा ऑमलेट (Omelette) या मूळ फ्रेंच शब्दाची व्युत्पत्ती मजेदार आहे. 'क्वीझिन बुर्जवाझि' (Cuisine Bourgeoisie, उच्चभ्रू स्वयंपाक) नावाच्या ४०० वर्षांपूर्वी प्रकाशित झालेल्या एका फ्रेंच पुस्तकात हा शब्द आढळतो. नेपोलियन आणि ऑमलेटच्या संदर्भात एक आख्यायिका प्रचलित आहे. फ्रान्समधील बेसिएर (Bessieres) नावाच्या छोट्या गावातून प्रवास करत असताना एका खानावळीत त्याला ऑमलेट प्रथमच खायला मिळाले. त्याला ते इतके आवडले, की गावातील सगळी अंडी गोळा करून सगळ्या सैनिकांना त्याचे ऑमलेट खिलवावे असा त्याने हुकूम सोडला! घटना खरी असो की दंतकथा, पण तिच्या स्मरणार्थ आजही त्या दिवशी गावातील सगळे गावकरी एक भले-मोठे ऑमलेट करून एकत्र खातात! फ्रेंच स्वयंपाक अधिक नजाकतदार मानतात. म्हणून इंग्रजी शब्द काहीही असला तरी त्याचे खाद्यरूप खूपदा फ्रेंच असते. उदाहरणार्थ, इंग्रजीतील काऊ (गाय), पिग (डुक्कर) किंवा लॅम्ब (मेंढी) या शब्दांचे रूपांतर जेवताना बीफ, पोर्क आणि मटन या फ्रेंच शब्दांत होते!

– भानू काळे
bhanukale@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# कुठले कपडे घालावे, काय नेसावे?

**'त्या लग्नसमारंभाला** जाण्यासाठी माझी बहीण तयार झाली. तिने सुंदर साडी घातली होती. माझी आई नऊवारी साडी घालून आमच्याबरोबर येण्यासाठी आधीच तयार झाली होती.' वरील वाक्यांत 'घातली', 'घालून' या शब्दांची योजना चुकीची आहे. एखादे शिवलेले वा विणलेले वस्त्र आपण जेव्हा अंगावर चढवतो, तेव्हा 'घालणे' या क्रियापदाची रूपे वाक्यांत योजतात. जसे, तो सदरा घालतो, तिने परकर-पोलका (किंवा के) घातला (घातले.), मी पायजमा घालेन. बाबांनी कोट घातला, माझ्या मुलाने मी विणलेला स्वेटर घालून पाहिला. इ. मात्र साडी, लुगडे, धोतर यांच्या संदर्भात 'नेसणे' या क्रियापदाची रूपेच वाक्यात योजणे आवश्यक आहे. वस्त्र कमरेपासून खाली निऱ्या करून विशिष्ट पद्धतीने शरीराभोवती गुंडाळणे, यासाठी 'नेसणे' या शब्दाची रूपे योग्य आहेत. 'घालणे' याचा अर्थ- (आत ठेवणे, ओतणे) परिधान करणे, अंगावर चढविणे, धारण करणे असा आहे. (कंसात दिलेले अर्थ शिवलेल्या वस्त्राच्या संदर्भात नाहीत.) घालणे, नेसणे या शब्दांचे वेगळे अर्थ लक्षात घेऊन वरील वाक्यांतील सदोष शब्दयोजना दूर करता येईल. ही वाक्ये अशी हवीत- 'तिने सुंदर साडी नेसली होती. माझी आई नऊवारी साडी (लुगडे) नेसून आमच्याबरोबर येण्यासाठी आधीच तयार झाली होती.'

आता काही तत्सम शब्द आणि त्यांची सामासिक शब्दांतील रूपे पाहू या. तत्पूर्वी तत्सम (तत् सम) शब्द म्हणजे काय हे स्पष्ट करते. मराठी भाषेत अनेक संस्कृत शब्द आले आहेत. संस्कृतातून जे शब्द जसेच्या तसे, काहीही बदल न करता मराठीने स्वीकारले आहेत त्यांना तत्सम शब्द म्हणतात.

आपण आज **अ**कारान्त व **आ**कारान्त शब्द व सामासिक शब्दांत **पूर्वपदी** आलेले (समासात दोन वा तीन शब्द एकत्र येऊन त्यांचा एक शब्द होतो. त्याला समास-सामासिक शब्द म्हणतात) शब्द पाहू. (अ) **अकारान्त तत्सम शब्द** आणि त्यांची सामासिक शब्दांतील रूपे- *गृह, मेघ, जल, ग्राम, उदय, आदर्श, विद्यालय* इ. हे शब्द समासांत पूर्वपदी (आधी) आल्यास त्यांची रूपे- **अकारान्त**- *गृहप्रवेश, जलप्रवाह, मेघश्याम* इ. अशी राहातात.

(आ) *ऊर्जा, प्रजा, सभा, प्रभा, कन्या, क्रीडा, क्षमा, दक्षिणा, मुद्रा, कल्पना* इ. **आकारान्त** शब्द समासांत पूर्वपदी (आधी) आल्यास त्यांची रूपे **आकारान्त**- *प्रजापती, सभागृह, कन्यारत्न, कल्पनाविलास* इ. राहाता.

थोडक्यात, सामासिक शब्दांत पूर्वपदी आलेले अकारान्त व आकारान्त तत्सम शब्द जसेच्या तसेच राहतात. पुढील लेखात इकारान्त व उकारान्त तत्सम शब्दांसंबधी लिहिणार आहे.

**-यास्मिन शेख**





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# शिजलं, भिजलं, वाया गेलं... बेलनं फिरून कामा आलं !

**'बेलनं' हा** शब्द सध्या फार वापरला जात नाही, विस्मृतीत गेल्यासारखा झाला आहे. त्या ऐवजी आपण 'लाटणं' हा शब्द वापरतो. पण असे असले तरी कोणी कोणी 'बेलनं' हा शब्द अजूनही वापरतात. हे 'बेलनं' म्हणजेच 'लाटणं' ही स्वयंपाकघरातली एक अत्यावश्यक वस्तू असते. लाटणं जर सापडत नसेल तर जेवणाचा चक्क खोळंबा होतो. अर्थात या लाटण्याचा स्वयंपाक करण्यापासून ते अगदी मनातला राग व्यक्त करण्यापर्यंत अनेक प्रकारे उपयोग होऊ शकतो.

यमुनाबाई हे घरातलं एक अजब प्रकरण होतं. त्याचा अनुभव सगळ्या घरादाराला होताच. त्या जरा वेंधळ्या होत्या. विसराळूदेखील होत्या. तर व्हायचं काय, की त्यांच्या या खास स्वभाववैशिष्ट्यांमुळे त्यांच्या हातून घोडचुका होत असत. म्हणजे कधीकधी घराला पुरेल इतका स्वयंपाक तयार नाही, ही गोष्ट त्यांच्या अगदी आयत्यावेळी लक्षात येई. तर कधीकधी पुरेसा स्वयंपाक खरे तर फ्रीजमध्ये तयार आहे, हेच त्या विसरून जात असत. कधीकधी त्यांच्या हातातून भांडी निसटत असत, मग पदार्थांची सांडलवंड होई. मग पुनःश्च स्वयंपाक करण्यापासून तयारी करावी लागे. कधीकधी पोळ्याच अपुऱ्या पडत असत, मग पुन्हा लाटणं म्हणजे 'बेलनं' हातात घ्यावं लागे. अशा वेळी इतरांना रागाने ते लाटणे त्यांच्यावरच उगारण्याची तीव्र इच्छा न झाली तरच नवल !

ही झाली घरातली गोष्ट. पण एखाद्या उद्योजकाचा असा वेंधळा, विसराळू, अव्यवस्थित, गोंधळा स्वभाव असेल तर त्याच्या उद्योगात, कार्यपद्धतीत काय काय घोटाळे होतील याची जरा कल्पना करून बघा. मग त्या उद्योगात ब्रह्मघोटाळे होण्याचेच प्रसंग अधिक येतील. हिशेब नीट ठेवले जाणार नसतील, कोणाकडून उधारी, उसनवारी घेतली, याची नोंद अस्ताव्यस्तपणे ठेवलेली असेल, मीटिंग्सच्या नोंदी नीट ठेवल्या नसतील, पगारांचे हिशेब नीट ठेवण्यात आले नसतील तर सर्वच उद्योग वठणीवर आणण्यासाठी 'शिजलं, भिजलं, वाया गेलं...'असं म्हणत 'बेलनं' फिरून एकदा हाती घ्यावं लागेल.



– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com.

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# कोड्यात टाकणारे वाक्प्रचार



**भाषेमध्ये वाक्प्रचार** तयार होण्याची प्रक्रिया एकसारखी नसते. त्या प्रक्रियेत अनेक घटक कार्यरत असतात. त्यामुळे काही वाक्प्रचार आपल्याला कोड्यात टाकतात.

या संदर्भातील चपखल उदाहरण म्हणजे 'ससेमिरा लागणे' हा वाक्प्रचार होय. ससा आणि मिरे यांच्याशी त्याचा काही संबंध नाही. शब्दाची निर्मिती ही त्यातील अर्थपूर्ण गुंफणीतून होत असते, मात्र ससेमिरा हा शब्द त्याला अपवाद आहे. एका गोष्टीत हा शब्द एका अस्वलाने सांगितला आहे, त्यामुळे त्याला अर्थ असण्याची अपेक्षा करता येत नाही. या वाक्प्रचाराच्या घडणीमागील रहस्य मला ज्येष्ठ कवयित्री शांता शेळके यांच्याकडून कळले. ससेमिरा या शब्दामागे एक गोष्ट आहे. 'सिंहासनबत्तिशी' या ग्रंथात ती गोष्ट आहे. ती अशी : एक राजपुत्र आणि अस्वल यांची मैत्री असते. मात्र राजपुत्र एकदा अस्वलाला फसवतो. तेव्हा अस्वल त्याला शाप देते, की ससेमिरा या शब्दाचे तुला वेड लागेल. जेव्हा या शब्दातील प्रत्येक अक्षराने सुरू होणारे चार श्लोक तुला कोणी ऐकवील, तेव्हा तुझी त्या शापातून सुटका होईल! याचा भावार्थ असा, की माणसाच्या अंतर्मनाला-सदसद्विवेकबुद्धीला आपल्या वागण्याची जाणीव असते. त्यामुळे वाईट वागल्यावर त्याची बोच मनाला अस्वस्थ करत राहते.

हा वाक्प्रचार 'एखाद्या गोष्टीचा सतत त्रास होणे' या अर्थाने रूढ आहे. उदा. स्वातंत्र्यलढ्यात सहभागी झालेल्या देशप्रेमी मंडळींमागे पोलिसांचा ससेमिरा लागलेला असे.

'तुझ्यासारखे छप्पन्न पाहिलेत!' हे वाक्यही आपल्याला कोड्यात टाकते. एखाद्याला कमी लेखण्यासाठी हा वाक्प्रचार वापरतात. छप्पन्न या संख्येमागील नेमका संदर्भ काय, असा प्रश्न येथे पडतो. छप्पन्न म्हणजे पुष्कळ असा आपण मोघम अर्थ घेतो. प्रत्यक्षात त्या शब्दाचे मूळ रूप लक्षात आले की अर्थ उलगडतो. छप्पन्न हे मूळ 'षट्प्रज्ञ' या शब्दाचे बदललेले रूप आहे. षट्प्रज्ञ म्हणजे धर्म, अर्थ, काम, मोक्ष, व्यवहार आणि तत्त्वज्ञान या सहा गोष्टी जाणणारा! इतका आशयसंपन्न शब्द उपहासव्यंजक रूपात वाक्प्रचारात रूढ का झाला, हे कोडे उरतेच!

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# भाषेचं ‘सामान्य’रूप

**भाषेत बदल** होताना, तिचा विस्तार होताना नवीन शब्दांची भर पडते. या नवीन शब्दांना विशेषतः सध्या इंग्रजीतून मराठीत येऊन रूढ होऊ पाहणाऱ्या शब्दांना आपल्या भाषेची ढब यावी यासाठी त्यांचं लिंग, वचन, सामान्यरूप अशा व्याकरणिक तपशिलाबाबत काही धोरण ठरवावं लागतं आणि त्यानुसार तो शब्द आपल्या भाषेत बसवून घ्यावा लागतो. उदा. टेबल- ते टेबल, अनेक टेबले/टेबलं, टेबला-वर. पण बरेचदा हे शब्द आधी रूढ होतात आणि नंतर अधिकृतपणे भाषेत समाविष्ट होतात किंवा होतही नाहीत. दरम्यान, प्रत्येक जण आपल्यापरीने त्या शब्दाचं लिंग, अनेकवचनी रूप, सामान्यरूप ठरवून मोकळा होतो आणि बरेचदा तो शब्द वेगवेगळ्या पद्धतीने वापरला जातो.

सामान्यरूपाबाबत विचार केला, तर सामान्यरूप हे मराठी भाषेचं खास वैशिष्ट्य आहे. विभक्ती प्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय जोडताना मूळ रूपात होणारा बदल म्हणजे सामान्यरूप. उदा. घोड्या-वर, उंदरा-ला. पूर्वी मराठीने जे परकीय शब्द स्वीकारले, त्यांची मराठीच्या पद्धतीप्रमाणे सामान्यरूपं झालेली दिसतात. उदा. दुकाना-त, कार्डा-वर, कपा-त. पण गेल्या काही काळात मराठी भाषकांच्या तोंडी नव्याने रुळलेल्या इंग्रजी शब्दांचं सामान्यरूप झालेलं दिसत नाही. उदा.



फोन-ला, फ्रीज-ला, ब्रश-ला खरंतर हे शब्द मराठी वळणानुसार फोनाला, फ्रिजाला, ब्रशाला असे वापरायला हवे. पण या बाबतीत ते परकेच राहिलेले दिसतात. या शब्दांना ‘त’ हा विभक्ती प्रत्यय लावून बघा बरं. सामान्यरूप केल्याशिवाय ‘त’ लावताच येणार नाही.

एकूणच आजच्या भाषेत विशेषतः नवीन पिढीच्या बोलभाषेत आधी रूढ झालेली सामान्यरूपंही टाळण्याची प्रवृत्ती दिसत आहे, असं माझं निरीक्षण आहे. उदा. बँकमध्ये, कपमध्ये, डॉक्टरला असे शब्द आढळतात.

‘एकारांत नामांचे सामान्यरूप याकारांत करावे. एकारांत करू नये.’ या १२ क्र. च्या लेखननियमाचा परभाषिक शब्दांशी संबंध नसला, तरी हा नियम पाळणाऱ्यांची संख्या घटत आहे. उदा. फडक्यांना/फडकेंना अशी दोन्ही रूपं प्रचारात दिसतात. या नियमात बदल करण्याची मागणी अनेक अभ्यासकांनी पूर्वीच केली आहे आणि ती आता अधिक गरजेची वाटते. परभाषेल्या शब्दांच्या लिंग आणि वचनाबद्दल वाचू पुढच्या लेखात.

– वैशाली पेंडसे-कार्लेकर
vaishali. karlekar1 @gmail. com

लोकसत्ता Thu, 23 June 2022
https://epaper.loksatta.com/c/68773163

भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# बऱ्याच लटपटींची 'सर्कस'

**सर्कस हा** मराठीसह बहुतेक भाषांत वापरला जाणारा शब्द. त्यासाठी प्रतिशब्द माझ्यातरी ऐकिवात नाही. करमणुकीचा हा एक आद्य आणि सर्वाधिक लोकप्रिय प्रकार. 'द सर्कस मॅक्झिमम' ही रोममधील सर्वांत जुनी सर्कस. सुमारे दीड लाख लोक ती एकावेळी पाहू शकत.

या शब्दाची व्युत्पत्ती मोठी रोचक आहे. 'सर्कल' म्हणजे वर्तुळ या लॅटिन शब्दापासून 'सर्कस' हा शब्द आला. कारण जिथे सर्कस दाखवली जाते ती जागा वर्तुळाकार असते. कलाकारांचा संच आणि त्यांचे सादरीकरण या दोन्हीसाठी सर्कस हा एकच शब्द वापरला जातो. बऱ्याच लटपटी करून एखादे काम पूर्ण केले जाते तेव्हा त्यालाही 'सर्कस' म्हटले जाते.

फिलिप ॲस्टली हे इंग्रज गृहस्थ आधुनिक सर्कशीचे पितामह मानले जातात. त्यांनी १७७० मध्ये लंडन येथे सर्कशीचे प्रयोग सुरू केले आणि तेव्हापासून हा प्रकार जगभर गेला. 'द ग्रेटेस्ट शो ऑन अर्थ' हा एका अमेरिकन सर्कशीवरचा चित्रपट खूप गाजला होता.

सर्कशीत काय नसते! वाघ, सिंह, हत्ती, घोडे, अस्वल, झेब्रा अशा विविध प्राण्यांच्या त्या प्रचंड तंबूत होणाऱ्या कसरती, बँडच्या तालावर त्यांच्याकडून खेळ करून घेणारा तो रुबाबदार रिंगमास्टर, त्याच्या हातातील सपकन वाजणारी ती छडी, जादूचे प्रयोग, सगळ्यांना हसवणारा



विदूषक, तो मृत्युगोल आणि त्यातून भरधाव फेऱ्या मारणारे मोटरसायकल स्वार किंवा ट्रॅपिझ, म्हणजे उंचावर लटकणाऱ्या दोऱ्यांवरील कसरती, ज्या आम्ही लहानपणी जीव मुठीत धरून बघायचो. 'वाघसिंह माझे सखेसोबती' हे सर्कसवीर दामू धोत्रे यांचे आत्मकथन प्रसिद्ध आहे.

सर्कसचे महत्त्व व्लादिमिर लेनिनने जाणले होते. रशियन क्रांतीनंतर त्याने या लोककलेला बॅले किंवा ऑपेरा या उच्चभ्रू कलांच्या तोडीचे स्थान दिले; रशियाचा एक मानबिंदू बनवले. रशियात सर्कशीतील प्राण्यांवर बंदी नाही. आजही मॉस्कोमध्ये सर्कशीचे दोन खेळ रोज होतात. 'मेरा नाम जोकर' चित्रपटातून राज कपूरने रशियन सर्कस भारतीय प्रेक्षकांपर्यंत पोहोचवली. शाहरुख खाननेही पूर्वी ('दूरदर्शन'च्या सुवर्णकाळात) 'सर्कस' ही चित्रवाणी मालिका गाजवली होती.

सर्कशीत पडदा पडणे हा प्रकार नाही; त्यामुळे दोन खेळांमधील आवराआवर अगदी झपाट्याने होते. शिवाय एकच माणूस वेगवेगळी कामे करत असतो. 'मराठी मासिक म्हणजे एका माणसाने चालवलेली सर्कस' हे वर्णन किती सार्थ आहे हेही पुढे अनुभवाने समजले!

– भानू काळे
bhanukale@gmail.com

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# षष्ठ्यब्दि नव्हे, षष्ट्यब्दी...

'**माझ्या बाबांनी** वयाची साठ वर्षं पूर्ण केली आहेत. त्यांचा षष्ठ्यब्दिपूर्तीचा समारंभ आम्ही उद्या करणार आहोत. तुम्ही सर्वांनी या समारंभाला अवश्य यायचं बरं का.'

या वाक्यांपैकी दुसऱ्याच वाक्यात एका चुकीच्या शब्दाची योजना केली आहे. तो शब्द आहे- षष्ठ्यब्दिपूर्ती. या शब्दाची फोड करून पाहू या आणि त्याचा अर्थही जाणून घेऊ या. हा शब्द संस्कृतातून स्वीकारलेला तत्सम शब्द आहे. हा सामासिक शब्द आहे. हे वाचकांच्या लक्षात आले असेल. याची फोड- षष्ठी अब्दी पूर्ती पहिला शब्द षष्ठी या शब्दाचा अर्थ आहे सहा (६). या शब्दाचे स्त्रीलिंगी रूप आहे षष्ठी. अर्थ-सहावी, पंधरवड्यातील सहावी तिथी, षष्ठी (सहावी) विभक्ती (प्रथमा, द्वितीया...षष्ठी) विभक्ती म्हणजे नामाला, सर्वनामाला लागणारे प्रत्यय. षष्ठी विभक्तीचे प्रत्यय एकवचन- चा, ची, चे अनेकवचन चे, च्या, ची (चे- एकवचन, ची- अनेकवचन) षष्ठी+अब्द =षष्ठ्यब्द. अब्द म्हणजे वर्ष. षष्ठ्यब्द = सहा वर्षे पुढचा (येथे शेवटचा) शब्द आहे. पूर्ती (संस्कृत शब्द पूर्ति, मराठीत तो शब्दात शेवटी आल्यास दीर्घ लिहितात,



जसे, पूर्ति (संस्कृत) पूर्ती- मराठी, अर्थ : पूर्णता. पूर्त (संस्कृत विशेषण) अर्थ : पूर्ण.) आता वरील वाक्यातील **षष्ठ्यब्दिपूर्ती**चा अर्थ पाहूया. अर्थ = सहा वर्षांची पूर्णता. आणखी एक चूक ब्दि या ऱ्हस्व अक्षराची. अब्दी हे दीर्घान्त अक्षर बरोबर आहे, कारण अब्द शब्दाचे स्त्रीलिंगी रूप अब्दी आहे. पूर्ती-पूर्तता या स्त्रीलिंगी नामाचे ते विशेषण आहे.

वरील वाक्याचा अर्थ काय होईल? 'बाबांच्या वयाची सहा वर्षे पूर्ण (वर्षांची पूर्णता)! म्हणजे षष्ठ्यब्दी' हा शब्दच चुकीचा आहे,

आता योग्य शब्दयोजना अशी आहे- **षष्ट्य**ब्दीपूर्ती. **षष्ट** म्हणजे साठ (६०), षष्टी + अब्दी = षष्ट्यब्दी + पूर्ती = षष्ट्यब्दीपूर्ती. अर्थ आहे- (माणसाच्या) वयाला ६० वर्षे पूर्ण झाली. त्यानिमित्ताने होणारा समारंभ - षष्ट्यब्दीपूर्तीचा समारंभ.

असाच आणखी एक शब्द रूढ आहे- जन्मशताब्दी- जन्मशताब्दीपूर्ती (समारंभ)

**- यास्मिन शेख**

लोकसत्ता Mon, 27 June 2022
https://epaper.loksatta.com/c/68845554



**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# शिवार पंडित, झोपतो खिंडीत...



**एक होते** खेडेगाव. त्या गावात भली-बुरी, अज्ञानी-सज्ञानी, बावळट-चतुर, भित्री-धीट अनेक प्रकारची माणसे राहत होती. त्यातच होता एक 'शिवार पंडित'.

'शिवार पंडित' ही त्याला मिळालेली, गावच्या लोकांनी त्याला बहाल केलेली एक पदवीच म्हणा ना! कारण काही लोक स्वतःला खूपच विद्वान समजतात ते त्यांचे समजणे स्वयंघोषितच असते. ते सगळ्यांना आपल्या अर्धवट असलेल्या ज्ञानाच्या आधारे सल्ले देत सुटतात. या शिवार पंडिताची मजा म्हणजे घरात झोपले तर घराचे छप्पर कोसळून आपला मृत्यू ओढवेल, असे समजून तो गावाच्या खिंडीत झोपत असे... असे त्याचे अगाध ज्ञान!

गावाच्या लोकांनाही काय म्हणावे? अशा अर्धवट विद्वानावर, त्याच्या ज्ञानावर विश्वास ठेवून त्याचे सल्ले मागायला ते जात असत. अशाच विश्वासावर विसंबून गावातला एक माणूस पुत्रप्राप्तीसाठी त्यांचा सल्ला मागायला गेला. पुत्रप्राप्ती वगैरे काही नाही पण गाठीची बरीच संपत्ती मात्र त्याला गंगार्पण करावी लागली. त्यावरून गावात एक म्हण मात्र पडली. 'शिवार पंडित आणि झोपतो खिंडीत.'

अगदी आजच्या काळातही अशी ढिसाळ पंडितगिरी करणारे आहेतच की! जरा आजूबाजूला नजर टाका, असे पांडित्य दाखवणारे अनेक दिसतील.

एक बाई आपले वजन घटावे म्हणून अशाच एका 'शिवार पंडिता'चा सल्ला मागायला गेली. त्याने तिला आपल्या अर्धवट ज्ञानाने दिपवून टाकले आणि अनेक सल्ले दिले. तिचे वजन तर अजिबात घटले नाहीच पण आम्लपित्त, उच्च रक्तदाबासारख्या आधी नसलेल्या व्याधींची ती शिकार झाली.

शेवटी तिचा नवरा त्या विद्वानावर खूपच रागावला आणि म्हणाला, ''अहो विद्वान! बस झाला तुमचा सल्ला, माझ्या पत्नीला तुमच्या ज्ञानाचा काहीच फायदा झाला नाही. पण आमच्या ज्ञानात मात्र चांगली भर पडली, की लोकांनी तुमच्यासारख्या शिवार पंडितांच्या वाऱ्यालाही उभे राहू नये. तुम्ही म्हणजे 'शिवार पंडित आणि राहतो खिंडीत' याचा जातिवंत नमुनाच आहात.''

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# घोड्याची पेंड आणि ताकाची तूर...

**कधीकधी वाक्प्रचारातील** अर्थाची नेमकी उकल पटकन होत नाही. तेव्हा असे वाक्प्रचार कोड्यात टाकणारे वाटू लागतात. 'तुझ्या पीएच.डी.चं घोडं कुठे पेंड खातंय?' असा प्रश्न कधीतरी आपण ऐकलेला असतो. घोडे पेंड खाणे म्हणजे काम रखडणे/ रेंगाळणे, हा त्याचा सूचितार्थही माहीत असतो, तरी समाधान होत नाही! मग संशोधन केल्यावर कळते की मूळ शब्द 'पेण' (पेंड नव्हे!) असा आहे. मौखिक रूपात असलेले वाक्प्रचार कालौघात रूप बदलतात. उच्चार बदलला की अर्थाची वाट निसरडी होते! त्याचे हे एक उदाहरण आहे. पेण किंवा पेणे म्हणजे लांबच्या प्रवासात लागणारे विश्रांतीचे ठिकाण (टप्पा) होय. तेथे आले की घोडे थांबतात, दम खातात म्हणजेच पेण खातात!

केवळ शब्द वाचल्यावर अर्थ न उलगडल्यामुळे पेचात टाकणारा आणखी एक वाक्प्रचार म्हणजे 'ताकास तूर न लागू देणे', हा होय. याचा अर्थ आहे, मुळीच पत्ता लागू न देणे. गंमत म्हणजे हा वाक्प्रचार आपल्या अर्थाचा पत्ताच लागू देत नाही! कारण आपल्या ओळखीच्या असलेल्या ताक आणि तूर (तूरडाळ) या खाद्यपदार्थांशी यातील शब्दांचा



संबंध नाही. यातील शब्दांना संदर्भ आहेत, ते विणकर/ कोष्टी यांच्या व्यवसायाशी निगडित! (वेगवेगळ्या व्यवसायांतील शब्दसंपत्तीमुळे वाक्प्रचार संपन्न झाले आहेत, ते आपण यापूर्वी एका लेखात पाहिले आहेच!) 'महाराष्ट्र शब्दकोश' (संपादक दाते, कर्वे) मध्ये यातील शब्दांचा अर्थ सापडतो. ताका किंवा तागा म्हणजे हातमागावरचे अखंड कापड आणि तूर म्हणजे कोष्ट्याची दांडी. या दांडीभोवती विणलेले वस्त्र गुंडाळले जात असते. ताका आणि तूर यांचा वास्तविक सतत संबंध जुळायला हवा! पण तसे न होणे म्हणजे, ताकास तूर लागू न देणे. लक्षणेने याचा अर्थ आहे, थांगपत्ता लागू न देणे, दाद न देणे!

वाक्प्रचार जेव्हा असे उखाणे घातल्यासारखे वागतात, तेव्हा ते केवळ अलंकार नसून बौद्धिक आनंदाचे स्रोतही आहेत, याची खात्री पटू लागते!

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# अनोळखी शब्दांशी ओळख

**जशी आपल्याला** नवी नवी माणसे भेटतात तसे काही काही शब्द नव्याने कानावर येतात, त्याचा अर्थ किती काळ माहीत नसतो आणि अकस्मात कधीतरी तो गवसतो असेही घडते.

रत्नागिरी जिल्ह्यातील खाडीपट्ट्यात फिरताना असे काही शब्द गवसले की जे पूर्वी कधी ऐकले नव्हते. 'कोपाशी चा दे आणि रिकाबी दे.' इथे कपातून या पंचमीच्या 'ऊन', 'हून' प्रत्ययाऐवजी ऐवजी 'शी' प्रत्यय या दालदी मुस्लीम स्त्रिया सहज लावताहेत ही मला गंमत वाटत होती आणि रिकाबी म्हणजे बशी हे तिथे मला कळले. व्यंकटेश माडगूळकरांची आई रागावली की त्यांना म्हणायची, 'कार्ट अगदी नसराणी आहे.' नसराणी या शब्दाचा अर्थ कितीतरी वर्ष त्यांनाही अनोळखी राहिला होता. 'एक हजार रात्री व एक रात्र - अरबी गोष्टी' या सुरस आणि चमत्कारिक ग्रंथाच्या तळटीपांत त्यांना तो आढळला. 'नसराणी' हा मूळचा अरबी शब्द आहे आणि त्याचा अर्थ धर्मांतर केलेला माणूस, आपला धर्म सोडून दुसऱ्या धर्मात जाणे ही गोष्ट निंद्य म्हणून ती शिवी. हाच शब्द मी कोशात पाहिला. कोशात 'नस्रानी' म्हणजे ख्रिस्ती, ईसाई असा अर्थ पाहायला मिळाला.

आमचे समाजशास्त्राचे प्राध्यापक एक विनोद नेहमी सांगत. तो म्हणजे 'दिंडी दरवाजा कोणी



तोडला?' या प्रश्नाचे उत्तर शाळा तपासणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी विचारल्यावर मुलांना, शिक्षकांना कोणालाच सांगता येईना. शेवटी शाळेच्या मुख्याध्यापकांना ही गोष्ट निदर्शनास आणून दिल्यावर त्यांनी सांगितले, 'अहो आमची मुले एवढी व्रात्य नाहीत. जे काय काय नुकसान झाले असेल ते सादिलातून भरून घेता येईल.' त्या वेळी सादिल हा शब्द कळला नव्हता नंतर मात्र लहानशी भत्त्याची रक्कम म्हणून तो ठाऊक झाला.

सानिया या मुलीला चार वेळा नावाचा अर्थ विचारल्यावर सांगता येईना तेव्हा उर्दू-मराठी-हिंदी शब्दकोश पाहिला आणि मिनिट, क्षण, पळ असा अर्थ पाहिल्यावर लगेच तिला कळीत केले. हौसेने परकीय शब्द नाव म्हणून ठेवले जातात पण त्यांचा अर्थ स्वतः समजून घेतला आणि ते नामाभिधान मिरवणाऱ्याला सांगितला तर त्या नावाचे सार्थक नाही का होणार? पु. शि. रेग्यांना कविता लिहीताना शब्दकोश लागायचाच असे रवींद्र पिंगे म्हणाले होते. आपण निदान अडला शब्द बघायला तरी निरनिराळे कोश वापरू या.

– डॉ. निधी पटवर्धन
nidheepatwardhan@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# रेडियो ते आकाशवाणी !

**संस्कृत भाषेची** नवशब्दप्रसवक्षमता किती विलक्षण आहे याचे उत्तम उदाहरण म्हणजे रेडियोसाठी प्रतिशब्द म्हणून देशभर वापरला जाणारा 'आकाशवाणी' हा शब्द. रेडियोचा शोध मार्कोनी या इटालियन संशोधकाने साधारण १९०० सालाच्या सुमारास लावला. प्रकाशाचा किरण किंवा स्रोत वा लहरी या अर्थाच्या 'रेडियस' या लॅटिन शब्दावरून मार्कोनीने रेडियो हा शब्द घडवला. तेव्हापासून जगभर तोच शब्द रूढ होता.

भारतात १९२३ साली रेडियोचे प्रसारण सुरू झाले तेव्हाही त्याला रेडियोच म्हणत. म्हैसूरमधील एम. व्ही. गोपालस्वामी या मानसशास्त्राच्या प्राध्यापकांनी आपल्या 'विठ्ठल विहार' बंगल्यात १९३६ साली खासगी रेडियो स्टेशन सुरू केले, त्याला 'आकाशवाणी' हे नाव दिले. आकाशातून माणसाला संदेश मिळतात हा आपल्या सांस्कृतिक संचिताचाच भाग आहे. त्यातूनच 'आकाशवाणी होणे' ही संकल्पना निघाली. उदाहरणार्थ, देवकीचा आठवा पुत्र आपला वध करेल हे आकाशवाणी होऊनच कंसाला कळले होते. तो पारंपरिक शब्द रेडियोसाठी उत्तम प्रतिशब्द होता. लवकरच आकाशवाणी हे लोकांपर्यंत पोचायचे सर्वांत प्रभावी साधन बनले. वृत्तपत्रे वाचण्यासाठी आवश्यक ती साक्षरता आपल्या देशात कमीच होती आणि



दूरदर्शनच तेव्हा दूरच होते. साहजिकच केंद्र सरकारने हे महत्त्वाचे जनसंपर्क माध्यम स्वतःच्या ताब्यात घेतले. राष्ट्रपती किंवा पंतप्रधान राष्ट्राला उद्देशून भाषण तेथूनच करत. सर्व महत्त्वाच्या घोषणांसाठी आकाशवाणी अपरिहार्य होती. आकाशवाणी केंद्राचा त्याकाळी प्रचंड रुबाब असे व तिथे कायम कडेकोट पोलीस बंदोबस्त असे. पण त्यावेळीही सरकारी स्तरावर 'ऑल इंडिया रेडियो' हेच शब्द रूढ होते.

मूळ पुण्याचे बाळकृष्ण विश्वनाथ केसकर हे पुढे १९५२ ते १९६२ अशी सलग १० वर्षे केंद्रीय माहिती व प्रसारण मंत्री होते. ते काशीला प्राध्यापक होते व भारतीय संस्कृतीचा त्यांचा मोठा व्यासंग होता. त्यांच्याच पुढाकाराने १९५७ साली 'आकाशवाणी' हा शब्द रेडियोसाठी अधिकृतरीत्या वापरला जाऊ लागला. भारतात १९५९ साली टेलिव्हिजन प्राथमिक स्वरूपात सुरू झाले आणि त्यासाठीही पुढे 'दूरदर्शन' हा चपखल संस्कृतजन्य प्रतिशब्द योजला गेला. संस्कृतच्या नवशब्दप्रसवक्षमतेचे ते आणखी एक द्योतक.

**– भानू काळे**

bhanukale@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# वचने कायम ठेवणारे अनेक शब्द...

**'या वर्षी तापमान** इतके वाढले आहे, की दुपारी घराबाहेर पडलेल्या माणसांना सूर्याची प्रखर किरणे अक्षरशः भाजून काढतात.' या वाक्यात 'सूर्याची किरणे' हा चुकीचा प्रयोग आहे. 'किरणे' या शब्दाचे स्वरूप काय आहे, ते पाहू या. 'किरणे' हे नाम, नपुंसकलिंगी अनेकवचनी आहे. म्हणजे या अनेकवचनी शब्दाचे एकवचन 'किरण' होईल. 'किरणे' हे नपुंसकलिंगी, अनेकवचनी असल्यामुळे 'किरण' हा एकवचनी शब्दही नपुंसकलिंगी होईल! जसे- बाळ-बाळे (बाळं), 'सूर्याचे एक किरणही मला भाजून काढते.' असे एकवचनी नाम व एकवचनी क्रियापद असलेले वाक्य होईल! ही रचना सदोष आहे.

मराठी भाषेत 'किरण' हा संस्कृतातून स्वीकारलेला तत्सम शब्द आहे. तो संस्कृतात व मराठीतही नाम, पुल्लिंगी, एकवचनी आहे. या शब्दाचे अनेकवचन 'किरण' आहे. (जसे दगड- पु.ए.व.-दगड (पु.अ.व.), असेच आणखी काही शब्द पाहा. देव (पु.ए.व.)-देव (पु.अ.व.), मानव (ए.व.), मानव (अ.व.), दीप (ए. व.), दीप ( अ. व.) - वाक्ये अशी होतील- त्याने दगड उचलला. (क्रियापद-(एकवचनी). रस्त्यावर खूप दगड पडले होते.(अनेकवचनी) या अकारान्त, पुल्लिंगी शब्दांना आकारान्त विशेषण लागले, तर



तेही वाक्यात असे होतील.- चांगला दगड, काळा दगड- चांगले दगड, काळे दगड. तसेच छोटा दीप, मोठे दीप, पण फळ (न.पुं.ए.व.)-फळे (ळं) (अ.व.न.पुं.) सुरुवातीला दिलेल्या वाक्यात 'किरणे' या शब्दाचे एकवचन-किरण (न.पु.) होईल. त्याचे अनेकवचन 'किरणे' किंवा (किरणं), आपल्या भाषेत 'किरण' हा शब्द नपुंसकलिंगी नसून संस्कृताप्रमाणे पुल्लिंगी आहे.

मराठी भाषेवर प्रेम करणाऱ्या, भाषेचे स्वरूप जपणाऱ्या मराठी भाषकांनी नामाचे लिंग, वचन इ. लक्षात घेऊन कटाक्षाने शब्दयोजना करणे आवश्यक आहे; नव्हे ते आपले कर्तव्यच आहे. वरील वाक्य असे आहे- 'या वर्षी तापमान इतके वाढले आहे, की दुपारी घराबाहेर पडलेल्या माणसांना सूर्याचे प्रखर किरण अक्षरशः भाजून काढतात.' असेच काही शब्द- बदल (नाम पु.ए.व.) बदल (अ.व.), आहार (ए.व)- आहार (अ.व.), प्रहार (ए.व.)-प्रहार (अ.व.), प्रपंच (ए.व.)-प्रपंच (अ.व.), अपमान (ए.व.)- अपमान( अ.व.)

**-यास्मिन शेख**

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# शेजीने दिले बोट, त्याने काय भरेल पोट

**शेजी म्हणजे** शेजारीण. शेजारणीने आपण केलेला पदार्थ प्रेमापोटी आपल्याला दिला, तर त्याने काही आपले पोट भरत नसते.

तो पदार्थ आपल्याला जरी आवडला तरी तो काही आपण परत मागूही शकत नाही. ही गोष्ट अगदी खरी आहे. कमल आणि विमल दोन सख्ख्या शेजारणी. दोघींची अगदी घट्ट मैत्री. दोघींचे सर्व बाबतीत साटेलोटे चाललेले असायचे.

एकदा विमलने तिने केलेले चमचमीत बटाटेवडे कमलला आणून दिले. म्हणाली, 'थोडेच दिले आहेत गं ! म्हटलं तेवढाच तुझा मधल्या वेळेचा नाश्ता करण्याचा प्रपंच वाचला.'

ती गेल्यावर कमलच्या सासूबाई हसून म्हणाल्या, 'अगं ! तिने जरी चांगल्या भावनेनं हे वडे आणून दिले, तरी त्यात आपला नाश्ता कसा होणार? वाढीची वयं आहेत ना मुलांची? त्यांची भूक कशी भागणार एवढ्याशा वड्यांत? कमल, तुझा नाश्त्याचा व्याप काही चुकणार नाही हं. तू करंच बाई नाश्ता ! अगं म्हणतात ना, 'शेजीने दिले बोट, त्याने काय भरेल पोट?'

फक्त कुटुंबापुरताच त्याचा आशय मर्यादित आहे असे नाही, तर एखादी संस्था, एखादा देश या बाबतीतही ही म्हण लागू पडण्यासारखी आहे.



उदाहरणार्थ- एखादा देश आपण उत्पादित केलेली गोष्ट मदत म्हणून देऊ करीत असला तरी ती मदत आपल्याला सतत मिळेलच, याची शाश्वती नाही. आपण आपल्या देशातच ती गोष्ट कशी निर्माण करू शकतो का हे बघितले पाहिजे, म्हणजे आपल्याला मिंधेपण येत नाही. आपली वाट अधिक सामर्थ्यवान होते.

'शेजीने दिले बोट, त्याने काय भरेल पोट' ही म्हण आपल्या शेजारील राष्ट्राने जरी ते चहा आयात करीत असले तरी 'तीन कप चहा घेण्याऐवजी एकच कप चहा पीत जा. दुसऱ्यावर अवलंबून राहू नका', असा संदेश देत सार्थ ठरवली आहे. शेवटी आपल्या गरजा आपल्यालाच भागवाव्या लागतात.

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@yaamail.com

# वाक्प्रचारांमधील लौकिक-अलौकिक



**अलौकिक पातळीशी** निगडित काही वाक्प्रचार लौकिक ( व्यावहारिक ) पातळीवरही वापरले जातात. त्यासाठी केवळ एखादा शब्द बदलणे किंवा बोलण्याचा नुसता सूर बदलणे पुरेसे ठरते. उदा. ब्रह्मानंदी टाळी लागणे, हा वाक्प्रचार पाहा. याचा अर्थ आहे, श्रेष्ठ अशा ध्यानमग्न स्थितीतील तल्लीनता अनुभवणे.

'ब्रह्मानंदी लागता टाळी, कोण देहाते सांभाळी' असे म्हणतात. मात्र हाच वाक्प्रचार 'झोप लागणे' या अर्थानेही व्यंग्यार्थाने वापरला जातो. कधी आपण फोन पटकन उचलला नाही, तर, 'ब्रह्मानंदी टाळी लागली वाटतं!' अशी प्रतिक्रिया ऐकून घ्यावी लागते!

अवतार घेणे, या वाक्प्रचाराचेही असेच आहे. काहींची श्रद्धा असते की परमेश्वर मानवी रूपात पृथ्वीतलावर अवतार घेतो. या वाक्प्रचाराभोवती असे अलौकिकतेचे वलय आहे. मात्र, 'अवतार होणे' या वाक्प्रचारात केवळ एक क्रियापद बदलले की अर्थाचा स्तर धपकन खाली घसरतो! एखाद्या व्यक्तीचे रूप हास्यास्पद झाले आहे, हे त्यातून कळते. त्यात उपहासाचा सूर असतो. उदा. उंचावरच्या पिठाच्या डब्याचे झाकण अनवधानाने उघडले आणि पीठ अंगावर सांडले , तर 'काय अवतार झालाय!' असे ऐकून घ्यावे लागते.

मोक्ष मिळणे, या वाक्प्रचाराला तत्त्वज्ञानात महत्त्व आहे. जन्ममृत्यूच्या चक्रातून सुटका, मुक्तीची श्रेष्ठ अवस्था, स्वर्गप्राप्तीचा आनंद अशा अलौकिक अर्थाचे वलय त्याला आहे. मात्र, कपाळमोक्ष होणे, या वाक्प्रचारात हे अर्थवलय अभिप्रेत नाही. तेथे रोकडा वाच्यार्थ अपेक्षित असतो. तो आहे, डोके फुटणे आणि मृत्यू होणे. त्यामुळे अपघातात एखाद्याचा कपाळमोक्ष झाल्याची बातमी हमखास ऐकू येते.

प्रसाद मिळणे म्हणजे दैवी कृपा लाभलेला खाद्यपदार्थ मिळणे. देवाला नैवेद्य दाखवून एखादा खाद्यपदार्थ सर्वांना वाटायची पद्धत असते. मात्र साधा बोलण्याचा सूर बदलला तरी याचा अर्थ बदलतो, कारण प्रसाद मिळणे या वाक्प्रचाराचा व्यंग्यार्थ आहे, मार बसणे. पूर्वी आईवडिलांच्या हातचा प्रसाद खोडकर मुलांना नेहमी मिळत असे!

वाक्प्रचारांमधला लौकिक-अलौकिक स्तर बदलण्याचा हा भाषेचा खेळ मोठा मनोवेधक आहे, नाही का?

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# ‘तो’ की ‘ती’ कसे ठरवावे?

‘**मी तुम्हाला** कालच ईमेल पाठवली.’ ‘हो? मला नाही मिळाला.’ ‘असं कसं, मिळाली असेल बघा.’ ‘नाही मिळाला अजून.’ अशा एखाद्या ईमेल किंवा ईपत्राच्या देवघेव संवादात समोरच्या व्यक्तीला ते ईपत्र नंतर मिळालं असेलही. पण यात ‘तो’ ईमेल की ‘ती’ ईमेल म्हणायचं, की मराठीतल्या ‘पत्र’ या शब्दाच्या लिंगाप्रमाणे ‘ते’ ईमेल म्हणायचं?

मो. वि. भाटवडेकर यांच्या ‘राजहंस व्यावहारिक मराठी शब्दार्थ कोशा’मध्ये हा शब्द पत्राच्या संदर्भाने नपुंसकलिंगी दिला आहे. आज मात्र त्याचं स्त्रीलिंगी आणि पुल्लिंगी रूपच रूढ झाल्यामुळे हा शब्द बाग, ढेकर याप्रमाणे उभयलिंगी मानायला हरकत नाही.

मराठी पडदा आठवून ‘तो’ स्क्रीन म्हणायला जावं, तर नवीन पिढी ‘ती’ स्क्रीन असं ऐकवून आपल्याला सुधारते. ‘तो’ साईज की ‘ती’ साईज? ‘ते’ गिफ्ट की ‘ती’ गिफ्ट? ‘ती’ वीज असली तरी लाईट मात्र ‘तो’ की ‘ती’? मराठीत वापरल्या जाणाऱ्या अशा अनेक इंग्रजी शब्दांच्या व्याकरणिक लिंगाबाबत वैविध्य आढळतं. मुळातच निर्जीव वस्तूंच्या नामांचं लिंग ठरवणं, ही गोष्ट आजवर मराठीत रूढीच्या आधारावर चालत आली आहे. शक्यतो त्याच अर्थाच्या मराठी शब्दानुसार नवीन शब्दाचं लिंग ठरवायचं, अशी



पद्धत असली तरी त्यालाही खूप अपवाद आहेतच. त्यामुळे प्रत्यक्ष वापर कसा होतो यावरच लिंग ठरवणं हा मार्ग उरतो.

लिंगाप्रमाणेच भाषेत आलेल्या इंग्रजी शब्दांची अनेकवचनी रूपं कोणती, याबाबतही प्रश्न पडतो. पूर्वी मराठीत आलेल्या इंग्रजी शब्दांची बँक- बँका, बॅग- बॅगा, गॅलरी- गॅलऱ्या अशी इंग्रजीपेक्षा स्वतंत्र अशी अनेकवचनं आपण केली आहेत. मात्र, आजच्या बोलीभाषेत इंग्रजी शब्दांची अशी अनेकवचनं करण्याऐवजी त्यासाठी एकवचनी रूप किंवा मूळ भाषेतलं अनेकवचन तसंच वापरण्याचं प्रमाण वाढलं आहे. उदा. तिथे दिवसभरात अनेक मॅच/ मॅचेस खेळल्या गेल्या. मॅच हा शब्द स्त्रीलिंगी मानल्यास माळ- माळा किंवा भिंत- भिंती यानुसार ‘मॅचा’ किंवा ‘मॅची’ असं त्याचं अनेकवचन होईल. पण अर्थातच हे नियमानुसार घडवलेलं रूप प्रचलित होण्याची शक्यता कमी आहे. मराठीतल्या इंग्रजी शब्दांच्या लिंग, वचन, विभक्ती, सामान्यरूप अशा व्याकरणिक माहितीच्या नोंदी असलेल्या काही कोशांबद्दल वाचू पुढच्या लेखात.

**– वैशाली पेंडसे-कार्लेकर**
vaishali.karlekar1@gmail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# इंग्रजांच्या क्रिकेटचे मराठीकरण

**क्रिकेट म्हणजे** 'राजांचा खेळ आणि खेळांचा राजा'. जिथे ब्रिटिश साम्राज्य होते तिथेच क्रिकेट खेळले जाते. भारतात क्रिकेट हा सर्वाधिक लोकप्रिय खेळ आहे. क्रिकेटची चर्चा शाळेतल्या वर्गापासून ज्येष्ठ नागरिक कट्ट्यापर्यंत देशभर सुरू असते. साहजिकच वृत्तपत्रांतून क्रिकेट सामन्यांचे विस्तृत वर्णन पूर्वीपासून येत असे.

मुंबईहून प्रसिद्ध होणाऱ्या अच्युत बळवंत कोल्हटकर यांच्या 'संदेश'ने त्यात आघाडी घेतली होती. साधारण १९२० नंतर त्यांनी क्रिकेटमधील शब्दांना मराठी प्रतिशब्द योजायला सुरुवात केली. गोलंदाज (बॉलर), फलंदाज (बॅट्समन), क्षेत्ररक्षक (फील्डर), यष्टिरक्षक (विकेटकीपर), षटक (ओव्हर), निर्धाव षटक (मेडन ओव्हर) वगैरे काही शब्द 'संदेश'नेच प्रथम रूढ केले.

पुढे आकाशवाणीवरून क्रिकेट सामन्यांचे धावते समालोचन (रनिंग कॉमेंटरी) सुरू झाले. विजय मर्चन्ट किंवा डिकी रत्नाकर यांच्यासारखे समालोचक खूप लोकप्रिय झाले. पण त्यांची भाषा इंग्रजी होती. त्याच सुमारास संयुक्त महाराष्ट्र राज्याची निर्मिती झाली आणि मराठी राजभाषा झाली. साहजिकच मराठीतून धावते समालोचन सुरू झाले. गरज ही शोधाची जननीआहे म्हणतात व त्यानुसार क्रिकेटमधील असंख्य शब्दांना मराठी



प्रतिशब्द शोधले गेले. समालोचक बाळ ज. पंडित तसेच पत्रकार वि. वि. करमरकर, चंद्रशेखर संत वगैरेंनी याबाबत पुढाकार घेतला. फलंदाजीशी निगडित असे धाव, चोरटी धाव, चौकार, षटकार, शतक, अर्धशतक वगैरे शब्द; खेळाडू बाद होण्यासाठीचे त्रिफळाचीत, यष्टिचीत, स्वयंचीत, पायचीत, धावबाद, झेलचीत वगैरे प्रकार; गोलंदाजीचे जलदगती, मध्यमगती, फिरकी वगैरे प्रकार असे अगणित शब्द रूढ झाले. नाणेफेक, कर्णधार, उपकर्णधार, निवडसमिती, मालिका, पंच, तंबू, राखीव, सीमारेषा, सीमापार, प्रेक्षागृह, खेळपट्टी, बाद, नाबाद, 'दांडी गुल' होणे, भोपळा फोडणे, धुव्वा उडणे यांसारखे क्रिकेटव्यतिरिक्त इतरत्रही वापरता येतील असे आनुषंगिक शब्ददेखील वापरात आले. आकाशवाणी राज्यभर पोहोचत होती व त्यामुळे ते प्रतिशब्ददेखील सगळीकडे पोहोचले; मराठी भाषेत मोलाची भर पडली.

– भानू काळे
bhanukale@gmail.com

लोकसत्ता Fri, 08 July 2022
https://epaper.loksatta.com/c/69054769

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# ष्ट कुठे आणि ष्ठ कुठे?




'**सध्या भर** दुपारी जमिनीचा पृष्टभाग इतका तापतो, की त्यातून अग्नीच्या ज्वाळा बाहेर पडत आहेत, असे वाटते.' या वाक्यात चूक आहे ती पृष्टभाग या शब्दाची. पृष्ट भाग- समासातील हे दोन शब्द. पृष्ट (ष्+ट) असा शब्दच अस्तित्वात नाही! आपण अनेकदा 'पृष्ठ' या शब्दाचा उच्चार 'पृष्ट' असा चुकीचा करतो आणि लिहितानाही त्या चुकीच्या शब्दाची वाक्यात योजना करतो. 'पृष्ठ' हा संस्कृतातील, मराठी भाषेने स्वीकारलेला (काहीही बदल न करता) तत्सम शब्द आहे. त्याचा अर्थ आहे- सपाटी, वरचा भाग, पुस्तकाचे पान. (पाठ,मागचा भाग) असेही या शब्दाचे संस्कृतात अर्थ आहेत. पण मराठीत 'वरचा भाग, पुस्तकाचे पान, पुढील भाग' हे अर्थ रूढ आहेत. हा शब्द संस्कृत भाषेत नाम, नपुसकलिंगी आहे. 'या पुस्तकाची पृष्ठसंख्या दोनशे आहे,' किंवा 'हा शब्द या पुस्तकात पृष्ठ क्रमांक २५ वर पाहा.' अशी वाक्ये आपण वापरतो. पण वरील वाक्यात हा शब्द 'जमिनीवरील भाग' अशा अर्थी योजिला आहे. तो शब्द पृष्टभाग असा नसून पृष्ठभाग (ष्ट नव्हे ष्ठ = ष् + ठ) असा आहे. संस्कृतात 'पुष्ट' हे विशेषण आहे. 'पुष्ट'चा अर्थ आहे- पोसलेला, लठ्ठ, आपण क्वचित लठ्ठ याअर्थी 'पुष्ट' हा शब्द योजतो. मराठी 'पुष्टी' (सं.पुष्टि) हा शब्द 'दुजोरा' या अर्थाने मराठीत रूढ आहे. हे लक्षात घ्यावे, की हा शब्द पुष्ट (ष्+ट) आहे. पृष्ठ किंवा पृष्ट नाही. वरील वाक्य असे लिहायला हवे- 'सध्या भर दुपारी जमिनीचा पृष्ठभाग इतका तापतो, की त्यातून अग्नीच्या ज्वाळा बाहेर पडत आहेत, असे वाटते.' कोणतीही भाषा बोलताना अशा प्रकारचे चुकीचे प्रयोग होतच असतात. पण बोलणे आणि लिहिणे यांत फरक आहे, याचे विवेचन मी माझ्या जानेवारी २०२२ च्या पहिल्या लेखात केलेच आहे. लेखन करताना मराठी भाषकांनी योग्य खबरदारी घ्यावी, ही विनंती.

आता काही शब्दांत 'ष्ट' किंवा 'ष्ठ' शेवटी असलेले शब्द-

**ष्ट** : स्पष्ट, रुष्ट, भ्रष्ट, दुष्ट, नष्ट, इष्ट, कष्ट, अष्ट, मिष्ट, दृष्ट-ष्टी, शिष्ट, विशिष्ट, उत्कृष्ट, छांदिष्ट, संपुष्ट, भ्रमिष्ट, चविष्ट इ.

**ष्ठ** : श्रेष्ठ, ज्येष्ठ, विष्ठा, निष्ठा, प्रतिष्ठा, षष्ठी (सहावी), शुक्लकाष्ठ, शर्मिष्ठा, वरिष्ठ, तत्त्वनिष्ठ, कनिष्ठ, घनिष्ठ इ.

**– यास्मिन शेख**


लोकसत्ता
Mon, 11 July 2022
https://epaper.loksatta.com/c/69107751




**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# ...गोड बोलावं ओठी

**जितकी माणसं** तितक्या त्यांच्या प्रकृती, स्वभाव, प्रवृत्ती आणि तितक्या त्यांच्या बोलण्याच्या पद्धती. काही लोक बोलण्याच्या बाबतीत संकोची असतात, भिडस्त असतात. काही लोक अतिशय स्पष्टवक्ते असतात. काही लोक कडू कारल्याप्रमाणे अत्यंत कडवटपणाने बोलणारे असतात. काही लोक गोड बोलणारे असतात.

इतके मात्र खरे, की शब्द हे शस्त्र आहे. त्याचा वापर जपून करावा लागतो. एकदा मुखातून बाहेर गेलेला शब्द परत घेता येत नाही, हे जो जाणतो, तो त्याच्या कामात खूप यशस्वी होऊ शकतो. जो सर्वांच्या चुका पोटात घालून गोड बोलण्यात यशस्वी होतो, तो माणूस सर्वांचा आवडता होऊ शकतो.

जो माणूस अशा चुकांसाठी वाक्ताडन करत सुटतो तो सर्वांचा नावडता होतो. आपण जेवताना सरळ घास घेऊ शकतो आणि अन्य काही शक्कल लढवत हात वळवूनही घास घेऊ शकतो. तो घास कसा घ्यायचा ते आपल्या मनावर असते. सरळ बोटाने भांड्यातील तूप निघू शकले नाही तर वाकड्या बोटानेही आपण ते काढू शकतो.



एका शिक्षण संस्थेचे संचालक त्यांच्या संवादकौशल्यासाठी, बोलण्यासाठीही खूप प्रसिद्ध होते. ते जे बोलायचे ते फार जपून बोलायचे. 'सगळं ठेवावं पोटी अन् गोड बोलावं ओठी' हे फार महत्त्वाचे तत्त्व ते जाणून होते. प्रत्येकाच्या चुका ते जाणून असायचे, पण गोड शब्दांत फार हळुवारपणे त्या व्यक्तीला सांगायचे. उदा. एखाद्या कार्यक्रमासाठी सर्व कर्मचारी हजर राहावेत असा फतवा संस्थेने काढलेला असताना एखादा कर्मचारी त्या प्रसंगी हजर राहिला नाही तर ते त्याला म्हणायचे, 'काल कुठे होतात? तुम्ही याल असं वाटलं होतं, पण कुठे दिसला नाहीत. मला खात्री आहे की पुढच्या वेळी मात्र असे करणार नाही.' बस ! दोन गोड शब्दांनी काम झाले.

ज्ञानदेव म्हणतात, 'रोग जाय जरी दुधे साखरे तरि निंब का पियावा?'

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचार आणि शिक्षांचे प्रकार

**वेगवेगळ्या कालखंडात** गुन्हेगारांसाठी वेगवेगळ्या शिक्षा प्रचलित होत्या. तसेच विलक्षण स्वाभिमानी व्यक्ती कधी आत्मसन्मानार्थ स्वतःला शिक्षा करूनही घेत असत. वाक्प्रचार वाचताना अशा काही शिक्षांचे प्रकार कळतात. सांस्कृतिक अभ्यासाच्या दृष्टीने त्यांना महत्त्व येते.

'गाढवाचा नांगर फिरवणे,' हा जुन्या काळातील शिक्षेचा प्रकार आहे. एखाद्याची अप्रतिष्ठा करणे, सूड घेणे असा त्याचा अर्थ आहे. पूर्वी जिंकलेल्या गावावरून किंवा गुन्हेगाराचे घर पाडून त्या जागेवरून गाढवाचा नांगर फिरवून ती जागा ओसाड करत असत. 'पांढरीवर गाढवाचा नांगर फिरवला' हा वाक्प्रचार बखरीत आढळतो. आपल्याकडे मध्ययुगात अंगभंगाच्या शिक्षा असत. 'चौरंग करणे' हा त्यातलाच एक कठोर शिक्षेचा प्रकार आहे. या वाक्प्रचाराचा अर्थ आहे, गुन्हेगाराचे हातपाय तोडून त्याला अपंग करणे.

'अग्निकाष्ठ भक्षण' करणे, हा वाक्प्रचार ज्या शिक्षेविषयी आहे, ती शिक्षा म्हणजे प्राचीन काळात घेतला जाणारा एक प्रकारचा देहदंड आहे. अग्निकाष्ठ म्हणजे पेटलेले लाकूड. या वाक्प्रचाराचा अर्थ आहे स्वतःला जाळून घेणे. आपण केलेली प्रतिज्ञा पूर्ण करता आली नाही, तर पूर्वी काहीजण प्राण द्यायची शपथ घेत असत. उदा.



महाभारतात अर्जुनाने म्हटले होते, की 'दुसऱ्या दिवशीच्या सूर्यास्तापर्यंत जयद्रथाचा वध करीन अथवा अग्निकाष्ठ भक्षण करीन.'

'दिव्य करणे,' हा वाक्प्रचार प्राचीन काळातील कठोर शिक्षेची पद्धत सांगतो. पूर्वी कधी पंचायतीचा निकाल मान्य नसेल, तर उकळत्या तेलात हात घालणे वगैरे प्रकारचे दिव्य करायला सांगत असत. काही वेळा स्वतःच्या सत्यनिष्ठेची ग्वाही देण्यासाठी स्वाभिमानी व्यक्ती दिव्य करून दाखवत. सीतेने आपले शील पवित्र आहे, हे पटवून देण्यासाठी अग्निदिव्य केले होते.

'धिंड काढणे' हा वाक्प्रचारही पूर्वीची कठोर शिक्षा सांगतो. यात गुन्हेगार व्यक्तीची गाढवावर बसवून शेपटीकडे तोंड करून वाजतगाजत मिरवणूक काढत असत. गुन्हेगाराची सार्वजनिकरीत्या अप्रतिष्ठा करण्याचा हेतू त्यात असे! प्रशासन आणि शिक्षा या दोन्हीसाठी 'शासन' हा एकच शब्द असण्याचा योगायोग अशावेळी बोलका वाटू लागतो.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com

भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# घोडा अपना अरबी है...

**'एक आणा** अबलख घोडा, त्याची रेशीम खाली सोडा.' ही लावणीच्या गाण्याची ओळ गुणगुणताना 'अबलख' घोडा म्हणजे नेमका कसा? असा प्रश्न पडला. दोन-चार जणांना विचारल्यावर त्यांनी 'अरबी' घोडा असे सांगितले होतेच. पण कोश पाहूनच समाधान होते म्हणून कोशात पाहिले. व्युत्पत्ती कोशात 'अबलख' म्हणजे तयार, सशक्त आणि पांढरे व काळे पट्टे असलेला घोडा असे वाचले. आणि मूळ अरबी 'अबलक' याचा अर्थ पांढरा आणि काळा. संस्कृत 'अवलक्ष' म्हणजे पांढरा, फारशी 'अब्रक' म्हणजे काळा करडा आणि पांढरा मिश्रण असलेला, हिब्रूमध्ये अबरक.

हिब्रू, अरबी, फारशी, तुर्की भाषांतील शब्दांचा समावेश मराठीत झाला आहे. हे शब्द परकीय असले तरी महाराष्ट्रीय व त्या भाषा बोलणाऱ्या लोकांचा ४००-६०० वर्षांचा घनदाट संबंध आला आणि या दीर्घ संबंधांमुळे हे शब्द मराठीने आत्मसात केले. आता अंजीर हा शब्द पहा. भारतात हा शब्द आणि हे फळ अरबांनी आणले. अरबस्तान- रोम- ग्रीस- आशियामायनर- इटली- पोर्तुगाल-खोरासान-हिरात-अफगाणिस्तान-चीन असा प्रवास या शब्दाने केला आहे. या फळाला मराठी पर्यायी शब्द उपलब्ध नाही. आज 'अ'ने सुरू होणाऱ्या अरबी शब्दांना पर्यायी मराठी शब्द



सुचवू शकतो असे काही शब्द पाहूया. अजब - विलक्षण, चमत्कारिक, आश्चर्यकारक. अजबखाना- विचित्र वस्तुसंग्रहालय. अफवा- कंडी, आवई. अमली - गुंगी आणणारे. अमानत/अनामत - ताब्यात दिलेली ठेव. अंबारी - हौदा, छत्री, हत्तीवरचे आसन. अशील- पक्षकार. अस्सल- पहिले, मूळचे, मूळ. असामी- मनुष्य, मोठे प्रस्थ. अर्ज- विनंती, निवेदन, अभ्यर्थना, प्रार्थना. अलबत- खरोखर. अलाहिदा - पृथक्, वेगळा. अलिशान - उच्च दर्जाचे, अव्वल - उत्तम, उच्च, पहिला. अवलाद/औलाद - मुलाची संतती. मुलीच्या संततीला 'अफलाद' म्हणतात. अर्वाचीन मराठीत याच्या अर्थामध्ये फरक झाला आहे आणि याचा शिवीसारखा उपयोग होतो हे अर्थभ्रंशाचे उदाहरण आहे. (संदर्भ- मराठी व्युत्पत्ती कोश - कृ. पां. कुलकर्णी) काही परकीय शब्दांचे फक्त अर्थच वरती सांगितले आहेत. त्याला पर्यायी मराठी शब्द निर्माण करणे, कोणा येरा-गबाळ्याचे काम नोहे. बघा तुम्हाला जमतात का!

**- डॉ. निधी पटवर्धन**
needhipatwardhan@gmail.com

लोकसत्ता
Thu, 14 July 2022
https://epaper.loksatta.com/c/69164602

# कारकून आणि काबाडकष्ट

**'कारकून' हा** शब्द अर्थबदल होऊन शब्द कसे रूढ होतात याचे चांगले उदाहरण आहे. मुळात या फारसी शब्दाचा अर्थ 'कार कून' म्हणजे 'काम करणारा' असा आहे. 'चांगला किंवा हुशार माणूस' या अर्थाने तो वापरला जाई. कारखाना (काम करण्याची जागा) किंवा कारकीर्द (काम करण्याचा कालावधी) हे शब्दही 'कार' शब्दाचे विस्तारित रूप आहेत.

कारनामे, कारागीर, कारागिरी, कारवाई, कारभार, कारभारी हे शब्दही तसेच अर्थबदल न होता तयार झाले. पेशवाईत 'कारकुनास' मोठ्या जबाबदारीच्या कामावर पाठवत असत. पण पुढे पुढे अर्थबदल होऊन 'कारकून' शब्दाला कमीपणा आला आणि केवळ 'किरकोळ लिखापढीचे काम करणारा' असा निंदाव्यजक अर्थ त्याला प्राप्त झाला. फारसीप्रमाणे संस्कृतमध्येही 'कार' हा शब्द आहे, पण त्याचा अर्थ 'शब्द', 'आवाज' असा आहे. ॐकार, मकार, अकार इत्यादी शब्दांतील 'कार' हा शब्द 'आवाज' याच अर्थाने आहे.

पण 'कार' शब्दाचा एक अर्थ 'करणारा' असाही आहे आणि त्या अर्थाची जोड देऊनही अनेक शब्द संस्कृतात व पुढे मराठीत रूढ झाले. चर्मकार, कुंभकार, शिल्पकार, मूर्तिकार, शस्त्रकार, वस्त्रकार, सूचिकार, सुभाषितकार, गीतकार, भाष्यकार इत्यादी. मात्र ते शब्द निर्माण होताना अर्थबदल झाला नाही.



काबाडकष्ट हा असाच एक शब्द. कृ. पां. कुलकर्णी यांच्या व्युत्पत्तिकोशानुसार 'काबाड' हा शब्द सकृतदर्शनी वाटतो तसा अरबी किंवा फारसीतून आलेला नाही; कारण त्या दोन्ही भाषांमध्ये 'ड' हे अक्षर नसते. संस्कृत 'कर्पट'पासून हिंदीत 'कबाड' हा शब्द बनला आणि हिंदीतून तो मराठीत आला. त्याचा अर्थ कचरा, अडगळ, रद्दी असा आहे. कबाडी (जुनेपुराणे सामान विकत घेणारा किंवा भंगारवाला), कबाडखाना (वेड्यावाकड्या, अनावश्यक, अस्ताव्यस्त वस्तू ठेवलेली जागा) हे शब्द त्यातूनच निघाले. त्यालाच पुढे 'कष्ट' शब्दाची जोड देऊन 'काबाडकष्ट' म्हणजे 'निरर्थक' किंवा 'बिनमहत्त्वाचे श्रम' या अर्थाने तो वापरला जाऊ लागला. उदाहरणार्थ, ''इतके काबाडकष्ट करून पदरी काहीच पडले नाही.''

अर्थात काबाडकष्ट हा शब्द मराठीत चांगल्या अर्थानेही वापरला जातो. उदाहरणार्थ, ''त्या गरीब आईने खूप काबाडकष्ट करून आपल्या तिन्ही मुलांना वाढवले.''

– भानू काळे
bhanukale@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# विसर्गयुक्त शब्दांचे लेखन

**पुष्कळ वेळा** आपण काही शब्दांचे उच्चार चुकीचे करतो. तेच शब्द लिहितानाही, जसे उच्चारले आहेत, तसेच लिहितो. निदान लेखन करताना बिनचूक शब्द लिहावेत.

आता पुढील वाक्ये वाचा -

*'आम्ही सर्व जण संध्याकाळी घरावरच्या गच्चीत बसून गप्पा मारत होतो, चेष्टामस्करी करत होतो. इतक्यात काळेकुट्ट ढग आकाशात जमा झाले. एकदम सर्वत्र अंधःकार झाला. आम्ही गडबडीने घरात गेलो. घरातही अंधार! दिवा लावायला गेलो तर, वीज गेली होती. खिडकीतून बाहेर पाहिलं. रस्त्यावरचे दिवेही गेले होते. सर्वत्र नुसता हाहाःकार माजला होता.'*

या परिच्छेदात दोन चुका आहेत. बोलताना त्या शब्दांचा उच्चार आपल्याला हवा तसा करत असलो, तरी अर्थबोध होण्यात अडचण येत नाही, हे मान्य. लेखनात मात्र उच्चारलेल्या शब्दांसारखे लिहिणे योग्य नाही.

ते शब्द आहेत- अंधःकार आणि हाहाःकार.

हे संस्कृतातून मराठीने जसेच्या तसे स्वीकारलेले तत्सम शब्द होत. पण लेखनात चूक आहे, ती दोन्ही शब्दांतील विसर्गचिन्हांची. पहिला शब्द हा जोडशब्द आहे- अंध कार. 'अंध' (संस्कृत, विशेषण) अर्थ-अंधाराने व्याप्त, निबिड, दाट; 'अंधकार' (सं.नाम, पुल्लिंगी) अर्थ-काळोख. अंधकार या शब्दात 'अंधः' असा शब्द नाही. अनेक मराठी भाषक या शब्दाचा उच्चार अंध्धकार असा करतात, त्यामुळे लिहिताना 'ध' नंतर विसर्ग असावा, असे वाटते. (जसे मनःपूर्वक. शब्द आहे- मनस्पूर्वक. अंधकार शब्दामध्ये 'अंधस्' असा शब्द नाही. **अंधकार** हे बरोबर आहे. अर्थ आहे- दाट काळोख. अंधःकार चूक.

आता *हाहाःकार* हा वरील परिच्छेदात योजलेला शब्द पाहा. हाही तत्सम शब्द आहे. हाहा कार. संस्कृतात 'हाहा' हे उद्गार वाचक अव्यय आहे. अर्थ- दुःख किंवा यातना सूचित करणारे अव्यय. 'हाहा' हा दुःखोद्गार आहे. मराठीत 'अरेरे, अगग, हाय हाय' ही जशी दुःखोद्गारदर्शक अव्यये आहेत, तसेच संस्कृत 'हाहा' हे दुःखोद्गारदर्शक अव्यय आहे. हा शब्द आहे 'हाहाकार'. 'हा' नंतर विसर्ग नाही.

काही विसर्गयुक्त (शब्दाच्या मध्ये विसर्ग असलेले) शब्द पाहू-

कःपदार्थ, छंदःशास्त्र, निःसत्त्व, अंतःकरण, अंतःस्थ, दुःख, प्रातःस्मरण, मनःस्थिती, मनःपूर्वक, दुःस्वप्न, दुःस्थिती.

**-यास्मिन शेख**





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# सांगा- सांगी वडाला वांगी

**माणसाचा एक** जन्मजात स्वभाव असतो, की ऐकलेली गोष्ट सहसा तिखटमीठ लावल्याशिवाय ओठातून बाहेर येत नाही. याच स्वभावविशेषावर आधारित एक खेळही आपण लहानपणी खेळायचो. खूपच मजा यायची. तो खेळ म्हणजे 'कानगोष्टी.' जे ऐकले आहे ते शक्य आहे की नाही याचा विचार न करता दुसऱ्याच्या कानात सागूंनही टाकायचो. मग शेवटचा मुलगा त्याने ऐकलेले वाक्य सर्वांना मोठ्याने सांगायचा. तुम्हाला आठवला असेल ना हा खेळ!

एकदा आम्हीही हा खेळ खेळला होता. त्यात पहिल्या मुलाने सांगितले होते की, ''काल आम्ही सिनेमा बघायला गेलो होतो. बरोबर शंकर होता. खूप मजा आली.'' ते वाक्य ओळीने सर्वांच्या कानात सांगितले गेले.

शेवटच्या मुलाने जे सांगितले ते असे, ''काल आम्ही सिनेमा करायला गेलो होतो. बरोबर उंदीर होता. खूपच मजा आली.'' म्हणजे 'बघायला'च्या ऐवजी 'करायला' किंवा 'शंकर'च्या ऐवजी 'उंदीर' हा शब्द त्याला ऐकायला आला.

कधी कधी अतिशयोक्त सांगण्याचा स्वभावही उफाळून येतो आणि सरस आणि सुंदर



सांगण्याच्या स्वभावातून 'कानगोष्टी'चा खेळ रंगतो. एकदा एकाने पहिल्या खेळाडूच्या कानात सांगितले, ''अहो ! काय आश्चर्य ! सांगो वांगी नाही, खरंच आमच्या शेतात कणसंच कणसं उगवली आहेत.'' आणि शेवटच्या खेळाडूने त्याने ऐकलेली 'कानगोष्ट' मोठ्याने सांगितली, ''अहो ! महद आश्चर्य ! फक्त वांगीच नाहीत, खरंच आमच्या शेतात माणसंच माणसं उगवली आहेत.'' आणि ऐकणारे लोकही असे बहाद्द[र]की हा भूमातेचा चमत्कार असेल, असे समजून क्षणभर अवाक झाले.

एखादी घटना तिखटमीठ लावून सांगितली जाते आणि सांगा-सांगीत आपण वडाच्या झाडाला वांगी लावून मोकळे होतो. असे पानशेतच्या पुराच्या वेळी झाले होते. दुसऱ्या दिवशी अफवांमुळे पुण्यात जास्त हाहाकार माजला होता.

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# मृत्यूचे वर्णन करणारे वाक्प्रचार

**मृत्यू या** गूढ, अटळ घटनेचे वर्णन अनेक वाक्प्रचार करतात. कोण, कधी, कोठे मृत्यू पावतो, यासंदर्भानुसार त्यांच्यात वेगळेपणा येतो. बखरीमध्ये आढळणारा एक वाक्प्रचार येथे नोंदवते. तो म्हणजे करवत घेणे. याचा अर्थ आहे, जलसमाधी घेणे. 'पाणिपतची बखर'मध्ये युद्धानंतरचे हे वर्णन आहे : 'किती एकांनी राज्यलोभे प्रयागी जाऊन करवत घेतले.' याचा अर्थ असा की पुढील जन्मी राज्य मिळावे, यासाठी गंगा व यमुना यांच्या प्रवाहाच्या कात्रीमध्ये जलसमाधी घेतली. युद्धाशी संलग्न असा आणखी एक वाक्प्रचार म्हणजे कंठस्नान घालणे. याचा अर्थ आहे शिरच्छेद करणे, शत्रूचे शिर छाटल्यामुळे वाहणाऱ्या रक्ताने त्याला होणारे स्नान म्हणजे कंठस्नान. हा वाक्प्रचार चित्रदर्शी आहे. धारातीर्थी पडणे, हाही युद्धाशी निगडित वाक्प्रचार आहे. शस्त्राची धार हेच जणू पवित्र तीर्थ मानले जाते. त्यामुळे युद्धात आलेला मृत्यू गौरवपात्र ठरतो.

जीवनविषयक विशिष्ट तत्त्वज्ञानही वाक्प्रचारांमध्ये कधी उमटते. उदा. आयुष्याची दोरी तुटणे हा वाक्प्रचार माणसाची अगतिकता आणि नियतीची सत्ता सुचवतो. यमलोकीचा रस्ता धरणे, हा वाक्प्रचार समूहमनावरील संकल्पनांचा प्रभाव दाखवतो. यम ही मृत्यूची देवता मानली जाते. पृथ्वी



हा मृत्युलोक (येथे प्रत्येकाला मरण अटळ !), त्यामुळे मृत्यूनंतर यम माणसाला दुसऱ्या (काल्पनिक) जगात घेऊन जातो, अशी अनेकांची समजूत असते. पंचत्वात विलीन होणे, हा वाक्प्रचार वैज्ञानिक दृष्टी सुचवतो. पंचमहाभूतांमुळे घडलेला देह मृत्यूनंतर पुन्हा पूर्वस्थितीला जातो, हा त्याचा अर्थ आहे.

कालगतीचा संदर्भ देत येणारा एक वाक्प्रचार म्हणजे घटका भरणे, याचा अर्थ आहे अंतकाळ जवळ येणे. घटिका हे कालमापनाचे जुने परिमाण आहे. संत गाडगेबाबा यांनी अखेरच्या कीर्तनात देवाच्या नावाने प्राण्यांना बळी देण्याच्या प्रथेवर टीका करताना म्हटले आहे, 'जत्रेला जाताना बैलगाडीच्या मागं बांधलेल्या बकरीला काय माहीत की आता आपली घटका भरली आहे!'

हे विविध वाक्प्रचार काहीवेळा मृत्यूचे वर्णन करताना भाषेतील लालित्य वापरून दुःख टिपूनसुद्धा घेतात!

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com

भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# कोश काय सांगतात...

**मराठीत रुळलेले** किंवा रुळू पाहणारे इंग्रजी शब्द जेव्हा बोलण्यात किंवा लेखनात येतात, तेव्हा ते कसे लिहायचे, त्यांचे लिंग, वचन आणि सामान्यरूप कसे होते असे प्रश्न पडतात. या प्रश्नांची उत्तरे कोशांमध्ये मिळतात का ते पाहण्यासाठी काही प्रातिनिधिक कोशांवर एक धावती नजर टाकू या. या सर्व कोशकर्त्यांनी जास्तीत जास्त मराठी शब्द वापरण्याचा पुरस्कारच केला आहे, पण व्यावहारिक गरज आणि भाषासमृद्धी या हेतूने त्यांनी इंग्रजी शब्दांचा समावेश केला आहे, हे त्यांच्या प्रस्तावनेतून स्पष्ट होते.

वर्ष १९७० मध्ये लिहिलेल्या प्रस्तावनेत 'आदर्श मराठी शब्दकोश'कर्ते प्र. न. जोशी इंग्रजी शब्दांबद्दल म्हणतात, 'नव्या अनुभवविश्वातून जन्मास येणाऱ्या शब्दांना जगातील सर्वच प्रगत भाषा स्वीकारतात, मराठीने खळखळ करून चालणार नाही.' या कोशात ऑफिस, चेक, गॅलरी, प्रोजेक्टर, प्लॉट, बॉडीगार्ड असे अनेक इंग्रजी शब्द लिंग, अर्थ, समानार्थी शब्द आणि कोणत्या भाषेतून आले याच्या नोंदींसह दिले आहेत. मो. रा. वाळंबे यांच्या 'मराठी शुद्धलेखन प्रदीप'मधल्या शब्दसूचीत काही इंग्रजी शब्द आढळतात. 'विस्तारित शब्दरत्नाकर' या वा. गो. आपटे आणि ह. अ. भावे यांच्या कोशात डॉक्टर, गॅरंटी, प्रॉमिसरी



नोट, मॅनेजर असे अनेक शब्द असून त्यात त्यांचे लिंग, अर्थ, समानार्थी शब्द आणि कोणत्या भाषेतून आले हे सांगितले आहे.

मराठीच्या व्यवहारक्षेत्रांमध्ये आढळणारे इंग्रजीसह सर्व भाषांमधील शब्द असणाऱ्या मो. वि. भाटवडेकर यांच्या 'राजहंस व्यावहारिक मराठी शब्दकोश'मध्ये तुलनेने खूपच जास्त इंग्रजी शब्द दिले आहेत. यात शब्दांचे लिंग, अर्थ आणि क्षेत्रही सांगितले आहे. अरुण फडके यांच्या 'मराठी लेखन कोश'मध्येही इंग्रजी शब्द आढळतात. यात इंग्रजी शब्दांचे लिंग, वचन, सामान्यरूप आणि विभक्तिरूप अशी अधिक तपशीलवार व्याकरणिक माहिती दिली आहे. या व्यतिरिक्तही अनेक कोशांमध्ये इंग्रजी शब्द आहेतच, पण तरीही मराठीत वापरल्या जाणाऱ्या अधिकाधिक इंग्रजी शब्दांच्या व्याकरणिक नोंदीसह विस्तृत माहिती समाविष्ट करण्यासाठी कोश अद्ययावत करण्याची किंवा ऑनलाइन अर्थात आभासी माध्यमातून एखाद्या ई-कोशाच्या निर्मितीची गरज वाटते.

**वैशाली पेंडसे- कार्लेकर**
vaishali.karlekar1@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# बंदर, गोदी आणि आरमार

**देशाच्या विकासात** विदेशव्यापाराला खूप महत्त्व आहे आणि तो व्यापार मुख्यतः बंदरांतून होतो. चेन्नई, कोलकाता आणि मुंबई ही आजची महानगरे म्हणजे सतराव्या शतकात छोटी छोटी गावे होती, पण तिथे ईस्ट इंडिया कंपनीने आपली ठाणी उभारल्यानंतरच त्यांचा झपाट्याने विकास होत गेला. बॉम्बे या नावाची व्युत्पत्ती बॉन आणि बईया ( Buon Bahia, म्हणजे उत्तम बंदर) या दोन पोर्तुगीज शब्दांवरून झालेली आहे. बंदर आणि गोदी या समुद्रकिनाऱ्याशी जोडल्या गेलेल्या आणि म्हणून काहीशा समानार्थी वाटणाऱ्या शब्दांचा अर्थ वस्तुतः वेगळा आहे. किनाऱ्याचा समुद्रालगतचा खालचा भाग म्हणजे बंदर (पोर्ट) आणि जमिनीलगतचा वरचा भाग म्हणजे गोदी (डॉक). किनाऱ्याला बोट लावणे यालाही 'टू डॉक' असे म्हणतात आणि ते काम ज्यांना पायलट म्हणतात ते स्थानिक खलाशीच करतात. सातासमुद्रापार बोटी नेणाऱ्या कप्तानाला बंदरात बोट लावायची मात्र अनुमती नसते. ते काम स्थानिक पायलटचेच! फारसीतील बंदिर या शब्दावरून 'बंदर' शब्द आला. बोट किनाऱ्याला लागते ती याच जागी. इंग्रजीतील गोडाउन या शब्दावरून गोदाम शब्द आला आणि त्याचे अपभ्रष्ट रूप म्हणजे 'गोदी.' 'सामान ठेवण्याची जागा' हा त्याचा अर्थ. बोटीवरून उतरवलेला किंवा बोटीत चढवायचा माल गोदीत



साठवला जाई. पुढे सत्तरच्या दशकात कंटेनरमधून माल पाठवणे सुरू झाल्यावर गोदीचे महत्त्व काहीसे कमी झाले. अर्थात आजही बोटींची दुरुस्ती-देखभाल करण्यासाठी गोदीचे महत्त्व आहेच.

एकेकाळी मुंबईतील बंदरात आणि गोद्यांमध्ये लाखभर कामगार काम करत आणि जुन्या मुंबईचा एक तृतीयांश भूभाग पोर्ट ट्रस्टच्या अखत्यारीत होता. गोदीतील कामगार पूर्वी डोक्यावर वजन उचलत व म्हणून त्यांना 'माथाडी' म्हणत; पुढे ओझे उचलणाऱ्या सगळ्याच हमालांना माथाडी म्हटले जाऊ लागले.

किनारा विदेशव्यापाराशी जोडलेला असल्यान साहजिकच किनाऱ्याशी निगडित अनेक शब्द परदेशांतून आलेले आहेत. 'खलाशी' शब्द 'खलास्' या अरबी शब्दावरून आला आहे. जहाजाला दिशा देणारा कर्ण, म्हणजेच सुकाणू, धरणारा हा त्याचा अर्थ. गल्बत् या फारसी शब्दावरून 'गलबत' हा शब्द आला. आर्मेर या लॅटिन शब्दावरून आर्मांडा हा शब्द पोर्तुगीज व स्पॅनिश भाषांत गेला आणि त्याचेच एक रूप म्हणजे आपला 'आरमार' हा शब्द.

– भानू काळे

bhanukale@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# दर्शक नव्हे प्रेक्षक !

**कधी कधी** कानावर येते... ''वसंत कानेटकरांचे 'अश्रूंची झाली फुले' हे नाटक पाहायला नाट्यगृहात खूप दर्शक आले होते.'' तसेच हे दुसरे वाक्य- 'माझ्या भावाच्या विवाहसोहळ्याला मित्र, नातेवाईक तर आले होतेच, पण अनेक दर्शकही उपस्थित होते.' या दोन्ही वाक्यांत 'दर्शक' या शब्दाची योजना चुकीची आहे. योग्य शब्द आहे- 'प्रेक्षक'. दर्शक आणि प्रेक्षक या शब्दांचे अर्थ लक्षात घेऊ या.

दर्शक (विशेषण) अर्थ- दाखवणारा, सांगणारा, तज्ज्ञ, मर्मज्ञ. दर्शन (नाम, नपुंसकलिंगी, एकवचनी) अर्थ-अवलोकन, पाहणे. 'दर्श' या धातूपासून दर्शक (वि.) दर्शन (नाम) हे शब्द सिद्ध झाले आहेत. आणखी काही शब्द- दर्शनी दरवाजा- अर्थ-पुढचे दार, दर्शनी देखावा- अर्थ- समोरील देखावा, दर्शनक्षमता- दिसण्याचा गुण, सामर्थ्य. दर्शविणे (क्रि.) दाखवणे. सूचित करणे, खुणावणे, निर्देश करणे.

हे अर्थ लक्षात घेता वरील दोन्ही वाक्यांत योजलेला 'दर्शक' हा शब्द चुकीचा आहे, हे लक्षात आले असेल.

योग्य शब्द आहे- प्रेक्षक (नाम, पुल्लिंगी ए.व. आणि अ.व.) अर्थ- पाहणारा प्रेक्ष(धातू) पाहणे, प्रेक्षणे-अर्थ-पाहणे. प्रेक्षक(नाम, पुल्लिंगी) अर्थ- पाहणारा. प्रेक्षण (नाम, नपुसकलिंगी) पाहणे, दृष्टी, प्रेक्षणीय- (वि) पाहण्यालायक, सुंदर, मनोहर, अवश्य पाहिले पाहिजे असे. वरील वाक्ये अशी हवीत.- '...हे नाटक पाहायला नाट्यगृहात खूप प्रेक्षक आले होते.' आणि '...,पण अनेक प्रेक्षकही उपस्थित होते.' अशीच एक चुकीची वाक्यरचना- 'अनेक दर्शकांच्या साक्षीने त्याचे लग्न लागले'- येथे दर्शक हा शब्द 'वऱ्हाडी' या अर्थाने योजला आहे!

नाटक, चित्रपट, तमाशा, चित्रप्रदर्शन पाहायला येणारे प्रेक्षक आहेत, दर्शक नाहीत. व्याख्यान, परिसंवाद, मुलाखत, गायन इ. कार्यक्रमाला उपस्थित राहतात ते श्रोते (श्रोता (नाम.ए.व.) श्रोता म्हणजे ऐकणारा. त्यांना प्रेक्षक (पाहणारे) म्हणत नाही. पुढील काही शब्द पाहा. मार्गदर्शक (नाम.पु.) योग्य मार्ग दाखवणारा.

देवदर्शन-देवाचे (पूज्य देवाचे) अवलोकन, तसेच युद्धकलादर्शन, पूजनीय व्यक्ती भेटली, तर 'आपले दर्शन झाले, नमस्कार' असे आपण म्हणतो.

मराठी भाषकांनी 'प्रेक्षक' शब्दाऐवजी अगदी निराळ्या अर्थाचा 'दर्शक' हा शब्द लेखनात तरी वापरू नये, एवढेच मला सुचवायचे आहे.

**– यास्मिन शेख**

लोकसत्ता Mon, 25 July 2022
https://epaper.loksatta.com/c/69379953



# भाषासूत्र
कांचन कराई द्वारा संकलित

# ...रडू आलं पावसाळ्यात



**आपल्या घरातली** सर्व नाती समजू शकतात, पण सासू-सुनेचे नाते मात्र समजण्याच्या दृष्टीने अवघड! तसे जरा रूक्षच. आपल्या संस्कृतीत इतर कोणत्या नात्यांपेक्षा सासू-सुनेच्या नात्याविषयी आणि सावत्र आईच्या नात्याविषयी अनेक प्रकारे खूप वाईट पद्धतीने लोकांच्या मनात बरेच काही पेरलेले आहे. तेच मग मनावर बिंबवले जाते आणि त्याचे प्रतिबिंब वागण्यात उमटत जाते.

हल्लीच्या काळात या नात्यातील वाईट किंवा चुकीची भावना बदलत आहे आणि ही अतिशय स्वागतार्ह गोष्ट आहे. या नात्यात एक मजा अशी आहे, की दोन्ही व्यक्ती त्यांच्या जागी अतिशय चांगल्या असतात. पण दोन्ही व्यक्ती एकत्र आल्या की त्यांच्यात काय बिनसते ते मात्र कळत नाही, हे काय गौडबंगाल आहे याचा उलगडा होत नाही.

काही वेळा वाटते की याच्या मागे सत्तेचे राजकरण तर नाही? सासूला आपल्या मुलावरील प्रेमात आता आणखी एक वाटेकरी येणार असे वाटते की काय? किंवा आपल्या घरातील आपली एकहाती सत्ता आता संपणार, असे वाटते की काय? सुनेलाही इतर कोणी सत्ता गाजविणे आवडत नसावे.

सुनेलाही सासूबद्दल काय वाटते ते बहिणाबाई चौधरी यांच्या कवितेतून त्यांनी सांगितले आहेच. त्यांच्या कवितेत त्या जसे इतर नात्यांचे वर्णन करतात त्या प्रमाणे त्या सासूच्या नात्याचेही अतिशय खुबीने वर्णन करतात. त्या म्हणतात...

*जी जी म्हनता म्हनता, झाले जिभेले निवारा*
*सासू म्हनता म्हनता गेला तोंडातून वारा*

सर्व सांस्कृतिक संचितात सासू-सुनेच्या नात्याविषयी जी काही टीकाटिप्पणी केलेली असते त्यानुसार 'सासू मेली उन्हाळ्यात आणि रडू आलं पावसाळ्यात' ही एक जुनी म्हण आहे.

या म्हणीत कधीकधी सासू-सुनेच्या नात्यात जो दिखाऊपणा येतो त्यावर प्रकाश टाकलेला आहे. लोकांना दाखवण्यासाठी तरी तिला दु:खाचे उमाळे येतात, पण ते खूपच उशीरा नातेसंबंधांचे पैलू उलगडणाऱ्या अनेक म्हणींनी मराठी भाषा समृद्ध केली आहे.

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचार आणि मराठीची लकब

**मराठीमध्ये जोडशब्द** वापरण्याची पद्धत आहे. त्यातही एखादा शब्द पुनःपुन्हा येऊन तयार होणारा जोडशब्द (व्याकरणदृष्ट्या अभ्यस्त शब्द) वापरणे, ही मराठीची एक लकब आहे. या शब्दांचा उपयोग काही वेळा वाक्प्रचारांसारखा केला जातो. त्याची काही उदाहरणे देते. 'मराठी भाषाः वाढ आणि बिघाड.' या पुस्तकात श्री. के . क्षीरसागर यांचे वाक्य आहे, ते असे- 'भाषेचे मूळ वळण न सोडता नवे शब्द तयार करणे हे अलबत्या-गलबत्याचे काम नव्हे !' यातील अलबत्या-गलबत्या याचा अर्थ आहे, सोम्यागोम्या, अलाणेफलाणे इत्यादी. म्हणजे ते येऱ्या गबाळ्याचे काम नाही, ते आव्हानात्मक काम आहे, असे लेखकाला म्हणायचे आहे.

साटेलोटे करणे, हा वाक्प्रचार विवाहाच्या संदर्भात वापरला जातो. साटेलोटे करणे म्हणजे देवाणघेवाण करणे. आपल्या घरची मुलगी दुसऱ्याच्या घरी व दुसऱ्याची मुलगी आपल्या घरी विवाह करून आणणे, त्यात अभिप्रेत आहे. या प्रकाराने केलेले विवाह क्वचितच सुखदायक होतात. म्हणूनच , 'साटेलोटे आणि जन्माचे खोटे' अशी म्हण रूढ झाली आहे.

टणाटणा बोलणे म्हणजे तोंडचा पट्टा सोडणे, टोमणे मारणे. भाजताना फुटाणे जसे टणाटण उडत



असतात, तसे अंगावर येणाऱ्या गरम शब्दांचे चटके यात अभिप्रेत आहेत. पूर्वीच्या काळी काही स्त्रियांना अगदी लांबच्या नात्यातील सासूचे टणाटणा बोलणेदेखील निमूट ऐकून घ्यावे लागत असे !

य. न. केळकर यांनी 'ऐतिहासिक शब्दकोश' या ग्रंथात दिलेला वाक्प्रचार आहे, साळकोजी-माळकोजी करणे. याचा अर्थ आहे, अजिजी करणे. साळकोजी- माळकोजी म्हणताना बिनमहत्त्वाची व्यक्ती अभिप्रेत असते. त्यामुळे कोणालाही विनवणी करणे, हा त्याचा सूचित अर्थ होतो.

वाणीतिणीचा असणे, हा ग्रामीण वाक्प्रचार डॉ. सरोजिनी बाबर यांच्या 'लोकसाहित्य शब्दकोशा'त आहे. वाणी म्हणजे भाषा. वाणीतिणीचा म्हणजे कौतुकाचा, नवसाचा, ज्याच्याविषयी भरभरून बोलावे असे वाटते, असा !

असे आणखीही काही वाक्प्रचार आहेत. उदा. आटापिटा करणे, टाकोटाक जाणे इत्यादी. यातील अभ्यस्त शब्दांमध्ये येणाऱ्या अनुप्रासामुळे बोलण्याला डौल प्राप्त होतो.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# भाषेची ‘हकीगत’ !

‘**अर्जदास्त अर्जदार** बंदगी। बंदेनवाज अलेकं सलामथ। साहेबांचे सेवेसी बंदे शरीराकार. जीवाजी शेखदार। बुधाजी कारकून। प्रगणे शरीराबाद। किल्ले कायापुरी सरकार साहेबांची आज्ञा घेऊन स्वार झालों’, ‘ममताई देशपांडीण इणें तमाम प्रगणा जेरदस्त केला क्रोधाजी नाईकवाडी याणें तमाम तफरका केला.’

हे कोणी अरबी-फारसी लेखकाने लिहिलेले नसून ही संत एकनाथांच्या ‘अर्जदस्त’ मधील वाक्ये आहेत. राजकीय कारणांनी मराठी भाषा फारसी भाषेशी जवळजवळ ४५० वर्षे संबंधित राहिली आणि त्यातूनच फारसी मधील शब्द, काही उपसर्ग, वाक्प्रचार हे मराठीत सामावून गेले. एकनाथांच्या काळात भक्तिपर व वेदान्तपर लेखनात फारसी शब्द फार आले नाहीत पण इतर लेखनात त्यांचे प्रमाण बेसुमार वाढले. जमादार/ शिलेदार/ हवालदार/ सरदार अशा पदव्या ऐकू येऊ लागल्या. सरकारदरबारी फारसी भाषा सुरू झाली. ‘अर्जदारां’च्या फिर्यादींचा ‘काज़ी’पुढे जाऊन ‘फैसला’ किंवा ‘इन्साफ’ होऊ लागला. पत्रांबद्दल ‘कागद’ आले व त्यांत प्रमाणांसाठी ‘साक्षी’ होत्या त्या ‘गोही’ झाल्या. अधिकाऱ्यांचे ‘मोकादम’ झाले. प्रतिवर्षी मिळणाऱ्या वार्षिक वेतनाबद्दल ‘सालिना मुशाहिरा’ देण्याचा ‘सिलसिला’ सुरू झाला. आता



काही फारसी शब्दांना मराठी पर्याय सुचवून पाहू या. जाजम- बैठक पथारी, गैदी- आळशी, नेभळा, हजार- सहस्र, दहादा शंभर, हंगाम- वेळ, सुगी, नग- दागिना, वस्तू, कसाई- खाटिक, खामोश- स्तब्ध, शांत, खुश- आनंदी, खुशामत- तोंडपुजेपणा, छापा- अचानक हल्ला, हवालदिल- घाबरलेला, हरकत- विरोध, अडथळा, विलंब, पागा- घोडशाळा, तंबू- कापडीघर, डेरा, तयार- सिद्ध, दिवाना- वेडा, पिसाट, मूर्ख, जाब- उत्तर, जादू- मंत्रटोणा, इंद्रजाल, चुणी-वळी, घडी, निरी, खस्ता- काळजी/ संकट/ त्रास/ श्रम. साबण हा शब्दही फारसीच (साबून) पण तुकाराम महाराजांच्या ‘नाही निर्मळ जीवन। काय करील साबण ॥’ या सुभाषितात तो आलाच आहे की!

अंजीर, बदाम, किसमिस, तुती, कुल्फी या अरबी- फारसी शब्दांना प्रतिशब्द शोधून ते अट्टहासाने रुजवणे, हे काही खरे नाही. साबण, खास, सुरमा, अत्तर (इत्र), सरदार, सरकार, किल्ला हे अरबी- फारसी शब्द मराठीने इतके आपलेसे केले की त्यांना अर्धचंद्र देणे अशक्य!

– डॉ. निधी पटवर्धन
nidheepatwardhan@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# चहा, कॉफी आणि कोको

**‘चहा’ म्हणजे** अस्सल मराठी आणि ‘टी’ इंग्रजी असे आपण मानतो. प्रत्यक्षात हे दोन्ही शब्द चायनीज आहेत! चिनी मँडरिन लिपीत चहा शब्द ज्या चिन्हाने व्यक्त होतो त्या चिन्हाचा उच्चार ‘चा’ असा होतो, पण अन्य काही चायनीज लिपींमध्ये त्याचा उच्चार ‘टे’ असा होतो. चीनच्या राजधानीला पूर्वी पेकिंग म्हणत पण आता बीजिंग म्हणतात तसाच काहीसा हा उच्चारभेद. पुढे इंग्लिश व्यापाऱ्यांनी चहा जगभर नेला. काही देशांत त्याचा उच्चार ‘टे’ असा तर काही देशांत ‘चा’ असा केला गेला. इंग्लंडमध्ये पुढे ‘टे’चा उच्चार ‘टी’ झाला, पण अनेक युरोपीय देशांत अजूनही ‘टे’ हेच रूप आहे.

सतीची प्रथा ज्याने बंद केली त्याच लॉर्ड बेंन्टिकने भारतात १८३४ मध्ये चहाची लागवड सुरू केली. भारतात त्यासाठी ‘चा’ हे रूप रूढ झाले. पुढे त्याचेच चा, चहा, चाय असे उच्चारभेद रूढ झाले. रशियामध्ये त्याला ‘चा’ असेच म्हणतात. अर्थात नावाची व्युत्पत्ती किंवा उच्चार काहीही असो, बहुतेकांचा दिवस सुरू होतो चहाच्या कपानेच!

कॉफी ॲबिसिनिया (आताच्या इथिओपिया) देशातील काफ्फा नावाच्या गावातील. भारतात सोळाव्या शतकात मक्केहून यात्रा करून परतणाऱ्या बाबा बुदान नावाच्या मुस्लीम फकिराने कॉफीच्या



बिया प्रथम कर्नाटकात आणल्या. पुढे कॉफी भारतभर पसरली. अरबी व्यापाऱ्यांनी सोळाव्या शतकातच कॉफी युरोपात नेली. पुढे स्टारबक्स आणि नेसले यांनी कॉफी हे जगातील सर्वाधिक लोकप्रिय पेय बनवले. कोको हा प्रकार दक्षिण अमेरिकेतल्या ॲझटेक संस्कृतीतून आला. ‘काकाओ’ हे त्याचे मूळ नाव. कोकोच्या बिया दळून, त्यात पाणी घालून तयार होणारे एक फेसाळ पेय तिथे आवडीने पीत. मेक्सिकन भाषेत त्याला ‘चॉकोअट्ल’ म्हणत; ‘चॉको’ म्हणजे फेस आणि ‘अट्ल’ म्हणजे पाणी. ‘चॉकोअट्ल’चे स्पॅनिश लोकांनी ‘चॉकोलेट’ केले. जॉन कॅडबरी यांनी १८२४ साली ब्रिटनमध्ये याच बियांचे घट्ट तेल काढून (कोको बटर), त्यात दूध व साखर घालून, त्या मिश्रणाच्या वड्या आजच्या चॉकलेट स्वरूपात तयार केल्या. चॉकलेट जगभर नेण्याचे श्रेय त्यांचे. त्याच कंपनीने पुढे मूळच्या पेयाच्या स्वरूपात ‘ड्रिंकिंग चॉकलेट’ सुरू करून एक वर्तुळ पूर्ण केले.

– भानू काळे
bhanukale@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# गाणे सुरात गावे, तसे भाषासौंदर्य व्याकरणात जपावे...

**आज मराठी** भाषा बोलणाऱ्या सुशिक्षितांच्या वाक्यांत होणारे काही अपप्रयोग आपण विचारात घेणार आहोत. असे प्रयोग केव्हा केव्हा लिखाणातही आढळतात.

हे वाक्य वाचा - तो म्हणाला, 'मी काल संध्याकाळी तुझ्या घरी आलेलो, पण तू घरी नव्हतास.'

अशीच एक चुकीची वाक्यरचना- ती मला म्हणाली, 'मी तुझ्याबरोबर चार दिवसांपूर्वी मैत्रिणीकडे गेलेली, तू कशी विसरलीस?'

पुढील वाक्यांत थोडी वेगळी, पण चुकीचीच वाक्यरचना अनेकदा आपल्या कानावर पडते. वाचायलाही मिळते.-

ती म्हणाली, 'काल संध्याकाळी कितीतरी वेळ दारातच मी विचार करत बसली होती.' किंवा 'मी काल नाटक पाहायला गेली होती.'

या सर्व वाक्यांत क्रियापदाची रूपे आहेत- '(मी) आलेलो,' 'मी गेलेली,' 'मी बसली होती,' 'मी गेली होती.'

धातू आहेत- येणे+हो, जाणे+हो, बसणे+हो- यांची बिनचूक रूपे आहेत. (पु.) मी आलो होतो, मी गेले होते, मी बसले होते, मी गेले होते.- ही भूतकाळी रूपे आहेत.

वरील वाक्यांतील अधोरेखित शब्द हे अपप्रयोग आहेत. योग्य रूपे आहेत- 'मी आलो होतो,' 'मी गेले होते,' 'मी बसले होते' आणि 'मी गेले होते.' *आलेलो, गेलेली, 'मी बसली होती', 'गेली होती'* अशी क्रियापदाची रूपे होत नाहीत. अनेकदा भाषेच्या योग्य स्वरूपाकडे आपले दुर्लक्ष होते. त्यामुळे भाषेत उपलब्ध नसलेली अशी चुकीचे रूपे आपण बेधडक योजतो.

आणखी एक अपप्रयोग ऐकायला मिळाला- ''तो त्याच्या मित्राला म्हणाला, 'तू ते मला आवडणारे गाणे बोल ना. तू गाणे छान बोलतोस.'' या वाक्यांत 'गाणे बोलणे' हा चुकीचा प्रयोग आहे. रुढ शब्द- गाणे - *गा* किंवा गाणे- *म्हण*, गाणे- *गातोस* अशी क्रियापदे योजणे इष्ट आहे. मराठीत मान्य नसलेले असे चुकीचे प्रयोग मराठी भाषकांनी प्रयत्नपूर्वक टाळावेत. मराठी भाषेचे सौंदर्य जोपासणे, तिचे रक्षण करणे, अपप्रयोग टाळणे हे आपले कर्तव्य आहे, हे वेगळे सांगण्याची आवश्यकता नाही.

**-यास्मिन शेख**





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# सुजले भूत कोडवाळ्यास राजी

**एखाद्या व्यक्तीला** जर भूतबाधा झाली तर त्याचे भूत उतरवण्यासाठी त्याच्या आवडीची किंवा तो मागणी करीत असलेली वस्तू त्याच्यावरून उतरवून टाकण्यात येते. अशा वेळी ते भूत कशाची मागणी करेल आणि ती मागणी आपल्याला पूर्ण करता येईल की नाही याबद्दल आपल्या मनात जरा भीती असते. पण ते भूत भुकेने फारच व्याकुळले असेल तर अगदी साधी गोष्ट मागूनही मोकळे होते. आणि आपल्याला एक सुखद धक्का बसतो.

कोडवाळ म्हणजे कडबोळे. समजा त्याची क्षुधा कडबोळे देऊनच भागली तर? तर किती सुटका झाल्यासारखे वाटत असेल, असा या म्हणीचा भावार्थ आहे. रमाने स्वतःचे लग्न स्वतःच ठरवले होते. त्यामुळे घरच्या लोकांनी सुटकेचा निःश्वास सोडला होता. म्हणजे चारपाच घरांचे उंबरठे झिजवा आणि तिच्यासाठी नवरा शोधा हा व्याप आता करायला लागणार नाही या विचाराने तिचे आई-वडील सुखावले होते.

त्याच्या घरची परिस्थिती तर खूपच चांगली होती. पण लग्नाची बोलणी कशी होतील? त्यांच्या मागण्या अव्वाच्या सव्वा असतील तर आपल्याच्याने निभावेल ना? या विवंचनेत असतानाच मुलाच्या वडिलांचे शब्द कानी आले, 'रमाचे बाबा! आम्हाला तुमची मुलगी, रमा खूप



आवडली आहे बरं का! ती आमच्या घरात सुख, समाधान आणि शांती आणेल. खात्री आहे मला. अहो!

लग्नाची बोलणी, देणे घेणे, असले काही बोलायचे नाही आम्हाला. फक्त एक नारळ आणि तुमची मुलगी सन्मानाने मागायला आम्ही आलो आहोत. दुसरे आम्हाला काही नको.' सर्वचजण त्यांचे बोलणे ऐकून थक्कच झाले. काय बोलावे कळेना. बैठकीची बोलणी अशाप्रकारे सुखासमाधानात झाली. सगळे परतल्यावर रमाची आजी सगळ्यांना म्हणाली, 'बघा! झालं ना सगळं व्यवस्थित?

उगाचच काळजी करत होतात. म्हणतात ना, सुजले भूत आणि कोंडवाळ्यास राजी तशातली गत!'

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचार : स्थळ स्वयंपाकघर

**जगण्याच्या विविध** अंगांना स्पर्श करणारे वाक्प्रचार स्वयंपाकघरातील वस्तू आणि पदार्थांच्या पाककृती यांना कसे दूर ठेवतील? दैनंदिन जीवनाशी वाक्प्रचार कसे सलगी करतात, ते या निमित्ताने नेमके लक्षात येते.

कणीक तिंबणे, याचा शब्दशः अर्थ आहे, पोळी करण्यासाठी भिजवलेली कणीक खूप मळून मऊ करणे. या वाक्प्रचाराचा अर्थ एखाद्यास खूप मारझोड करणे, मारून वठणीवर आणणे, असा होतो.

पापड वाकडा होणे- हा वाक्प्रचारही स्वयंपाकघरातील दृश्य डोळ्यासमोर उभे करणारा आहे. पापड तळल्यावर आच लागल्यामुळे वाकडा होतो. ही प्रक्रिया यामागे गृहीत आहे. त्यामुळे पापड वाकडा होणे म्हणजे क्षुल्लक कारणावरून रुसणे.

बोळ्याने दूध पिणे- हा वाक्प्रचार समजून घ्यायला हवा. एखाद्या लहान बाळाला आईचे दूध ओढून घेता येत नसेल, तर दुधात बोळा भिजवून त्याच्या तोंडात थेंब थेंब दूध घालावे लागते. याचा अर्थ 'बालबुद्धीचा असणे' असा लक्षणेने होतो. 'तुमची कारस्थाने न कळायला आम्ही काही बोळ्याने दूध पीत नाही !' असे वाक्य भांडणात कधीतरी कानी पडलेले असते.

नारळ हाती देणे म्हणजे निरोप देणे, हाकलणे.



येथे एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे; एखाद्याचा सन्मान करण्यात येतो, तेव्हा त्याला शाल आणि श्रीफळ देतात. तेव्हा नारळाला 'श्रीफळ' (कारण देवाच्या प्रसादासाठी नारळ वापरतात!) म्हणून गौरवले जाते. मात्र जेव्हा एखाद्याला कामावरून काढून टाकायचे असते, तेव्हा नारळासाठी अशा अलंकारिक शब्दाची गरज नसते. तेथे रोखठोक मामला असतो! हा भाषेतला सूक्ष्म बारकावा लक्षात घेण्याजोगा आहे.

विरजण घालणे हा वाक्प्रचार दुधाला विरजण लावून दही करण्याच्या प्रक्रियेची आठवण करून देतो. त्याचा लक्ष्यार्थ आहे, अडथळा आणणे. उदा. पावसात भिजण्याचा छोट्यांच्या उत्साहावर नसती कारणे देत विरजण घालण्यात मोठ्यांना काय आनंद मिळतो, कोण जाणे!

याव्यतिरिक्त नाकाला मिरची झोंबणे (बोलणे वर्मी लागणे), चमचेगिरी करणे (ढवळाढवळ करणे), डाळ न शिजणे (निरुपाय होणे) असे वाक्प्रचारही स्वयंपाकघरात जणू 'शिजले' आहेत!

– डॉ. नीलिमा गुंडी.
nmgundi@gmail.com

# शब्द 'सिद्धी'

**'परोक्ष' आणि** 'अपरोक्ष' या दोन शब्दांचा आपण सध्या घेत असलेला अर्थ हा मूळ अर्थाच्या बरोबर विरुद्ध आहे किंवा पूर्वी 'देखणा' या शब्दाचा अर्थ सध्याच्या 'डोळस' सारखा होता आणि 'डोळस' चा अर्थ सध्याच्या 'देखणा' सारखा होता, अशा काही भाषिक गंमतकथा तुम्ही ऐकल्या असतील. पूर्वीच्या काळची 'टीका' ही आजच्यासारखी 'टीका' करणारी नव्हती, हे समजल्यावर तुम्ही आजच्या टीकाकारांनाही माफच करून टाकाल.

अशावेळी मनात एक विचार नक्की येतो, की खरंच कसे तयार होत असतील हे शब्द आणि ठरत आणि बदलत असतील हे अर्थ! दगडाला दगड का म्हणायचं आणि झाडाला झाडच का? मनुष्य आणि मानव हे समानार्थी शब्द असले तरी 'समोरून एक मनुष्य येत होता' या वाक्यात आपण मानव हा शब्द का वापरत नाही?

शब्द आणि त्याचा अर्थ याबाबत कृ. पां. कुलकर्णी म्हणतात, 'मानवाच्या हातून आपाततः आणि प्रसंगाच्या जरुरीप्रमाणे नामकरण झाले आणि त्याला समाजातील इतरांची मान्यता मिळाली. अशा तऱ्हेने या संकेतांच्या खुणा म्हणून शब्द रूढ झाले. शब्द ही प्रतीके आहेत. संकेत हा शब्दाचा मुख्य आधार आहे. संकेत शाबूत तोपर्यंत शब्द शाबूत.



संकेत नष्ट झाला की शब्द मरतो.' शब्दाचं रूढ होणं समजून घेताना या संकेताचं रूढ होणं खूप महत्त्वाचं आहे. त्याचमुळे एखादा शब्द मग तो कोणत्याही भाषेतला का असेना, का स्वीकारला जातो, एखादा का नाकारला जातो याचं कारण त्यातून निर्माण होणाऱ्या संकेतावर ठरतं. समाजमन तो संकेत स्वीकारतं की नाही आणि कोणत्या अर्थाने स्वीकारतं यावर तो शब्द रूढ होणं अवलंबून राहतं. काळानुसार समाज बदलला आणि तो संकेत पटेनासा झाला किंवा त्याची गरज उरली नाही की हलकेच एकेकाळी स्वीकारलेला तो शब्दही पुन्हा मागे पडतो.

शब्द कसा तयार होतो, ते पाहणे म्हणजेच शब्दसिद्धी. पण शब्द साधण्याबरोबर जेव्हा त्याला समाजमनाकडून संकेताच्या पसंतीची 'सिद्धी' प्राप्त होते, तेव्हाच खऱ्या अर्थाने शब्दसिद्धी झाली असं म्हणता येईल.

– वैशाली पेंडसे- कार्लेकर
vaishali.karlekar1@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# इंग्रजी शब्दांचे मराठीकरण

**इंग्लंडमध्ये प्रचलित** असलेल्या अनेक आधुनिक संकल्पना, प्रक्रिया किंवा वस्तू जेव्हा आपल्याकडे आल्या तेव्हा त्यांना मराठी प्रतिशब्द शोधायचा प्रयत्न केला गेला. सावरकरांसारख्या प्रतिभावंतांनी उत्तम प्रतिशब्द शोधलेदेखील. उदाहरणार्थ, नगरसेवक, महापौर, दिग्दर्शक, छायाचित्रण, ध्वनिमुद्रण इत्यादी. अर्थात असे मराठी प्रतिशब्द प्रत्येक वेळी व्यवहार्य ठरले असे नाही. स्टेशनसाठी 'अग्निरथविश्रामस्थान' वा रुळांसाठी 'लोहपट्टी' हे प्रतिशब्द समाजाने कधीच स्वीकारले नाहीत.

एक किस्सा- मराठीचे एक अतिअभिमानी प्राध्यापक सर्व इंग्रजी शब्द कटाक्षाने टाळत. एकदा त्यांच्या मोटारीचा टायर पंक्चर झाला. त्याचवेळी शेजारून चाललेल्या एका शेतकऱ्याने चौकशी केली असता प्राध्यापक उत्तरले, 'माझ्या स्वयंवाहिकेच्या वायुवाहक नलिकेचे छिद्रीकरण होऊन अंतर्गत वायूचे बहिर्गमन झाले आहे.' गोंधळलेल्या शेतकऱ्याने ड्रायव्हरकडे चौकशी केल्यावर 'काही नाही, टायर पंक्चर!' असे तो म्हणाला. यावर तो शेतकरी प्राध्यापकांकडे वळून म्हणतो, 'साहेब, असं शुद्ध मराठी येत नाही का तुम्हाला?' कधी कधी ते इंग्रजी शब्द आपण जसेच्या तसे किंवा अगदी किरकोळ बदल करून मराठीत समाविष्ट केले. पोस्टर, कॅमेरा, फर्निचर,



रजिस्टर, फाइल, टेप, पोस्टमन, मनीऑर्डर, पोस्टकार्ड, पोस्ट मास्टर, पाकीट, तिकीट, स्कूटर, टायर, ब्रेक, कार, गॅरेज, बेसिन, पाइप, प्लेट, स्टँड, सिग्नल, कंपनी, सोफासेट, कप्तान इत्यादी.

कधी-कधी इंग्रजी शब्दांचा शब्दशः अनुवादच केला गेला आणि मग तेच नवे शब्द मराठीत रूढ झाले. उदाहरणार्थ, 'गोल्डन चान्स' आपल्याकडे 'सुवर्णसंधी' झाला किंवा 'गोल्ड बॉन्ड' हे सुवर्णरोखे झाले. 'ब्लॅक मनी'ला आपण 'काळा पैसा' म्हणू लागलो. 'रेकॉर्ड ब्रेक'चे 'उच्चांक मोडणे' झाले. 'व्हाईट पेपर' हा सरकारी अहवाल आपल्याकडे 'श्वेतपत्रिका' म्हणून रूढ झाला. सत्य सामान्यतः कुठल्याही एका टोकाला नसते, दोन परस्परविरोधी टोकांच्या मध्यावर कुठेतरी ते असते. तो मध्य गाठून आपले विचार संतुलित ठेवावेत, हा 'ब्रिटिश जंटलमन'चा एक पारंपरिक आदर्श. त्याला त्यांनी 'गोल्डन मीन' म्हटले. आपण त्याची पार्श्वभूमी फारशी विचारात न घेता त्यासाठी 'सुवर्णमध्य' हा शब्द तेवढा शोधला. अर्थात अशा शाब्दिक अनुवादातूनही भाषा समृद्ध होतच असते.

– भानू काळे
bhanukale@gmail.com

लोकसत्ता Fri, 05 August 2022
https://epaper.loksatta.com/c/69578966



# सर्वनामांच्या योजनेतूनही अर्थ बदलू शकतो...

'**सुहास आपल्या** मित्राबरोबर बराच वेळ गप्पा मारत होता. त्यानंतर सुहास *त्याच्या* घरी गेला. सुहासची आई त्याची वाटच पाहत होती.'

या वाक्यांत 'सुहास *त्याच्या* घरी गेला.' या वाक्यात '*त्याच्या* घरी गेला' या वाक्यरचनेत अधोरेखित शब्दाच्या अर्थामध्ये थोडा गोंधळ जाणवतो. सुहास 'त्याच्या' म्हणजे 'मित्राच्या घरी गेला' असा अर्थ होईल; पण तो मित्राच्या घरी गेला नसून स्वत:च्या घरी गेला किंवा सुहास आपल्या घरी गेला, असे या वाक्यात सांगायचे आहे. 'सुहासची आई त्याची वाटच पाहत होती.' या वाक्यावरून 'तो आपल्या घरी गेला' असेच निश्चितपणे म्हणायचे आहे. मात्र 'त्याच्या घरी गेला' याचा अर्थ ज्याच्याशी तो गप्पा मारत होता, त्या मित्राच्या घरी तो गेला, असा चुकीचा अर्थ या वाक्यरचनेतून ध्वनित होतो. वाक्यात काही शब्दांची योजना चुकीची झाली, तर अर्थ समजण्यास कठीण जाते, याचे भान भाषेचा उपयोग करणाऱ्यांनी अवश्य ठेवले पाहिजे.

आणखी एक वाक्य लोकांच्या तोंडी अलीकडे ऐकू आले. ते वाक्य-

'मीना आणि उषा या मैत्रिणी आहेत. मीना तिच्या नवऱ्याशी हुज्जत घालते, हे उषाच्या अलीकडेच लक्षात आले.' या वाक्यात 'मीना *तिच्या* नवऱ्याशी हुज्जत घालते' या वाक्याचा अर्थ 'मीना उषाच्या नवऱ्याशी हुज्जत घालते' असा होईल. 'मीना आपल्या स्वत:च्या...' असे वाक्य अर्थाच्या दृष्टीने अधिक योग्य होईल.

## अक्षरांत की अक्षरान्त?

तज्ज्ञांच्या समितीने ठरवलेल्या शासनमान्य नियमांत अनुस्वार शब्दातील कोणत्या अक्षरावर द्यावेत किंवा देऊ नयेत या संदर्भात 'नियम १' असा आहे- 'स्पष्टोच्चारित अनुनासिकाबद्दल शीर्षबिंदू द्यावा.'

या नियमाला काही शब्दांचे अपवाद आहेत- उदाहरणार्थ- सुखांत (अनेक सुखांमध्ये)- सुखान्त (ज्याचा शेवट सुखपूर्ण आहे असे)

तसेच

दुखांत - *दु:खान्त*,

देहांत - *देहान्त* (शिक्षा),

स्वरांत - स्वरान्त (ज्याच्या शेवटी स्वर आहे असा शब्द)

व्यजनांत - व्यजनान्त (ज्याच्या शेवटी व्यंजन आहे असा शब्द)

शाळांत (अनेक शाळां(/ळां)त) - *शालान्त* (शाळेतील शेवटची परीक्षा)

**-यास्मिन शेख**





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# स्नान करून पुण्य घडे, तर पाण्यात बेडूक थोडे?

**आपला देश** म्हणजे मनात श्रद्धाअंधश्रद्धांचे उदंड पीक उपजवणारा देश आहे. किती प्रकारच्या श्रद्धा-अंधश्रद्धांचा खेळ आपल्या मनात सुरू असतो नाही का? म्हणजे घरातून बाहेर पडताना उजवा पाय आधी टाकावा, बाहेर जाताना 'जातो' नाही तर 'येतो' म्हणावे किंवा चालताना मांजर आडवी गेली तर नियोजित काम होत नाही, असे अनेक समज असतात. आपल्याकडे तर एक म्हणच आहे ना? 'तीन तिघाडा आणि काम बिघाडा' म्हणून एखादे काम करायला जात असाल तर तिघांनी जाऊ नये असे म्हणतात. 'डावा डोळा लवणे' या संकल्पनेवरून तर अनेक गाणीही रचली गेली आहेत. अमुक केल्याने पुण्य मिळते आणि तमुक केल्याने आपण पापाचे धनी होतो अशा एक ना दोन हजार श्रद्धा-अंधश्रद्धांच्या कल्पना आपण उराशी बाळगतो. या सर्व कल्पनांसह सुख मिळेल या आशेने मार्गक्रमण करत राहतो.

अशीच एक संकल्पना म्हणजे तीर्थक्षेत्री जाऊन, तिथल्या पवित्र नदीत स्नान करणे. त्यामुळे पुण्य लाभते, पाप धुऊन निघते अशी अनेकांची श्रद्धा असते. फक्त हल्लीच्या काळात नदीच पवित्र आहे की नाही हा मोठा प्रश्न आहे. त्या नदीत उभे राहायचे आणि एक डुबकी मारायची म्हणजे



आपले डोळे बंदच असले पाहिजेत आणि मनही श्रद्धेने तुडुंब भारलेले असले पाहिजे. याच कटू सत्यावर प्रकाश टाकणारी एक म्हण म्हणजे 'स्नान करून पुण्य घडे, तर पाण्यात बेडूक थोडे?' एक क्षण डुबकी मारून जर इतकी पुण्यप्राप्ती होत असेल तर नदीत अहोरात्र राहणाऱ्या त्या बेडकाला किती पुण्य लाभत असेल, त्याची कल्पनाच केलेली बरी! आणि खरे म्हणजे नदीत एक डुबकी मारल्याने असे काय पुण्य प्राप्त होणार? त्यापेक्षा चांगले कृत्य हातून घडल्यानेच पुण्यप्राप्ती होईल! असा या म्हणीचा मथितार्थ.

– डॉ. माधवी वैद्य

madhavivaidya@ymail.com

लोकसत्ता Tue, 09 August 2022
https://epaper.loksatta.com/c/69639498

भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचार शीर्षस्थानी विराजमान

**समाजमनात वाक्प्रचार** घर करून असतात. त्यामुळे विविध साहित्यकृतींच्या शीर्षस्थानी वाक्प्रचार मानाने विराजमान झालेले दिसतात. त्याची ही काही उदाहरणे आहेत.

'सुदाम्याचे पोहे' हा वाक्प्रचार एका पुराणकथेवर आधारित आहे. श्रीकृष्णाचा बालमित्र सुदामा द्वारकाधीश झालेल्या आपल्या मित्राला भेटायला गेला, तेव्हा त्याने आपल्या ऐपतीनुसार कृष्णाला पोह्यांची पुरचुंडी भेट दिली. श्रीकृष्णानेही ती भेट आनंदाने स्वीकारली. त्यातून त्यांच्या मैत्रीतील सच्चेपणा व्यक्त झाला. त्यामुळे या वाक्प्रचाराचा अर्थ होतो, प्रेमाने दिलेली साधीशी भेट. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनी आपल्या एका पुस्तकाचे नाव ठेवले 'सुदाम्याचे पोहे'. त्यातून लेखकाचा विनय आणि हृद्य भाव व्यक्त झाला आहे. 'एरंडाचे गुऱ्हाळ' या वाक्प्रचाराचा अर्थ आहे, वायफळ उद्योग. उसापासून गोड रस काढण्याचे काम गुऱ्हाळात होते. मात्र एरंड उसासारखा उंच असला, तरी त्याच्यापासून तसा रस निघत नाही! म्हणून चिं. वि. जोशी यांनी आपल्या विनोदी कथासंग्रहाचे नाव 'एरंडाचे गुऱ्हाळ' असे ठेवून विनोद साधला आहे.

'खोगीरभरती' हाही एक वाक्प्रचार आहे. खोगीर म्हणजे घोड्यावर घालावयाचे कापडी किंवा चामड्याचे जीन होय. खोगीर मऊ व फुगीर व्हावे, म्हणून त्यात चिंध्यांसारख्या निरुपयोगी वस्तू भरतात. त्यामुळे खोगीरभरती या वाक्प्रचाराचा अर्थ होतो कुचकामी गोष्टी. पु. ल. देशपांडे यांनी आपल्या एका विनोदी लेखसंग्रहाचे शीर्षक 'खोगीरभरती' असे ठेवले आहे. असे शीर्षक देऊन त्यांनी स्वतःचीच जणू खिल्ली उडवली आहे! नाहीतरी विनोद हा विषय एकेकाळी आपल्याकडे फारसा प्रतिष्ठेचा नव्हताच, त्यामुळे त्यांनी मुद्दामही तसे शीर्षक दिले असावे!




'बारा गावचे पाणी पिणे' या वाक्प्रचाराचा अर्थ आहे, अनुभवसंपन्न होणे. वसंत बापट यांनी आपल्या प्रवास- वर्णनाला 'बारा गावचं पाणी' हे नाव दिले आहे. त्यातून कोणतेही पाणी पचविण्याची रग आणि व्यापक अनुभवविश्व हे लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाचे पैलू लक्षात येतात.

आणखीही अशी चपखल शीर्षके आठवतील; त्यातील वाक्प्रचार समाजमनाला आवाहन करण्यात यशस्वी ठरलेले दिसतात.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com

भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# तद्भवाचे तटी...

'**आपलं चायनीज** काही खरं नाही, ते तर भारतीय चवीनुसार हवं तसं बनवून घेतलेलं आहे', चीनला आठ वर्षे राहून आलेली स्नेही सर्वांना सांगत होती, 'खरे सॉस हवे असतील तर व्यापारी दुव्यांवर उपलब्ध आहेत, थोडे महाग आहेत.'- अधिकृत चायनीज येते असे वाटून ती उद्गारली. सॉसला पर्यायी शब्द सुचवा कुणीतरी.

मग वाटले चुकीचे ते काय, आपल्या चवीचे करून माणूस खाऊच शकतो. तसेच परकीय शब्द पण तो हवे तसे बदलून घेतोच की ! आता 'सिचुआन' भागाला आपण 'शेजवान' केलेच की ! इंग्रजीतील कॅम्पला कंपू, कॅप्टनला कप्तान, कॉन्ट्रॅक्टला कंत्राट, केटलला किटली, टँकला टाकी, डॅम्ड बीस्टला डँबीस, सॅनिटला सुनीत, मिनिट्स - मिंटं, अशी अपभ्रष्ट म्हणजे 'मूळ स्थानापासून ढळलेल्या' इंग्रजी शब्दांची एक यादी म. अ. करंदीकर यांनी मराठी संशोधन पत्रिकेत दिली होती. याला एका अर्थाने इंग्रजीतून मराठीत आलेले 'तद्भव शब्द' असेही म्हणता येऊ शकते.

मराठीत संस्कृतातून जसेच्या तसे जे शब्द येतात त्यांना 'तत्सम' शब्द अशी संज्ञा आहे. जसे की, देव, कन्या, पुत्र, स्त्री, पुरुष, मंत्र, मोदक, नंदन असे अनेक शब्द तत्सम आहेत.



पण मूळ संस्कृत शब्दांचे परिवर्तन होऊन आलेले 'तद्भव' शब्दही खूप आहेत. जसे कमलचे कमळ झाले, अद्यचे आज झाले, पर्णचे पान झाले, हस्तचा हात झाला, पदचा पाय झाला, चक्राचे चाक झाले, सप्तचे सात झाले, दीपयष्टीची दिवटी झाली, प्रसादचे पसाय झाले, हरिद्रेची हळद झाली, निद्रिस्तचा निद्रित झाला, यंत्रमंत्रचे जंतर-मंतर झाले, उपवासाचा उपास झाला, उत्तलचा उलथा झाला, तिलकची टिकली झाली, दुग्धचे दूध झाले. बरेचदा ही परिवर्तने सुलभीकरणासाठी होतात.

आता मराठी ही संस्कृत- प्राकृत- अपभ्रंश- मराठी अशा परंपरेने सिद्ध झाली आहे. तेव्हा संस्कृत - प्राकृत -अपभ्रंश भाषेतून मराठीने शब्दऋण घेतलेले आहे यात नवल नाही. त्याला ऋण न म्हणता वारसाच म्हणावे लागेल.

– डॉ. निधी पटवर्धन
nidheepatwardhan@gmail.com





pradiprawat55@gmail.com

## भाषासूत्र

कांचन कराई द्वारा संकलित

# पोलीस आणि गुंड



**कायदा आणि** सुव्यवस्था राखण्यासाठी कुठल्याही प्रशासनाचा एक महत्त्वाचा आणि अपरिहार्य भाग म्हणजे पोलीस. 'पोलीस' हा मराठीने पूर्णतः सामावून घेतलेला एक इंग्रजी शब्द. मुळात पोलीस शब्द 'पॉलिस' म्हणजे नगर या ग्रीक शब्दापासून तयार झाला आहे. त्याचा मूळ अर्थ नगरसेवक. आज मात्र कायद्याची अंमलबजावणी हे पोलिसांचे प्रमुख कार्य मानले जाते. शिपाई (मूळ अरबी रूप - सिपाई) हा शब्दही त्याऐवजी कधी कधी योजला जातो; पण पोलीस शब्दातील नेमकी छटा त्यात येत नाही. त्यामुळे पोलीस हाच शब्द आज मराठीने आणि इतरही बहुतेक भाषांनी आपला म्हणून स्वीकारला आहे.

सर रॉबर्ट पील यांनी लंडनमध्ये १८२९ साली पहिली पद्धतशीर पोलीस यंत्रणा उभारली आणि आजही ती आदर्श मानली जाते. त्यांच्या नावावरूनच इंग्लंडमध्ये पोलिसांना 'बॉबी' म्हणायची प्रथा रूढ झाली. कारण इंग्लिशमध्ये 'बॉबी' हे रॉबर्टचे लघुरूप आहे. जसे की टेड (एडवर्डचे लघुरूप), बिल (विलियमचे लघुरूप), जिम (जेम्सचे लघुरूप), बेन (बेंजामिनचे लघुरूप), जो (जोसेफचे लघुरूप), माइक (मायकेलचे लघुरूप) इत्यादी.

आज इंग्रजीत तसेच मराठीतही प्रचलित असलेले अनेक शब्द पॉलिस या ग्रीक शब्दापासून तयार झाले आहेत. उदाहरणार्थ, पॉलिसी (धोरण), पॉलिटिक्स (राजकारण), कॉस्मोपॉलिटन (बहुढंगी), मेट्रोपोलीस (महानगर). आपण आयुर्विमा उतरवतो त्यालाही पॉलिसीच म्हणतात.

'गुंड' शब्द मराठीत आला तो हिंदीतील 'गुंडा' या शब्दावरून. पुढे तो जगभर गेला. ऑक्सफर्ड इंग्लिश डिक्शनरीतही 'गुंडा' शब्द १९२० सालापासून समाविष्ट आहे. त्यातूनच पुढे इंग्रजीत 'गून' हा त्याच अर्थाचा शब्द तीसच्या दशकात रूढ झाला. भारतात गुंडांचा बंदोबस्त करण्यासाठी म्हणून जे कायदे आहेत त्यांनाही 'गुंडा ॲक्ट' असे म्हटले गेले आहे. 'गुंडागर्दी', 'गुंडाराज' ही त्याच शब्दाची रूपे. अर्थात प्रत्येक वेळी 'गुंडा' शब्द निंदाव्यजक आहे असे नाही. अनेक घरांत पूर्वी एखाद्या मुलाला प्रेमाने 'गुंड्या' म्हणून हाक मारली जाई. चिमणराव-गुंड्याभाऊ ही निरागस जोडी चिं. वि. जोशींनी अमर केली आहे. 'पुत्र व्हावा ऐसा गुंडा, ज्याचा तिन्ही लोकी झेंडा' या संतवचनात 'गुंडा' शब्दाचा अर्थ कर्तबगार असाच आहे.

– भानू काळे
bhanukale@gmail.com





# शब्दयोजनेतून अर्थाची पेटी उघडावी...

**वाक्यांत योजलेल्या** शब्दांची योग्य जागा बदलली, तर नीटसा अर्थ लक्षात येत नाही. अनेकदा बोलताना व लिखाण करताना शब्दयोजनेबद्दल काहीजण बेफिकीर असतात. मराठी भाषकांनी लेखनात मात्र शब्दांची योग्य जागी योजना करणे आवश्यक आहे. आता पुढील वाक्य वाचा -' *अचानक* लोखंडी एक बंद केलेली पेटी मला रस्त्यावर पडलेली दिसली.'

ही वाक्यरचना सदोष आहे. शब्द चुकीच्या स्थानी योजल्यामुळे अर्थ नीटसा लक्षात येत नाही. 'अचानक' हा शब्द 'बंद केलेली पेटी' या संदर्भात आहे, असा ऐकणाऱ्याचा किंवा वाचणाऱ्याचा गों धळ होईल. 'ती लोखंडी पेटी कोणी तरी *अचानक बंद केली*' असा अर्थ शब्दांची अयोग्य ठिकाणी योजना केल्यामुळे होतो. वास्तविक 'अचानक' या शब्दाचा लोखंडी पेटीशी काहीच संबंध नाही. 'रस्त्यावर पडलेली पेटी मला अचानक दिसली.' अशी वाक्यरचना योग्य होईल. म्हणजे ती पेटी कोणी अचानक बंद केली नसून 'मला अचानक दिसली' असे या वाक्यात सूचित करायचे आहे.

दुसरी चूक 'लोखंडी एक बंद केलेली पेटी' या वाक्यरचनेत आहे. 'लोखंडी' हे विशेषण 'पेटी' या नामाचे आहे. निर्दोष शब्दयोजना अशी हवी.-'एक बंद केलेली लोखंडी पेटी' किंवा 'बंद केलेली एक



लोखंडी पेटी'. त्यामुळे वरील वाक्य असे हवे- 'रस्त्यावर पडलेली बंद केलेली एक लोखंडी पेटी मला अचानक दिसली.' किंवा 'बंद केलेली एक लोखंडी पेटी रस्त्या वर पडलेली मला अचानक दिसली.'

## 'इक' प्रत्ययानंतरचे बदल...

नामाला 'इक' प्रत्यय लागून होणारे काही तत्सम शब्द- (१) संकेत- सांकेतिक, शब्द- शाब्दिक, व्यवसाय- व्यावसायिक, अलंकार-आलंकारिक

(२) विचार- वैचारिक, विवाह- वैवाहिक, इतिहास- ऐतिहासिक

(३) उपचार- औपचारिक, बुद्धी- बौद्धिक, कुटुंब- कौटुंबिक

या शब्दांचे निरीक्षण केल्यास लक्षात येईल की 'इक' प्रत्यय लागल्यास त्या शब्दातील पहिल्या अक्षरात बदल होतो. तो असा-

अ चा **आ** - उदा. सं, अ - सांकेतिक, आलंकारिक इ.

उ चा **औ** - उदा. बु, कु - बौद्धिक, कौटुंबिक इ.

इ चा **ऐ** - उदा. वि, इ - वैवाहिक, ऐतिहासिक इ.

**- यास्मिन शेख**

# हातात मुदी सोन्याची, घरात बोंब दाण्याची

**काही लोकांना** आपल्या श्रीमंतीचा पोकळ दिमाख मिरवण्याची फार हौस असते. मनाच्या श्रीमंतीपेक्षा दागिन्यांची श्रीमंती मिरवणे त्यांना फारच आवडते. अशा प्रकारे जगणारे आपल्याभोवती, आपल्या समाजात भरपूर दिसतात. त्यांच्या दोन्ही हातात अंगठ्या असतात. कडक इस्त्रीचे झोकदार कपडे ते परिधान करतात. हातात दणदणीत सोन्याचे कडे असते. गळ्यात जाडजूड सोनसाखळ्या असतात. पण त्या मानाने घरात दाणा- वैरण बेताचीच आणि तसे पैशाचे पाठबळही बेताचेच असते. हा

खोटा दिमाख खरा वाटावा यासाठीच त्यांची सगळी खटपट सुरू असते. त्यांच्यासाठी ही म्हण आहे.

आमच्या शेजारी बापूसाहेब रहायचे. जेव्हा संस्थाने विलीन झाली नव्हती तेव्हा त्यांचे पणजोबा, खापर पणजोबा कोणत्या तरी संस्थानाचे म्हणे दिवाण होते. त्यांचे ते पद संस्थानाच्या विलीनीकरणाबरोबरच लयाला गेले होते पण बापूसाहेब अजूनही ते पद

मिरवीतच होते. त्यांच्या डोक्यातील स्वतःची एके काळची प्रतिष्ठा, मानमरातब विसरायला त्यांचे मन काही तयार नव्हते. त्याच संस्थानिकी खाक्याच्या खुणा ते अगदी वर्तमानातही मिरवीत होते. घरात पैशांचा खडखडाट असताना त्यांच्या हातातील एकही अंगठी कमी झालेली नव्हती. घरात तसे खाण्यापिण्याचेही फाकेच पडत असत. हा सगळा



राहण्याचा, वावरण्याचा पोकळ डामडौल सांभाळताना त्यांच्या पत्नीच्या नाकीनऊ येत असत. पण काय करते बिचारी? त्यांना समजावण्याचे सगळे प्रयत्न फोल गेले होते. काही लोक त्यांच्या या श्रीमंतीकडे बघून फसत असत आणि त्यांच्या बाह्य अवताराला भुलून त्यांच्यकडे देणगी वगैरे मागायला जात. पण पदरात काहीही न पडता हात हलवत परत येत. त्यांच्या आजूबाजूचे लोक त्यांच्या अशा वागण्याला हसत असत, नावे ठेवत. ते म्हणत असत, 'हातात मुदी सोन्याची, घरात बोंब दाण्याची.' जो स्वतःच आर्थिक विवंचनेत आहे, तो दुसऱ्याला काय मदत करणार?

- डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com

भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचार आणि व्यक्तिरेखा

**काही वाक्प्रचार** विशिष्ट व्यक्तिरेखांच्या संदर्भात असतात. त्या व्यक्ती प्रत्यक्षातील असतात किंवा कधीकधी पुराणकथांमधीलही असतात. त्याची काही उदाहरणे पाहू या.

भगीरथ प्रयत्न करणे या वाक्प्रचाराचा अर्थ आहे, परिश्रम व चिकाटी यांच्या साहाय्याने लोकविलक्षण काम पूर्ण करणे. यात भगीरथाच्या जीवनकार्याचा थेट संदर्भ आहे. भगीरथ हा ईक्ष्वाकु वंशातील राजा होता. त्याने दीर्घ तपश्चर्या करून स्वर्गातील गंगा पृथ्वीतलावर आणली होती. आज आपण हा वाक्प्रचार वापरताना म्हणतो, की शिक्षणाची गंगा आपल्या समाजात तळागाळातील लोकांपर्यंत पोहोचवण्यासाठी महात्मा फुले यांनी अक्षरशः भगीरथ प्रयत्न केले .

त्रिशंकू होणे म्हणजे ना धड इकडे, ना धड तिकडे अशी स्थिती निर्माण होणे. यातील त्रिशंकूविषयी पुराणात गोष्ट आहे. त्रिशंकू राजा सदेह स्वर्गात गेला, तेव्हा देवांनी त्याला खाली लोटून दिले आणि विश्वामित्रांनी त्याला वर चढवण्यासाठी प्रयत्न केले. त्यामुळे तो अधांतरी लोंबकळत राहिला. त्रिशंकू होणे, या वाक्प्रचाराचा अनुभव घेण्यासाठी मुंबईच्या उपनगरी रेल्वेने गर्दीच्या वेळी एकदा प्रवास करून पाहावा !

मल्लिनाथी करणे म्हणजे टीका करणे होय. यात



उल्लेख असलेला मल्लिनाथ चौदाव्या किंवा पंधराव्या शतकात होऊन गेला. कोलाचल मल्लिनाथ हे त्याचे नाव. काव्य, अलंकार, व्याकरण यात तो पारंगत होता. रघुवंश, मेघदूत, कुमारसंभव आदी कालिदासाच्या काव्यांवर त्यांनी केलेली संस्कृतमधील टीका प्रसिद्ध आहे. त्याला टीकाकार म्हणून प्रसिद्धी मिळाल्यामुळे 'मल्लिनाथी' हा शब्द 'टीका' या अर्थीच रूढ झाला ! मात्र हा वाक्प्रचार साधारणतः उपरोधाने वापरला जातो. शेरेबाजी करणे, असा याचा अर्थ लक्षणेने घेतला जातो. उदा. घरात क्रिकेटचा सामना बघताना मल्लिनाथी करण्याचा मोह होत नाही, असा माणूस विरळा असेल !

असे आणखीही वाक्प्रचार आहेत. उदा. भीष्मप्रतिज्ञा करणे (दृढनिश्चय करणे), कर्णाचा अवतार (दानशूर), शकुनिमामा (कपटी), कळीचा नारद (भांडणे लावणारा). अशा प्रकारे काही व्यक्तींच्या स्वभावगुणांमुळे त्यांना प्रतीक म्हणून मान्यता मिळाली आहे आणि त्यातून भाषेत वेगवेगळे वाक्प्रचार रूढ झाले आहेत.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# प्रतिशब्दकर्त्यांची मांदियाळी



**मराठी प्रतिशब्दनिर्मितीच्या** इतिहासात डोकावून पाहिलं, तर आधी छत्रपती शिवाजी महाराजांचा राज्यव्यवहार कोश दिसतो. शासनव्यवहारातील फारसी-अरबी शब्दांऐवजी मराठी शब्दनिर्मितीसाठी महाराजांनी राज्यव्यवहार कोशाची रचना केली होती.

यानंतरचं एक मौलिक कार्य म्हणजे श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांच्या प्रोत्साहनाने तयार झालेला 'श्रीसयाजीशासनकल्पतरू' हा इंग्रजी, गुजराती, मराठी, संस्कृत, उर्दू, फारसी, हिंदी आणि बंगाली अशा आठ भाषांमधील समान शब्द एकापुढे एक दिलेला प्रचंड पृष्ठसंख्येचा कोश. अतिशय अभ्यासपूर्वक केलेल्या या कोशात शब्दाच्या सुगमतेला जास्त महत्त्व दिलं होतं.

नंतर याविषयातली आपल्या डोळ्यासमोर येणारी दोन प्रमुख नावं म्हणजे स्वा. वि. दा. सावरकर आणि डॉ. माधवराव पटवर्धन. सावरकरांच्या प्रभावी भाषाशुद्धी चळवळीला श्री. के. क्षीरसागर यांनी त्या वेळी प्रखर विरोध केला होता. क्षीरसागरांचं 'खरी भाषाशुद्धी आणि तिचे खरे वैरी' हे बडोदे येथे केलेलं भाषण नंतर 'केसरी'तही प्रसिद्ध झालं. या भाषणाला सावरकरांनी दिलेलं उत्तर आणि नंतर सावरकरांच्या 'भाषाशुद्धि' पुस्तकाच्या १९८१ मध्ये प्रसिद्ध झालेल्या आवृत्तीला क्षीरसागर यांनीच लिहिलेली प्रस्तावना यातून आपल्याला काही तत्त्वबोध होण्यासाठी ते सारं मुळातूनच वाचायला हवं. 'भाषाशुद्धि'मध्ये विविध क्षेत्रांतील अंदाजे ६०० शब्दांची यादी आहे. पटवर्धनांच्या 'भाषाशुद्धि विवेक' या पुस्तकातील 'बहिष्कार्य शब्दांचा कोश' या यादीतील फारसी-अरबीतील बहिष्कार्य आणि पर्यायी असे दोन्ही शब्द आज वापरात दिसतात.

याव्यतिरिक्तही, अभिव्यक्तीसाठी नवशब्दांची निर्मिती करणारे साहित्यिक, समाजमाध्यमांवरील जिज्ञासू शब्दप्रेमी आणि दररोज ही जितीजागती भाषा वापरणारे आपण सगळेच आपापल्या परीने सतत प्रतिशब्द तयार करत असतोच, कधी कोट-बूट वापरून तर कधी 'ठेसनावर टायमात' जाऊन.

शेवटी भाषा वापरणाऱ्या समाजाच्या झोळीत जो तो आपापल्या वकुबानुसार सतत शब्दांचं दान टाकत राहतो. समाज त्यातलं वेचकवेधक आपल्याकडे राखून ठेवतो आणि बाकीचं पुन्हा विखरून टाकतो, कदाचित पुढच्या शब्दवेड्यांसाठी.

**– वैशाली पेंडसे-कार्लेकर**
vaishali.karlekar1@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# अफलातून आणि यवन...

**पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाचा** जनक मानला गेलेला सॉक्रेटिस, त्याचा शिष्य प्लेटो, प्लेटोचा शिष्य ॲरिस्टॉटल आणि नंतर त्याचा शिष्य अलेक्झांडर ही अद्वितीय मानली गेलेली मूळची ग्रीक गुरुपरंपरा आहे. अरबी भाषेत त्यांच्या नावांचे अपभ्रंश रूढ झाले आणि हिंदीच्या माध्यमातून ते भारतातही पसरले. हिंदीत सॉक्रेटिसला 'सुकरात' म्हटले गेले, तर प्लेटोला 'अफलातून', ॲरिस्टॉटलला 'अरस्तू' म्हटले गेले तर अलेक्झांडरला 'सिकंदर' (मराठी पाठभेद 'शिकंदर'.)

'अफलातून' या प्लेटोच्या नामकरणात पूर्वी 'स्वत:ला फार शहाणा समजणारा' असाही एक अर्थ रूढ होता. पण आज मात्र त्या अर्थाने तो शब्द कोणी वापरत नाही. 'भन्नाट' अशा अर्थाने तो शब्द रूढ आहे. त्याच नावाची भरपूर खवा, तूप आणि सुका मेवा घातलेली मिठाईही प्रसिद्ध आहे. मुंबईच्या महंमद अली रोडवरील दोन-तीन प्रख्यात दुकानांतून तिची जगभर निर्यात होते.

'शिकंदर' ऊर्फ अलेक्झांडर या ग्रीक सम्राटाने भारतावर स्वारी करण्यापूर्वी पर्शिया (इराण) हा देश जिंकला होता व पर्शियन भाषेत त्याला इस्कंदर म्हटले गेले. त्याचेच शिकंदर हे अपभ्रष्ट रूप अरबांनी भारतात रूढ केले. एक व्यक्तिनाम असले तरी पर्शियन भाषेत त्याचा अर्थ 'शूर योद्धा' असाही आहे व त्याच अर्थाने तो शब्द भारतीय भाषांतही रूढ झाला. उदाहरणार्थ, 'जो जीता वोही सिकंदर'. 'सिकंदर' नावाचा सोहराब मोदी यांचा १९४१ सालचा पृथ्वीराज कपूर यांची प्रमुख भूमिका असलेला चित्रपट आजही सिनेरसिकांच्या स्मरणात असेल. 'मुकद्दर का सिकंदर' या नावातही 'नियतीला जिंकणारा योद्धा' हा भाव आहे. यवन हा शब्दही मूळ ग्रीकवरून आलेला आहे. आधुनिक ग्रीस देश ज्या अनेक घटक राज्यांच्या एकत्रीकरणातून बनला, त्यातील एक राज्य होते आयोनिया.



शिकंदराच्या स्वारीनंतर त्याच्याबरोबर आलेले आयोनियातील अनेक सैनिक भारतातच राहिले आणि त्यांच्या पुढच्या पिढ्याही नंतरची सुमारे बाराशे वर्षे भारतातच राहिल्या. स्थानिक भारतीयांशी संकर होऊन त्यांची एक विशिष्ट जमात तयार झाली जी दिसायला काहीशी ग्रीक होती. त्यांना 'यवन' म्हणत. यवनांचा संस्कृत नाटकांवर बराच प्रभाव पडला आहे. पुढे 'परकीय' या अर्थाने आणि मुस्लिमांना उद्देशूनही 'यवन' शब्द वापरला जाऊ लागला.

– भानू काळे
bhanukale@gmail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# मत दिले, सांगितले की मांडले?

**पुढील वाक्ये** वाचा-

'त्या संध्याकाळी माझे सर्व मित्र आमच्या घरी आले होते. अनेक विषयांवर चर्चा करून आपली मते आणि बढाई करण्यात सर्वजण अगदी रंगून गेले होते.'

या वाक्यांतील दुसऱ्या वाक्यात 'आपली मते आणि बढाई करण्यात' या वाक्यरचनेत चुका आहेत.

'मत' किंवा 'मते' यानंतर योग्य क्रियापदाचे रूप हवे होते. त्याऐवजी करण्यात हा सदोष प्रयोग होईल. मत किंवा मते मांडणे किंवा मत किंवा मते व्यक्त करणे, आपला अभिप्राय इतरांना पटवून देणे असा शब्दप्रयोग योग्य आहे. 'बढाई करणे' हा शब्दप्रयोग चुकीचाच आहे. 'बढाई किंवा बढाया मारणे' हा शब्दप्रयोग बरोबर आहे.

मत किंवा मते देणे, सांगणे किंवा त्या विशिष्ट विषयावर आपला विचार व्यक्त करणे. हेही वाक्प्रचार मान्य आहेत. बढाई किंवा बढाया मारणे हा योग्य शब्दांचा अर्थ आहे- 'प्रौढी, फुशारकी, आत्मस्तुती' हे बढाई या शब्दाचे अर्थ आहेत. बढाई किंवा बढाया मारणे याचाही अर्थ- स्वतःचा नसता मोठेपणा सांगणे, स्वतःची पोकळ प्रशंसा करणे असा आहे. हे अर्थ लक्षात घेऊन या दोन्ही शब्दांच्या संदर्भात 'करण्यात' (करणे हा मूळ शब्द) हे रूप चुकीचे आहे.



सर्व जणांनी आपापले जोडे बेशिस्तपणे काढले होते.

आणखी एक शाब्दिक चूक याच वाक्यात आहे. ती 'सर्वजण' या शब्दाची. हा एक शब्द नसून हे दोन शब्द आहेत- सर्व जण. 'जण' या नामाचे सर्व हे विशेषण आहे. एक जण, सारे जण, प्रत्येक जण इ. स्त्रीलिंगी एकवचनी रूपे एकजण, प्रत्येक जण अशी होतील, पण अनेकवचनी स्त्रीलिंगी रूपे दोघी जणी, साऱ्या जणी, अनेक जणी अशी होतील. यासंबंधीचे स्पष्टीकरण 'भाषासूत्र' या सदरातील सुरुवातीच्या माझ्या लघुलेखात मी केले आहे. त्यात 'जण' हा मराठी भाषेने संस्कृतातून स्वीकारलेला तद्भव (थोडा बदल करून स्वीकारलेला) शब्द आहे. संस्कृत शब्द- जन (पु.) अर्थ - असामी, मनुष्य. सर्व सारे, दोघे इ. 'जण' या शब्दांची विशेषणे आहेत, हे वाचकांना आठवत असेल. वरील वाक्य असे हवे - '... अनेक विषयांवर चर्चा करून आपली मते मांडण्यात (किंवा आपली मते इतरांना पटवून देण्यात) आणि बढाया मारण्यात सर्व जण अगदी रंगून गेले होते.'

–यास्मिन शेख

## भाषासूत्र
कांचन कराई द्वारा संकलित

# हुरळली मेंढी, लागली लांडग्याच्या पाठी

**अशोकने एक** व्यवसाय सुरू करण्याचे ठरवले. त्याला वाटले आपण जर हा व्यवसाय सुरू केला तर यशस्वी होऊ शकू. आपल्याला खूप प्रसिद्धी मिळेल आणि त्याचबरोबर खूप पैसाही मिळेल. हल्ली सगळ्यांना पैसा आणि प्रसिद्धी लवकरात लवकर प्राप्त व्हायला हवी असते. त्यासाठी ते उतावीळपणे चुकीच्या वाटांनी जायचा मोह टाळू शकत नाहीत. तसेच अशोकचे झाले.

तो जो व्यवसाय सुरू करत होता ती वाट फार आकर्षक, पण निसरडी होती. त्याला त्याच्यातील धोके त्याच्या अनेक मित्रांनी, नातेवाईकांनी, सल्लागारांनी सांगितलेही होते. त्याच्या एका गुरुंनी सुद्धा त्याला सल्ला दिला होता की, ''अरे अशोक, या वाटेने जाणे तुला जमणार नाही. तुला यश मिळवायचे असेल तर खूपच कष्ट, मेहेनत घ्यावी लागेल. तुझ्यात तेवढी ताकद आहे, असे मला वाटत नाही. त्यासाठी कामात जे सातत्य असायला हवे, ते तुझ्यात नाही, असेही मला वाटते. तेव्हा हा व्यवसाय सुरू करण्याबाबत खूप विचारांती पाऊल उचल. नाहीतर 'हुरळली मेंढी, लागली लांडग्याच्या पाठी' अशातली गत होईल तुझी.'' पण अशोक तेव्हा कुणाचाच

सल्ला विचारता घेण्याच्या मनःस्थितीत नव्हता. त्याने हुरळून जाऊन व्यवसाय सुरू केला आणि



अपयशाचा धनी होऊन बसला.

लांडग्याकडे आकर्षित झालेली मेंढी त्याच्यावर भाळून जर त्याच्यामागे धावली तर काय होणार? लबाड लांडगाच तो! तो तिच्या भावना किती जाणणार? आणि आपल्या हाती आयतेच आलेले सावज तो कसे सोडणार? आणि मेंढीचे जे होणे अपेक्षित आहे तेच होणार! म्हणूनच कोणतीही कृती करण्याआधी फार भावूक होऊन निर्णय घेणे चुकीचे असते. तसे केले तर आपल्याच पायावर धोंडा पडतो. आपलेच नुकसान होते. प्रत्येक पाऊल माणसाने अत्यंत विचाराने आणि विवेकाने उचलणे आवश्यक असते नाहीतर कदाचित ते त्याला सर्वनाशाकडेही नेऊ शकते.

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचार आणि रूढी

**श्रीनिवास विनायक** कुलकर्णी यांच्या 'डोह' या पुस्तकात एक वाक्य आहे : 'पंक्तिप्रपंच केल्याने वाघळाच्या जन्माला गेलेली ती गेल्या जन्मीची माणसे आहेत, असे थोरली आई सांगे...'

'पंक्तिप्रपंच करणे' म्हणजे एकाच पंक्तीत जेवायला बसलेल्या लोकांपैकी एकास एक दुसऱ्यास दुसरा, एकास कमी दुसऱ्यास जास्त पदार्थ हेतुपूर्वक वाढून भेदभाव करणे. दाते- कर्वे यांच्या 'महाराष्ट्र वाक्संप्रदाय कोशात' पंक्तीस प्रपंच करू नये, असे स्पष्ट म्हटले आहे. तरीही कोशात या वाक्प्रचाराची नोंद आहे, याचा अर्थ तसे वर्तन घडत असावे. आज आपण ज्या समतादी मूल्यांची कास धरतो, त्या सामाजिक संक्रमणाच्या प्रवासात अडथळे ठरणाऱ्या प्रवृत्तींची कल्पना अशा वाक्प्रचारांतून येते.

आणखी एक वाक्प्रचार वाचताना मनाला वेदना होतात; तो म्हणजे 'वाळीत टाकणे'. याचा अर्थ आहे, जात/ समुदाय यातून बहिष्कृत करणे. जात अथवा समुदाय यांचे निर्बंध पालन न केल्यास ही शिक्षा दिली जात असे. वाळीत टाकणे, हे एकेकाळी समाजनियंत्रणाचे कठोर साधन मानले जात असे. संत ज्ञानेश्वर यांचे वडील विठ्ठलपंत यांनी संन्यासाचा त्याग करून गृहस्थाश्रम स्वीकारला होता, म्हणून त्यांच्या कुटुंबाला



त्याकाळी वाळीत टाकले होते; हे आपणास माहीत असते. आपल्याकडे, तसेच इतरत्रही किती विविध कारणांनी व्यक्ती अथवा गट यांना वाळीत टाकले गेले होते; याची उदाहरणे सु. र. देशपांडे यांनी 'मराठी विश्वकोशा'त दिली आहेत. वाळीत टाकणे, हा आता कायद्याने गुन्हा आहे. तरीही एखाद्या व्यक्तीला वाळीत टाकण्यात आल्याची बातमी अधूनमधून कानी पडते. याचा अर्थ असा की हे कालबाह्य झालेले वाक्प्रचार समाजमनातून पूर्णपणे पुसले गेलेले नाहीत. त्यासाठी अजूनही समाज- प्रबोधनाची गरज आहे. असे आणखीही वाक्प्रचार सहज आठवतील.

आपल्या प्रगतीच्या वाटेवर सिंहावलोकन करताना अशा वाक्प्रचारांचीही दखल घ्यावी लागते. कारण हे वाक्प्रचार म्हणजे रूढींचे दर्शन घडवणारे, एकेकाळच्या समाजवास्तवाचे भाषेत गोठलेले अवशेष असतात. आपल्या आधुनिकतेच्या वाटेवरची आव्हाने त्यातून लक्षात येतात.

**– डॉ. नीलिमा गुंडी**

लोकसत्ता
Wed, 24 August 2022
https://epaper.loksatta.com/c/69841565



भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# नाटक आणि संबंधित संज्ञा

**सध्या अनेक** खेड्या-पाड्यांतील वा नगरांतील तरुण मुलांनी नाटकच पाहिलेले नसते. 'स्वगत' आणि 'नांदी' म्हणजे काय, हे मराठी माध्यमात शिकलेल्या, १८ वर्षे वयाच्या ८० मुलांच्या वर्गात कोणालाही सांगता येत नाही, अशी अवस्था आहे.

पाश्चात्त्य नाट्यशास्त्रातील संकल्पनांना मराठी पर्यायी शब्द कोणते सुचवता येतील ते पाहू या. ड्रामा म्हणजे नाटक, स्टेज म्हणजे रंगमंच, ॲक्ट म्हणजे अंक, सीन म्हणजे प्रवेश, ॲक्टर म्हणजे नट, ॲक्टिंग म्हणजे अभिनय, ॲक्टिंग स्टाईल म्हणजे अभिनय शैली, जेस्चर म्हणजे हावभाव, मेकअप म्हणजे रंगचर्या, लायटिंग म्हणजे प्रकाशयोजना, सिनोग्राफी म्हणजे नेपथ्य, सिनरी म्हणजे देखावा, डिझाइन कन्सेप्ट म्हणजे रचनेची संकल्पना, स्क्रिप्ट म्हणजे संहिता, प्लॉट म्हणजे कथानक, सबप्लॉट म्हणजे उपकथानक, कन्वेंशन म्हणजे नाट्यसंकेत, फोर्थ वॉल म्हणजे चौथी भिंत, कर्टन म्हणजे पडदा, ऑडियन्स म्हणजे प्रेक्षक, डिरेक्टर म्हणजे दिग्दर्शक, कास्टिंग म्हणजे पात्रयोजना, कॅरेक्टर म्हणजे व्यक्तिरेखा, हीरो म्हणजे नायक, कॉन्फ्लिक्ट म्हणजे संघर्ष, कोरस म्हणजे वृंद, स्किट म्हणजे प्रहसन, क्लायमॅक्स म्हणजे उत्कर्ष बिंदू, थिएटर ऑफ क्रूॲलिटी म्हणजे क्रौर्यनाट्य, एक्सपेरिमेंटल थिएटर म्हणजे प्रायोगिक रंगभूमी, थिएटर ऑफ अब्सर्ड म्हणजे असंगत नाटक, स्ट्रीट थिएटर म्हणजे पथ रंगमंच, डोमेस्टिक ड्रामा म्हणजे कौटुंबिक नाटक, मोनोलॉग म्हणजे एकोक्ती किंवा एकपात्री, द ग्रँड इल्युजन म्हणजे भव्य आभास, एपिलॉग म्हणजे भरतवाक्य, हमर्शिया म्हणजे शोकात्म प्रमाद.

ॲरिस्टॉटलच्या काव्यशास्त्रात शोकात्मिकेच्या व्याख्येमध्ये आलेली एक संज्ञा म्हणजे कॅथार्सिस. त्याचा अर्थ असा, की भावनांतील दुःखद किंवा त्रासदायक भाग काढून टाकणे. त्याला मराठीत 'विरेचन' म्हणतात. काही जणांना विरेचन शब्द बरा वाटत नाही, कारण ती वैद्यकीय क्षेत्रातील संकल्पना आहे. म्हणून ही संज्ञा टीकाकारांनी विशुद्धीकरण, सुवर्णमध्यीकरण, उदात्तीकरण, प्रायश्चित्तीकरण, समाधातीकरण, वज्रीकरण, सुस्पष्टीकरण अशा विविध शब्दकुळांशी सुद्धा जोडलेली आहे. अथेन्समधील नाट्योत्सवात तीन शोकांतिकांनी युक्त अशा प्रत्येक त्रिनाट्यानंतर अर्धसुखान्त असे 'सॅटीर नाट्य' सादर केले जाई. या नाट्याला मराठी पर्यायी शब्द नाही, सांस्कृतिक संकल्पनेमुळे तो तयार करणेही कठीणच आहे!

– डॉ. निधी पटवर्धन
nidheepatwardhan@gmail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# भूर्जपत्र ते कागद...

**आजकाल 'पेपरलेस** कम्युनिकेशन' हा चर्चेचा विषय झाला आहे, पण पेपराचा वापर अपरिहार्य आहे हे पदोपदी जाणवत असते. उदाहरणार्थ, छापील पुस्तके किंवा वृत्तपत्रे कालबाह्य होतील आणि आपण सगळे फक्त मोबाइल किंवा संगणकाच्या स्क्रीनवर वाचन करायला लागू असे गेली २५-३० वर्षे तरी तथाकथित तज्ज्ञ म्हणत आले आहेत; पण प्रत्यक्षात तसे होत नाही. वाचनासाठी किंवा लिहिण्यासाठी होणारा पेपरचा वापर हा एकूण पेपरवापराचा एक छोटा हिस्सा झाला. नॅपकिन असो की प्रशासनातील फायली, कॅलेंडर असो की वस्तूंचे पॅकिंग, पेपर हा आपल्या जीवनाचा अविभाज्य घटक आहे. या पेपरला मराठी प्रतिशब्द आहे कागद. या कागद शब्दाची व्युत्पत्ती मजेशीर आहे. डॉ. यू. म. पठाण यांच्या 'फार्सी-मराठी अनुबंध' या ग्रंथानुसार कागद हा शब्द मूळ अरबी 'कागज्' शब्दापासून फार्सीच्या माध्यमातून मराठीत आला.

कागदाचा वापर अगदी अल्प प्रमाणात ज्ञानेश्वरांच्या काळात सुरू झाला होता; पण त्यापूर्वी भूर्जपत्रांवरच बहुतांश लेखन होत असे. महत्त्वाच्या शासकीय नेमणुका किंवा आदेश यांसाठी कधी कधी ताम्रपट वापरले जात. त्यामुळे त्यापूर्वी होणारे काव्य, तत्त्वज्ञान, शस्त्रे, धर्मग्रंथ वगैरेंचे लेखन हे अत्यल्प लोकांपर्यंतच पोचत असले पाहिजे. कारण



भुर्जपत्रांच्या प्रती मोठ्या संख्येने काढणे अतिशय अवघड होते; त्यांची पुस्तके तयार करणे आणि वितरित करणे हेही अगदी मर्यादित प्रमाणावरच शक्य होते. तेराव्या शतकात कागद हा प्रकार लेखनासाठी प्रथम वापरात आला व तेव्हापासूनच ज्ञानाचा व्यापक प्रसार शक्य झाला. पुढे मुद्रणाच्या शोधामुळेच बहुजन समाजापर्यंत ज्ञान पोहोचू शकले. म्हणूनच मानवी इतिहासात कागदाचे आणि मुद्रणाचे इतके अनन्यसाधारण महत्त्व आहे.

तत्कालीन मुसलमानी अमलात मराठवाड्यातील दौलताबादजवळ कागजीपुरा या गावी कागद तयार करण्याचा व्यवसाय होता. त्याला दौलताबादी कागद असेच म्हणत. अर्थात तो हस्तलेखनासाठी योग्य असला, तरी आधुनिक छपाईसाठी त्याचा उपयोग नव्हता. आज वृत्तपत्रांसाठी न्यूजप्रिंट, स्टेशनरीसाठी क्रीमवोव्ह, पुस्तकांसाठी मॅपलिथो, रंगीत छपाईसाठी आर्ट, पॅकिंगसाठी क्राफ्ट असे कागदाचे विविध प्रकार वापरले जातात आणि त्या साऱ्यांची व्युत्पत्ती मूळची युरोपातील आहे.

– भानू काळे
bhanukale@gmail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# अप्रत्यक्ष निवेदनातील सर्वनामे

**इंग्लिश माध्यमातून** शिकलेल्या, पण मराठी मातृभाषा असलेल्या व्यक्तींच्या बोलण्यात किंवा लेखनातही काही चुका होतात. इंग्लिश भाषेतील वाक्यरचनेच्या प्रभावाने अनेकदा मराठी वाक्यरचना सदोष होतात. अशा एका वाक्यरचनेचा परामर्श आज आपण घेणार आहोत. इंग्लिश भाषेत एखादी व्यक्ती काय बोलली, हे सांगताना किंवा लिहिताना त्या वाक्याची रचना मराठी वाक्यरचनेपेक्षा वेगळी होते. ते बोलणे जसेच्या तसे लिहिताना प्रत्यक्ष निवेदनपद्धतीचा वापर मराठीत आणि इंग्लिशमध्येही होतो. इंग्रजीत त्याला 'Direct Narration' म्हणतात. मराठीत आपण 'प्रत्यक्ष निवेदनपद्धती' म्हणतो. प्रत्यक्ष निवेदन करताना दोन्ही भाषांत अवतरणचिन्हे वापरतात. उदा. He said, ''I want to visit my sick friend, but I cant go.'' या वाक्याचे मराठीत प्रत्यक्ष निवेदन असे होईल - तो म्हणाला ''माझ्या आजारी मित्राला मला भेटावंसं वाटतं, पण मला ते शक्य होणार नाही.'' हे भाषांतर योग्य आहे. इंग्लिश व मराठी भाषांतरांत अवतरणचिन्हे वापरल्यामुळे तो जे बोलला ते शब्द जसेच्या तसे आले आहेत.

आता या वाक्याचे इंग्लिशमध्ये अप्रत्यक्ष निवेदन (Indirect Narration) असे होईल- ''He said that he wanted to visit his friend, but he couldnot go.'' या वाक्यात अवतरणचिन्हे नाहीत आणि said या भूतकाळी रूपाप्रमाणे त्या भाषणातही क्रियापदाची रूपे बदलली आहेत आणि I च्या ऐवजी he आलेले आहे. मात्र मराठीत अप्रत्यक्ष निवेदनपद्धती इंग्लिशच्या धर्तीवर नाही. मराठीत या वाक्याचे रूपांतर असे होईल. 'तो म्हणाला, की मला माझ्या आजारी मित्राला भेटावेसे वाटते; पण ते मला शक्य होणार नाही.' या वाक्याच्या स्वरूपावरून तुमच्या लक्षात येईल, या वाक्यात आपण 'की' या शब्दाची भर घातली आहे. अवतरणचिन्हेही वापरली नाहीत पण त्याचे बोलणे जसेच्या तसेच भाषांतरित केले आहे. (he च्या ऐवजी मी, वर्तमानकाळाऐवजी भूतकाळ) असा बदल (इंग्लिश वाक्यरचनेप्रमाणे) आपण करत नाही. याचा अर्थच असा, की इंग्लिश माध्यमाच्या व्यक्तींनी जर इंग्रजीच्या प्रभावाने अशी रचना केली, तर ती मराठीत मान्य होणार नाही.

ती **चुकीची रचना** अशी- '*तो म्हणाला की त्याच्या आजारी मित्राला त्याला भेटायचे होते, पण तो जाऊ शकला नाही.*' कृपा करून मराठीत अशी वाक्यरचना करू नये.

**- यास्मिन शेख**

लोकसत्ता Mon, 29 August 2022
https://epaper.loksatta.com/c/69907973

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# हेल्याच्या कानी किंगरी

**हेला म्हणजे** रेडा. किंगरी नावाचे एक छोट्या आकाराचे वाद्य असते. रेड्याच्या कानात जर किंगरीसारखे लहान वाद्य वाजवले तर तो त्याला काहीच प्रतिसाद देत नाही. त्याच्या चालीत काहीच सुधारणा होत नाही. त्याप्रमाणेच मूर्ख माणसाला तुम्ही कितीही उपदेश केलात तरी त्याच्या वागणुकीत काहीही बदल होत नाही. 'पालथ्या घड्यावर पाणी' म्हणतात ना, तशातली गत! काही काही व्यक्ती अशा असतात की त्यांना त्यांच्या हिताच्या चार गोष्टी कळणं तर सोडाच, पण कोणी सांगायला गेलं तरी त्यांना ते पटत नाही. त्याचा त्यांच्यावर काहीही परिणाम होत नाही.

त्यातलाच एक प्रमोद होता. त्याला जीव तोडून सगळे सांगत असत पण ते त्याच्या मनी उतरेल तर शपथ! त्याच्या कानातच काही शिरायचे नाही तर मनात काय शिरणार?

बरं, त्याच्या अवतीभोवती चांगल्या सुजाण व्यक्तीही होत्या. त्याचे वडील गावातले मोठे वकील होते. एक भाऊ मोठा धंदा सुरू करून फार मोठा उद्योगपती झाला होता. दुसरा भाऊ परदेशात उच्च शिक्षण घेऊन मोठा शास्त्रज्ञ झाला होता. जितक्या सौम्यपणे त्याला सांगता येईल तितक्या सौम्यपणे त्याचे मन न दुखावता त्याला



सर्व जण सल्लेही देत होते. पण हा 'हेला' काही ऐकेल तर शपथ!

त्याची काही ऐकून घेण्याची तयारीच नसे. कितीही सांगा, कसेही सांगा हा रेडा अडूनच राहायचा. त्यामुळे त्याची प्रगती होईना, पैसा वाचेना. काळ पुढे जात होता आणि याची अधोगती काही थांबेना. शेवटी त्याच्या पुढे हात जोडून त्याचे वडील सर्वांना म्हणाले, 'याला खूप सांगून बघितले. आता काही सांगण्यात अर्थ नाही.

गाढवापुढे वाचली गीता आणि कालचा गोंधळ बरा होता अशातली गत आहे.' त्यांच्या म्हणण्याला मोठ्या भावांनी दुजोरा दिला,' खरं आहे बाबा तुमचं! आपलं सारं बोलणं म्हणजे हेल्याच्या कानी किंगरी वाजवत बसणे अशातली गत आहे झालं.'

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com

# वाक्प्रचार व स्त्रीजीवन

**काही वाक्प्रचार** गतकालीन स्त्रीजीवनाची कल्पना देतात. त्यातून कालबाह्य रूढीही लक्षात येतात. त्याची ठळक उदाहरणे पाहू.

'हूं की चूं न करणे' हा वाक्प्रचार मुख्यतः स्त्रीच्या संदर्भात वापरला जात असे. याचा अर्थ आहे, अवाक्षर न काढणे. दडपणामुळे तोंडातून शब्दच काय, एक अक्षरही न उमटणे. लक्ष्मीबाई टिळक यांच्या 'स्मृतिचित्रे' (१९३६) या गाजलेल्या आत्मचरित्रात वर्णन केलेला एक प्रसंग आहे. लक्ष्मीबाईंच्या लग्नाआधी त्यांच्या एक आजेसासूबाई त्यांना पाहायला आल्या होत्या. तेव्हा त्यांनी त्या लहानग्या मुलीच्या डाव्या कानाचा चाप गच्च दाबून धरला. तरी तिने हूं की चूं केले नाही! तेव्हा त्यांनी मुलगी पसंत केली! हा वाक्प्रचार त्या काळातील आदर्श स्त्रीविषयीची समाजाची अपेक्षा नेमकेपणाने लक्षात आणून देतो. आज अशी मूक सोशीक स्त्रीप्रतिमा आदर्श मानली जात नाही.



आजच्या स्त्रीजीवनाच्या वाटचालीकडे पाहता पूर्वीचा आणखी एक वाक्प्रचार कालबाह्य ठरतो. तो म्हणजे 'ब्र न काढणे'. ब्र न काढणे म्हणजे चकार शब्द न बोलणे. येथील ब्र या अक्षराला काही अर्थ असावा. आपल्याकडे प्राचीन काळी काही ब्रह्मवादिनी स्त्रिया होत्या. मात्र ती परंपरा पुढे खंडित झाली. स्त्रियांना अध्यात्मज्ञानाचा अधिकार नाकारला गेला. त्यामुळे ब्रह्मज्ञान लांबच राहिले, त्यातील ब्र सुद्धा उच्चारायचा नाही, असा त्याचा गर्भितार्थ असावा! एकंदरीत ज्ञानाच्या सर्वश्रेष्ठ मानल्या गेलेल्या क्षेत्रात स्त्रीला प्रवेश नाही, असा त्याचा अर्थ दिसतो. एक प्रकारे जुन्या काळी तिला अज्ञानामुळे गप्प बसायला भाग पाडता येत असावे! आज स्त्रीला सहजासहजी कोणी ज्ञानापासून वंचित ठेवू शकणार नाही. कविता महाजन यांनी 'ब्र' ही कादंबरी लिहून या वाक्प्रचाराला जणू आव्हान दिले आहे. विशेष म्हणजे या कादंबरीचा हिंदीत अनुवाद 'चूँ' या नावाने झाला आहे!

पायीची वहाण, पायीच छान' (स्त्रीचे स्थान कमी दर्जाचे), 'एखाद्याने बांगड्या भरणे' (नामर्द असणे) असे स्त्रीचा अधिक्षेप करणारे वाक्प्रचारही आता समाजमनातून पुसले जायला हवेत.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com

# गांधी-टिळकांचा शब्दवारसा

कांचन कराई द्वारा संकलित

**सर्वोदय**

**सत्याग्रह**

**नोकरशाही**

**महात्मा गांधी** डिसेंबर १९०४ मध्ये दक्षिण आफ्रिकेत असताना जॉन रस्किन या इंग्रज विचारवंताने १८६० साली लिहिलेला 'अनटू धिस लास्ट' हा निबंध त्यांच्या वाचनात आला आणि त्याने ते पुरते झपाटले गेले. त्या निबंधाचा त्यांनी गुजरातीत अनुवाद केला आणि आपल्या 'इंडियन ओपिनियन' या आश्रमातून निघणाऱ्या साप्ताहिकात प्रसिद्धही केला. अनुवादाच्या शीर्षकासाठी त्यांनी 'सर्वोदय' हा नवाच शब्द योजला. पुढे भारतात परतल्यावर गांधीजींनी त्याच विचारांचा पाठपुरावा विनोबा आणि जयप्रकाश नारायण यांच्या साथीने सुरू केला आणि त्या चळवळीला 'सर्वोदय' हेच नाव मिळाले.

त्याच सुमारास हेन्री डेविड थोरो या अमेरिकन विचारवंताचा 'सिव्हिल डिसओबिडियन्स' हा १८४९ साली लिहिलेला निबंध गांधीजींच्या वाचनात आला. 'अन्याय्य कायद्याच्या विरोधात शांततामय मार्गाने निदर्शकांनी एकत्र येणे' किंवा 'सविनय कायदेभंग' ही त्यामागची मूळ संकल्पना. आपल्या चळवळीसाठी हे स्वरूप अगदी योग्य आहे हे गांधीजींच्या लक्षात आले पण त्यासाठी योग्य भारतीय प्रतिशब्द मात्र त्यांना सुचेना. शेवटी आपल्या 'इंडियन ओपिनियन'मधून त्यांनी वाचकांसाठी 'सिव्हिल डिसओबिडियन्स'साठी प्रतिशब्द सुचवायची स्पर्धा जाहीर केली, निवडलेल्या शब्दासाठी पारितोषिकही जाहीर केले. मगनलाल गांधी या त्यांच्याच पुतण्याने सुचवलेला 'सदाग्रह' (चांगल्यासाठीच आग्रह) हा प्रतिशब्द पारितोषिकप्राप्त ठरला. पण स्वतः गांधीजींना तो तितकासा पसंत नव्हता. शेवटी त्यातच किंचित बदल करून त्यांनी 'सत्याग्रह' हा शब्द योजला. 'सर्वोदय' आणि 'सत्याग्रह' हे गांधीजींनी प्रचलित केलेले दोन्ही शब्द पुढे सर्वच भारतीय भाषांनी स्वीकारले. हे केवळ दोन नवे शब्द नव्हते, तर त्यातून एक विशिष्ट जीवनविषयक तत्त्वज्ञान मांडले गेले होते.

स्वराज्य संघाच्या (ॲनी बेझंट यांनी सुरू केलेल्या 'होमरूल लीग' चळवळीच्या) प्रचारार्थ १९१६ सालानंतर लोकमान्य टिळकांनी देशभर दौरे केले. स्वातंत्र्यलढ्यातील तो एक महत्त्वाचा टप्पा होता. त्यावेळी आपल्या भाषणांत सरकारी नोकरांवर टिळक जोरदार टीका करत. सरकारी नोकरांसाठी त्यावेळी 'ब्युरोक्रसी' हाच इंग्रजी शब्द मराठीतही रूढ होता. त्याला पर्याय म्हणून 'नोकरशाही' हा शब्द टिळकांना सुचला. वऱ्हाड प्रांताच्या दौऱ्यावर असताना अकोट येथील एका भाषणात टिळकांनी 'नोकरशाही' हा शब्द प्रथम वापरला आणि पुढे तो सर्वांनीच स्वीकारला.

- भानू काळे
bhanukale@gmail.com





# ‘सत्’ कधी ‘सद्’ कधी?



‘*एखाद्या नोकराने आपल्या चुकीबद्दल माफी मागितली असली, तरी त्याच्या मालकानेही माफी मागावी, असा आग्रह का धरायचा? याचा विचार सद्सद्विवेकबुद्धी असणारी व्यक्ती करू शकेल.*’ किंवा ‘*माणसाचे माणूसपण त्याच्या सद्सद्विवेकबुद्धीमुळेच ठरते.*’ वरील दोन्ही वाक्यांत ‘*सद्सद्विवेकबुद्धी*’ या शब्दातच एक मोठी चूक आहे. या शब्दाची फोड करू या- सद् सद् विवेक बुद्धी. या शब्दात सद् सद् हेच सदोष आहेत.

सत् हा शब्द आधी आल्यास आणि पुढील शब्दात ‘अ’ आल्यास- म्हणजे सत् असत् हे शब्द जेव्हा समासात एकापुढे एक येतात, तेव्हा त् चा द् होतो. दुसरा शब्द सत् नसून असत् आहे. त्या शब्दानंतर वि (व) आल्यामुळे त्या शब्दाचे रूप असद् होते. वरील शब्दांत सत् असत् असे दोन शब्द आहेत. त्यामुळे पहिल्या शब्दातील त् चा द् अ = सदसद् असे त्या शब्दाचे रूप होते. सत् असत् विवेक या सामासिक शब्दाचे रूप होईल- सदसद्विवेक. असा विवेक असलेली बुद्धी या सामासिक शब्दाचे योग्य रूप आहे **सदसद्विवेकबुद्धी**.

आता या शब्दातील चारही शब्दांचा अर्थ असा आहे- सत् (विशेषण)- अर्थ- खरा, चांगला, वास्तविक, यथातथ्य, योग्य, रास्त, उत्तम इ. असत् (वि.) सत् च्या विरुद्धार्थी खोटा, अयोग्य, चुकीचा, वाईट, अवास्तविक. सदसत् (वि.) खरेखोटे, वास्तविक व अवास्तविक, बरेवाईट. सदसद्विवेक किंवा सदसद्विचार (पु. नाम.) अर्थ-बरेवाईट, खरेखोटे यासंबंधी विचार किंवा विवेक. सदसद्विवेकबुद्धी किंवा सदसद्विचारशक्ती (स्त्री. नाम) अर्थ- खरे कोणते व खोटे कोणते यासंबंधी योग्य विचार करण्याची मानसिक शक्ती किंवा बुद्धी. वरील दोन्ही वाक्यांतील निर्दोष शब्द आहे- सदसद्विवेकबुद्धी.

पुढील शब्द पाहा :

सत् +आचरण = सदाचरण,
सत् +संगती = सत्संगती,
सत् +संग = सत्संग,
सत् +आचार = सदाचार,
सत् +उक्ती = सदुक्ती,
सत् +गती = सद्गती,
सत् +गुण = सद्गुण,
सत् +गुरू = सद्गुरू,

सत् गृहस्थ = सद्गृहस्थ,
सत् भाव = सद्भाव,
सत् धर्म = सद्धर्म,
सत् पात्री = सत्पात्री (दान),
सत् कर्म= सत्कर्म,
सत् पुरुष = सत्पुरुष,
सत् शील = सत्शील,
सत् बुद्धी = सद्बुद्धी.

**– यास्मिन शेख**





# बुगड्या गेल्या पण भोके राहिली



**नानीचा सहस्र** चंद्रदर्शनाचा सोहळा साजरा करण्याचे तिच्या नातवंडांनी ठरवले होते. घरात त्याचीच लगबग सुरू होती. नानीने आधी तिच्या नातवंडांनी घातलेल्या या घाटाला काही संमती दिली नव्हती. तिला वाटत होते, आपण ८० वर्षे जगलो हे काही आपले कर्तृत्व म्हणायचे का? जंगलात नाही का झाडे वाढत, तसे वाढलो आपण! आपल्या हातून जन्माचे सार्थक होईल असे काम काही होऊ शकले का? तर तसेही काही झाले नाही.

जसे दिवस पुढे पुढे जात होते, तसे आपले आयुष्यही पुढे पुढे जात होते. जसे आपल्या आयुष्यात प्रसंग येत होते तसे आपण त्यांना सामोरे जात होतो. आता सर्वांच्याच आयुष्यात हा सहस्र चंद्रदर्शनाचा सोहळा येतो, कारण आयुर्मान वाढले आहे. इतके मात्र खरे की या मिळालेल्या दीर्घ आयुष्यात आपण अनेक उतार-चढाव पाहिले.

लग्न झाले तेव्हा अगदी पालखी, घोडे दारी असण्यासारखी आपली सांपत्तिक स्थिती होती. काय थाट होता संसाराचा! गाडी घोडे, घरी नोकर चाकर, आचारी पाणके, कामाला भरपूर गडी माणसे, घरी गोडाधोडाची नुसती रेलचेल! उंची वस्त्रे, दागदागिने, हौसमौज करून झाली. सर्व काही भोगून झाले. पण लक्ष्मी चंचल असते ना! ती जोवर घरात नांदते तोवर ठीक. तिची लहर फिरली की तेल गेले, तूप गेले अन् हाती धुपाटणे आले असेच म्हणायची वेळ येते ना! तेही दिवस आले. त्यानंतरचा काळ मात्र कसोटीचा आला. तोही निभावून नेला. नानींना वाटले आता गाडी परत एकदा रुळावर आली आहे. नातवंडांना वाटते आहे म्हणून त्यांनी एवढा मोठा घाट घातला आहे, त्याला नको कसे म्हणू? 'बुगड्या गेल्या पण भोके उरली आहेत' इतके मात्र खरे!

**- डॉ. माधवी वैद्य**

# नवी वळणे, नवे वाक्प्रचार



**भाषा नेहमी** काळ आणि सामाजिक परिस्थिती यांच्याशी नाते राखत बदल आत्मसात करते. त्यामुळे काळाच्या ओघात काही जुने वाक्प्रचार गतार्थ होतात आणि नवे वाक्प्रचार वापरात येतात. त्याचे श्रेय सर्जनशील लेखकांप्रमाणे पत्रकार आणि युवा पिढी यांनाही जाते. वर्तमानपत्रे ही दैनंदिन व्यवहाराच्या निकट असतात. त्यांच्या भाषेचा प्रभाव समाजमनावर मोठ्या प्रमाणावर पडत असतो. त्यामुळे भाषेला नवे वळण देण्यात त्यांचा मोठा वाटा असतो.

नव्या तंत्रज्ञानामुळे ट्विटर हे समाजमाध्यम सध्या लोकप्रिय झाले आहे. कधीकधी एखादी राजकीय व्यक्ती त्यावरून जेव्हा महत्त्वाचे भाष्य करते, तेव्हा त्या भाष्याला जोरदार प्रतिसाद मिळत जातो. अनेक जणांच्या तेथील शेरेबाजीवजा अभिव्यक्तीला 'टिवटिवाट करणे' असा वाक्प्रचार हल्ली वापरला जातो. यात मूळ इंग्रजी शब्दातील अक्षरांची आठवण एकीकडे जपली आहे. शिवाय 'चिमण्यांचा चिवचिवाट' या शब्दाशीही त्याचे नाते नादातून राखले आहे. ईमेलवरून हल्ली एकमेकांना प्रतिसाद देत संवाद साधणे, यासाठी 'मेलामेली करणे' हा कानावर पडणारा वाक्प्रचारही इंग्रजी संज्ञेला मराठी लकब बहाल करणारा आहे.

'कोलांटी उडी घेणे' (पक्षबदल करणे), 'घरचा अहेर' (आपल्या पक्षावर टीका करणे) 'चुप्पी तोडणे' (मौन सोडणे) असे नवे वाक्प्रचार सध्या विविध राजकीय घडामोडींचे वर्णन करताना वर्तमानपत्रांमध्ये वापरलेले दिसतात. तसेच महात्मा गांधी यांच्या शांततापूर्ण पद्धतीने आंदोलन करण्याची आठवण जपत अभिनव पद्धतीने निषेध नोंदवण्यासाठी 'गांधीगिरी करणे' हा वाक्प्रचारही रूढ झालेला दिसतो. उदा. 'रहदारीचे नियम मोडणाऱ्या मंडळींना गुलाबाची फुले देऊन गांधीगिरी करण्याचा उपक्रम शहरात राबवला गेला.'

प्रत्येक युवा पिढी भाषेचे वळण बदलण्याचा वारसाच जणू चालवत असते. याचे उदाहरण म्हणजे एकेकाळी 'एखादी गोष्ट लक्षात न येणे' यासाठी 'ट्यूब न लागणे' असा वाक्प्रचार वापरला जात असे. आता त्यासाठी 'टोटल न लागणे' असा वाक्प्रचार वापरला जातो. असे नवनवे वाक्प्रचार तयार होतच असतात. यातून भाषेच्या प्रवाहीपणाची एकप्रकारे खात्री पटत राहते.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com







कांचन कराई द्वारा संकलित

# फिरंगी शब्दांची गलबते



महाराष्ट्राच्या सागर किनाऱ्यावर निरनिराळे परकीय आले, तसेच पोर्तुगीजही आले आणि ते गोमांतकातच स्थिरावले. व्यापार, धर्मप्रसार, विविध व्यवसाय, राजकारण, वाङ्मय इत्यादी क्षेत्रांत अनेक पोर्तुगीज शब्द शिरले आणि ते मराठीत रुजले.

आता नाताळ शब्द पहा. ख्रिसमस म्हणजेच नाताळ हा येशू ख्रिस्ताचा जन्मदिन साजरा करण्याचा सण आहे. पोर्तुगीज ख्रिसमसला नाताळ म्हणतात. त्यांनीही तो शब्द लॅटिन नटालीस वरून घेतला आहे. नटालीस म्हणजे जन्म वा जन्माविषयी. आता डॉक्टरच पाहा ना, विशेषकरून बाळंतपण आणि गर्भारपण याविषयी बोलताना प्री नेटल आणि पोस्ट नेटल असे शब्द नेहमी वापरतात.

फक्त मराठीतच नाही तर कोकणी, गुजराती बरोबरच जिथे जिथे पोर्तुगीज साम्राज्यवाद्यांनी वसाहती केल्या होत्या तिथे तिथे ख्रिसमसला नाताळच म्हणतात. कारण पोर्तुगीज भाषेत नाताळचा अर्थ जन्मदिन असा आहे. भारत, इंडोनेशिया, जपान, मलेशिया, श्रीलंका, मालदीव बेटे, ब्राझील, अंकोला, मोझांबीक, ईस्ट तीमोर, बहरीन व मकाऊ इथे पोर्तुगीजांच्या वसाहती होत्या. 'नेटल'; 'नाताल'चे मराठीत 'ळ' घालून 'नाताळ' झाले.

आता काही बायका ज्याला 'जन्म सावित्री' म्हणतात ती भाजी म्हणजे बटाट्याची. हा 'बटाटा' शब्द पोर्तुगीज आहे. स्पॅनिश दर्यावर्दींनी ही वनस्पती युरोपात आणली व पुढे पोर्तुगीजांनी तिची भारताच्या पश्चिम किनाऱ्याजवळच्या प्रदेशात लागवड सुरू केली. तिथे तो पोर्तुगीज भाषेतील 'बटाटा' या नावाने ओळखला जाऊ लागला. ब्रिटिश व्यापाऱ्यांनी तो बंगालमध्ये नेला. तिथे तो 'आलू' या नावाने ओळखला जाऊ लागला.

'हापूस' आंबा आपला म्हणून ओळखला जातो. पोर्तुगीज लष्करात अल्फान्सो डे अल्बकर्की नावाचे एक अधिकारी होते. अल्बकर्की यांनी गोव्यात मोठी भटकंती करून आंब्यांच्या विविध जातींवर प्रयोग करत ही नवी जात विकसित केली. त्यावरून या आंब्याला 'अल्फान्सो' नाव मिळालं. पण स्थानिक लोक या आंब्याला 'अफूस' म्हणू लागले. आंब्याची ही जात महाराष्ट्रात लोकांपर्यंत पोहोचेस्तोवर लोकांच्या तोंडी याचा उच्चार 'हापूस' असा झाला होता! तर नाताळ, बटाटा, हापूस या तीन शब्दांची कहाणी सुफळ संपूर्ण! काही आणखी पोर्तुगीज शब्द पुढच्या वेळी.

– डॉ. निधी पटवर्धन

nidheepatwardhan@gmail.com

कांचन कराई द्वारा संकलित

# नावांच्या गमती

**'नावात काय** आहे? गुलाबाला कुठलेही नाव दिले तरी त्याचा सुगंध तितकाच गोड असेल.' हे शेक्सपियरचे वाक्य विख्यात आहे. पण व्युत्पत्तीचा विचार केला तर नावांमागील अनेक गमतीजमती पुढे येतात. आपल्याकडे देवादिकांची नावे मुलांना ठेवली जात. मुलगा असेल तर शंकर, महादेव, गणेश, राम, लक्ष्मण, हरी, कृष्ण, नारायण आणि मुलगी असेल तर सीता, जानकी, पार्वती, रुक्मिणी, द्रौपदी, उमा, लक्ष्मी, सरस्वती वगैरे. त्यामागे कदाचित देवाचे नाव सतत तोंडी यावे ही भावना असावी. या संकल्पनेत प्रथम बदल झाला बंगालमध्ये.

अभिषेक, अमिताभ, सुभाष, सौरव, सुजय, अविनाश, तपन, रवींद्र वगैरे नावे मुलांसाठी आणि शर्मिला, मौशुमी, निवेदिता, चारुलता, सुचित्रा, गीतांजली, नवनीता, शिबानी वगैरे मुलींसाठी ठेवली जाऊ लागली. ही आधुनिक नावे बंगाली साहित्यातून आणि सिनेमांतूनच परिचित झाली आणि देशभर स्वीकारली गेली.



काही नावे केवळ कानाला गोड वाटतात म्हणून ठेवली जातात पण त्यांचा अर्थ विपरित असतो. 'शलाका' हे मुलीचे नाव ऐकायला गोड लागले तरी त्याचा शब्दकोशातील अर्थ 'लोखंडाची सळई' असा आहे! 'अनामिका' म्हणजे जिला नाव नाही ती. पण तोच शब्द एखाद्या मुलीचे नाव बनू शकतो! 'अनिकेत' म्हणजे ज्याला घर नाही तो. पण ते नाव प्रशस्त घरात राहणाऱ्या मुलालाही ठेवले जाते!

काही नावांना रोचक ऐतिहासिक संदर्भ असतो. उदाहरणार्थ, 'मेघावती'. जगात सर्वाधिक मुस्लीम लोकवस्ती असलेल्या इंडोनेशियाचे सर्वोच्च नेते सुकार्नो यांच्याशी ओरिसाचे बिजू पटनाईक (सध्याचे मुख्यमंत्री नवीन पटनाईक यांचे वडील) यांची वर्षानुवर्षे मैत्री होती. सुकार्नो यांच्या कन्या 'मेघावती' पुढे इंडोनेशियाच्या राष्ट्राध्यक्षही झाल्या. त्यांनी लिहिले आहे, 'माझे नाव मेघावती ठेवावे ही सूचना बिजूंनी माझ्या वडिलांना केली. मेघावती म्हणजे मेघाची कन्या आणि कालिदासाच्या मेघदूत या संस्कृत नाटकातील एका मुलीचे ते नाव. वडिलांना ते अतिशय आवडले आणि त्यांनी मला तेच नाव ठेवले.'

सत्तेवर असताना जनतेवर ज्याने अनन्वित अत्याचार केले, त्या स्टॅलिनचे नाव करुणानिधी यांनी चिरंजीवांना ठेवले आणि तेच स्टॅलिन तमिळनाडूचे मुख्यमंत्री आहेत. मुलाचे नाव रावण किंवा दुर्योधन ठेवल्याचे मात्र माझ्यातरी ऐकिवात नाही!

**– भानू काळे**

bhanukale@gmail.com

भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# 'य' प्रत्ययाचा अचूक वापर

**पुढील वाक्य** वाचा- 'कोणत्याही कलाकृतीला पारंपरिक स्वरूप देण्यापेक्षा तिला नावीन्यतेचे रंग दिले, तर ती कलाकृती अधिक अर्थपूर्ण व अधिक सुंदर होण्याची शक्यता असते.'

या वाक्यातील विचार पटण्यासारखा आहे, पण एका चुकीच्या शब्दयोजनेमुळे वाक्यरचना सदोष झाली आहे. तो शब्द आहे- *नावीन्यता* (नावीन्यतेचे रंग). 'नावीन्यता' या शब्दात मूळ शब्द आहे- नवीन (विशेषण). या विशेषणाला 'य' हा प्रत्यय जोडून भाववाचक नाम होते- नावीन्य. या भाववाचक नामाला आणखी एक 'ता' हा दुसरा अनावश्यक प्रत्यय जोडून, म्हणजे य, ता जोडून त्या भाववाचक नामाचे चुकीचे, चमत्कारिक रूप करणे योग्य नव्हे. 'य' हा प्रत्यय लागून 'नवीन' या विशेषणाचे भाववाचक नाम 'नावीन्य' हे सिद्ध झालेलेच आहे. नवीन या शब्दाला ता प्रत्यय लागून 'नवीनता' हे भाववाचक नाम होईल, पण हे नाम मराठीत क्वचितच वापरले जाते. सुंदर+ता = सुंदरता, विशेष+ ता=विशेषता अशी काही भाववाचक नामे रूढ आहेत, पण त्या 'या' प्रत्ययाने मूळ शब्दात बदल होत नाही, हे लक्षात येईल.

'नावीन्य' हा संस्कृतातून मराठीने स्वीकारलेला तत्सम शब्द आहे. नवीन (वि.) य (प्रत्यय)= नावीन्य. या शब्दातील पहिले अक्षर 'न' आहे. शब्दाला 'य' प्रत्यय लागल्यामुळे 'न' चा 'ना' होतो आणि शेवटच्या अक्षरात 'य' मिसळून 'न' चा 'न्य' होतो. वरील वाक्य असे हवे. 'कोणत्याही कलाकृतीला... नावीन्याचे रंग दिले, तर... शक्यता असते.'

असेच काही तत्सम शब्द पाहू या.

**गट १)** प्रवीण- प्रावीण्य, चतुर- चातुर्य, ललित- लालित्य, चरित्र- चारित्र्य, समर्थ- सामर्थ्य, मधुर- माधुर्य, प्रमुख- प्रामुख्य, पवित्र- पावित्र्य, स्वतंत्र- स्वातंत्र्य, प्रमाण- प्रामाण्य, पंडित- पांडित्य, प्रधान(वि)- प्राधान्य.

**गट २)** निपुण- नैपुण्य, विपुल- वैपुल्य, विविध- वैविध्य, शिथिल- शैथिल्य, विशिष्ट-वैशिष्ट्य, विचित्र- वैचित्र्य, निराश- नैराश्य, विराग- वैराग्य.

**गट ३)** उदार- औदार्य, उत्सुक- औत्सुक्य, उचित- औचित्य, कुटिल- कौटिल्य, कुशल- कौशल्य, क्रूर- क्रौर्य, सुंदर- सौंदर्य, शूर- शौर्य.

**गट १-** पहिले अक्षर अकारान्त- भाववाचक नामात आकारान्त होते. **गट २-** पहिले अक्षर इकारान्त- भाववाचक नामात ऐकारान्त होते. **गट ३-** पहिले अक्षर उ किंवा उकारान्त- भाववाचक नामात औकारान्त होते.

**-यास्मिन शेख**

लोकसत्ता Mon, 12 September 2022
https://epaper.loksatta.com/c/70090447



# घुसळणाऱ्यापेक्षा उकळणाऱ्याची चैन

**ताक करून** लोणी काढणे, लोणी काढल्यावर लोणी कढवणे आणि मग लोणी कढवल्यावर त्याचे तूप तयार करणे ही प्रक्रिया खूप परिश्रम करून साध्य होणारी असते. लोणी उकळल्याशिवाय तूप मिळत नाही, हे खरे आहे पण घुसळण्याच्या प्रक्रियेपेक्षा उकळण्याची प्रक्रिया सोपी असते. त्याला कमी श्रम पडतात. घुसळणाऱ्याचे श्रम फारसे गृहीत धरले जात नाहीत. लोणी कढवणारा तेवढा लक्षात राहतो आणि तोच बहुदा सारे श्रेय लाटतो. कमी श्रम करतो त्याला लाभ जास्त! ही येथील परंपरेनुसार चालत आलेली समाजव्यवस्था आहे. त्यावर या म्हणीने नेमके बोट ठेवलेले आहे. वर्तमान स्थितीचे निरीक्षण आपण केले, तर आपल्याला या म्हणीतील तथ्य ताबडतोब लक्षात येईल. इतकी ही मार्मिक म्हण आहे. आणि बहुतेक क्षेत्रांत हीच परिस्थिती आहे, हे कटू सत्यही आपल्या निदर्शनास येईल.

उदाहरणार्थ शेतीचा व्यवसायच बघा ना! शेतात राबणारे हात राब राब राबून धान्य पिकवतात, पीक काढतात पण त्याला दाम कमी मिळतो आणि जास्तीत जास्त कमाई होते ती तो माल बाजारात नेऊन विकणाऱ्या दलालाची. किंवा रस्ते बांधणारे मजूर! उन्हातान्हात काम करून निढळाचा घाम गाळून दिवसभर कष्ट उपसतात पण जास्तीत जास्त



लाभ उकळतो तो कंत्राटदारच! विचार केला तर अशी अनेक उदाहरणे आढळतील.

राबणारे खरे हात असेच दुर्लक्षित राहतात आणि फुकट श्रेय लुटणारे बरेच हात आपल्याला नेहेमीच पाहायला मिळतात. आपण अनेक चळवळी पाहिल्या आहेत तिथेही हीच स्थिती दिसते. त्या चळवळींसाठी अहोरात्र कष्ट करून जिवावर उदार होऊन काम करणारे अनेक लोक अंधारात राहतात. पण त्यांच्या परिश्रमांवर मोठे होणारे मात्र मस्तपैकी मिरवून घेताना दिसतात. हीच जगाची रीत आहे. 'ताक घुसळणाऱ्यापेक्षा उकळणाऱ्याची चैन आहे!'

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com





# वाक्प्रचार : थोडे ‘सिंहावलोकन’



**मनुष्यप्राण्याला भोवतालच्या** प्राण्यांविषयी कुतूहल असतेच! भाषाविकासाच्या वाटचालीचे सिंहावलोकन केले की पाळीव प्राण्यांपासून जंगली श्वापदांपर्यंत अनेकांनी वाक्प्रचारांमध्ये कसे स्वत:चे ठसे उमटवले आहेत, हे लक्षात येते.

‘सिंहावलोकन करणे’ हा वाक्प्रचारच लक्षात घेऊ या! सिंहाच्या एका लकबीवरून हा वाक्प्रचार रूढ झाला आहे. सिंह चालताना आपण किती वाटचाल केली, याचा अंदाज घेण्यासाठी मध्येच मागे वळून बघतो. मानवी व्यवहारातही ही कृती अनुकरणीय ठरली आहे. त्यामुळे एखादे काम करताना आपल्या वाटचालीचे परीक्षण करून पुढची दिशा ठरवण्याची मर्मदृष्टी घेणे, असा त्याचा सुचवलेला अर्थ ठरतो.

‘ताटाखालचे मांजर होणे’ म्हणजे मिंधे होणे. पाळीव प्राण्यांमध्ये आपल्या मोहक हालचालींमुळे मांजर लाडकी असते. मात्र तिच्या जिभल्या चाटण्याच्या सवयीमुळे बहुधा हा वाक्प्रचार रूढ झाला असावा. लोकमान्य टिळकांनी आपल्या एका लेखात ब्रिटिश सरकारला सुनावले होते : ‘आमच्या युनिव्हर्सिट्या, कॉलेजे, सरकारच्या ताटाखालची मांजरे होत.’

‘गेंड्याचे कातडे पांघरणे’ म्हणजे निगरगट्ट असणे होय. गेंड्याच्या अंगावरची त्वचा तीन घड्या असलेली, जाड जणू चिलखतासारखी असते. त्यामुळे त्याची कातडी इतर प्राण्यांपेक्षा बधिर असते. म्हणून हा वाक्प्रचार रूढ झाला. उदा. जातिवंत लेखकाला गेंड्याची कातडी पांघरून समाजात वावरता येत नाही.

‘शेपूट हलवणे’ हा वाक्प्रचार ऐकताना कुत्र्याची आठवण येते. कुत्रा हा पाळीव प्राणी आहे. तो धन्यापुढे शेपूट हलवत लाडीगोडी करत असतो. त्यामुळे शेपूट हलवणे म्हणजे खुशामत करणे, असा अर्थ रूढ झाला आहे. ‘घोडामैदान जवळ येणे’, हा वाक्प्रचार देखील रूढ आहे. याचा अर्थ आहे, परीक्षेची वेळ जवळ येणे. घोड्याची चाल पारखण्यासाठी त्याला मैदानात नेतात. तेथे त्याची परीक्षा केली जाते. त्यामुळे हा वाक्प्रचार व्यापक अर्थाने कसोटीची वेळ जवळ येणे असा अर्थ सुचवतो. उदा. उमेदवारांना निवडणुकांच्या वेळी घोडामैदान जवळ असल्याची जाणीव होत असणार.

प्राण्यांच्या स्वभाववैशिष्ट्यांचे निरीक्षण करून योजलेले असे वाक्प्रचार भाषा समृद्ध करण्याचे काम करत आले आहेत.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# ‘वायरी’ आणि ‘एजन्स्या’

“**साहेब, कितीही** एजन्स्या बघा, अशा वायरी मिळणार नाहीत.” ‘एजन्स्या’ आणि ‘वायरी’? खटकलं की काही? पण बरोबर आहेत ही अनेकवचनं. वायर आणि एजन्सीसाठी मराठी प्रतिशब्द सुचवू शकतो आपण. पण जर हेच शब्द तद्भव करून घ्यायचे असतील तर ‘एजन्सीज’ आणि ‘वायर्स’ ऐवजी हेच म्हणायला हवं.

शब्दांच्या वर्गीकरणात तत्सम आणि तद्भव या संज्ञा अनुक्रमे ‘संस्कृतमधून मराठीत जसेच्या तसे आलेले शब्द’ आणि ‘संस्कृत शब्दांत काही बदल होऊन मराठीत रूढ झालेले शब्द’ यासाठी योजल्या जातात. पण आता या संज्ञा संस्कृतपुरत्या मर्यादित न ठेवता इतर कोणत्याही भाषेतून मराठीत आलेल्या शब्दांसाठी विस्तारायला हव्या असं वाटतं.

तत्सम शब्दांची मराठीमधली स्थिती पाहू या. कवी, प्रीती, स्मृती, मंत्री असे संस्कृत ऱ्हस्वान्त शब्द हे अंत्य अक्षर दीर्घ लिहिण्याच्या मराठीतल्या नियमामुळे दीर्घान्त होतात; म्हणजे एकप्रकारे तद्भव होतात, पण तरी ते तत्सम मानले जातात. हेच शब्द जर सामासिक शब्दात प्रथमपदी आले तर पुन्हा मुळानुसार ऱ्हस्व लिहिले जातात. उदा. मंत्री आणि मंत्रिमंडळ. त्याचबरोबर विष, गुण, मंदिर, परीक्षा असे अनेक तत्सम शब्द मराठीच्या इकार-उकाराच्या नियमांना आणि सामान्यरूपाच्या



नियमांना अपवाद ठरतात. ‘मूर्ती’ सारख्या काही तत्सम शब्दांची अनेकवचनंही मराठीप्रमाणे होत नाहीत. जे मराठी पद्धतीनुसार ‘मूत्र्या’ लिहितात, त्यांना हा अपवाद समजून घ्यावा लागतो. अर्थात भाषेसाठी नियम असायला हवेच, काही अपवादही राहणार, पण त्यात आवश्यक ते बदलही होत राहावे, अशी मागणी अभ्यासकांनी पूर्वीही केली आहेच, आता ती प्रकर्षाने जाणवत आहे. नियम बदलणं, ते सर्वांपर्यंत पोहोचवणं हे सोपं नाही, पण काहीतरी मार्ग शोधायला हवा.

जेव्हा एखादा शब्द तत्सम गणला जातो, तेव्हा तो मराठी लेखननियमांना अपवाद ठरतो, असं दिसतं. मग त्याचप्रमाणे आज मराठीत येणारे अनेक इंग्रजी शब्दही तद्भव न होता आपलं तत्समत्व राखून येत आहेत, हे आपल्या लक्षात येत आहे का? याबाबत अधिक चर्चा पुढच्या लेखात.

**– वैशाली पेंडसे-कार्लेकर**

vaishali.karlekar1@gmail.com





# सत्यम्, शिवम्, सुंदरम्

**'सत्यम्, शिवम्,** सुंदरम्' हा राजकपूरचा १९७८ साली प्रदर्शित झालेला हिंदी चित्रपट. लक्ष्मीकांत-प्यारेलाल यांनी स्वरबद्ध केलेल्या आणि लता मंगेशकर यांनी गायलेल्या शीर्षगीतामुळे ते शब्द घरोघर पोहोचले. अर्थात त्यापूर्वीपासूनच हे तीन शब्द म्हणजे अनेकांना भारतीय संस्कृतीचा एक आदर्श वाटतो आणि त्यांचे मूळ संस्कृतात असणार याविषयी आपली खात्रीच असते. पण प्रत्यक्षात ही शब्दत्रिवेणी म्हणजे 'The True, The Beautiful and The Good' या व्हिक्टर क्यूझं (Victor Cousin, फ्रेंच उच्चार वेगळा आहे) या फ्रेंच लेखकाने १८५३ साली लिहिलेल्या पुस्तकाचे शीर्षक आहे. मानवी जीवनाची सार्थकता कशात आहे याची मीमांसा करणारे हे पुस्तक खूप गाजले. ओ. डब्लू. वाईट (O. W. Wight) या इंग्लिश लेखकाने पुढच्याच वर्षी त्याचा इंग्रजी अनुवाद, शीर्षकातील शब्दांची किंचित अदलाबदल करून, अमेरिकेत प्रकाशित केला आणि त्याचवेळी ते पुस्तक बंगालमध्येही पोहोचले. श्री. म. माटे यांनी 'रोहिणी' मासिकात याच शीर्षकाचा एक लेख लिहिला होता व हे वचन मूळ भारतीय नसून इंग्रजीतून आलेले आहे, असेही त्यात नमूद केले होते. संशोधक वृत्तीच्या दुर्गाबाई भागवत यांच्या वाचनात १९४०-४२ च्या सुमारास तो लेख आला. अधिक शोध घेतल्यावर एशियाटिक सोसायटीच्या मुंबईतील ग्रंथालयात दुर्गाबाईंना तो इंग्रजी अनुवाद मिळाला व त्याचा बंगाली अनुवाद झाल्याचेही कळले. पण त्या इंग्रजी वचनाचे इतके सुंदर भारतीयीकरण कोणी केले हे मात्र स्पष्ट होत नव्हते. दुर्गाबाईंनी त्या बंगाली अनुवादाची छायाप्रत कोलकाता येथील केंद्रीय ग्रंथालयातून मागवली आणि तेव्हा रवीन्द्रनाथ टागोर यांचे वडील बंधू ज्योतिरिन्द्रनाथ यांनी तो बंगाली अनुवाद 'सत्यम्, शिवम्, सुंदरम' या शीर्षकाखाली केल्याचे स्पष्ट झाले. दुर्गाबाईंची व्यासंगी वृत्ती यातून दिसते आणि त्याचबरोबर आपण आपल्या संस्कृतीचे मानलेले आदर्श हा खूपदा जागतिक वारसा असतो हेही लक्षात येते. 'स्वातंत्र्य, समता, बंधुता' हा असाच एक आदर्श. याचे मूळ आहे 'लिबर्टी, इक्वालिटी, फ्रॅटर्निटी' (liberty, equality, fraternity) या १७८९ सालच्या फ्रेंच राज्यक्रांतीने आपल्यापुढे ठेवलेल्या तीन आदर्शांत. जगभर सर्वांनाच ते प्रेरणादायी वाटले आणि पुढे ती उक्ती भारताच्या राज्यघटनेतही भारतीय समाजापुढचा आदर्श म्हणून समाविष्ट केली गेली.

– भानू काळे
bhanukale@gmail.com





# ‘निर्दयी नाही; निर्दयच

**पुढील दोन** वाक्ये वाचा-

(१) माझ्या सहृदयी मित्राने त्या गरीब, उपाशी मुलांना भरपूर खाऊ देऊन तृप्त केले.

(२) आपल्या हाताखाली काम करणाऱ्या निरपराध कामगारांना छळणारे निर्दयी अधिकारी पाहिले, की माणुसकीवरच्या आपल्या विश्वासाला तडा जातो.

पहिल्या वाक्यात ‘सहृदयी’ आणि दुसऱ्या वाक्यात ‘निर्दयी’ या विशेषणांची रूपे सदोष आहेत. योग्य विशेषणे आहेत- सहृदय आणि निर्दय. या विशेषणांना ईकारान्त रूप देण्याची मुळीच आवश्यकता नाही. पण अशी रूपे मराठी भाषकांच्या बोलण्यात व लेखनातही वारंवार आढळतात.

सहृदय-(विशेषण) अर्थ आहे- माणुसकी वा कळवळा आहे असा, दयाळू, प्रेमळ. या शब्दात ‘हृदय’ या नपुंसकलिंगी नामाला ते केवळ एक इंद्रिय आहे, असा अर्थ नसून अंतःकरण, मन, काळीज असे अर्थ आहेत. सहृदय म्हणजे ज्याचे अंतःकरण दुसऱ्याच्या दुःखाने व्यथित होते असा. आणखी एक विशेषण पाहा- हृदयशून्य- या विशेषणाचा अर्थ आहे, माणुसकी नसलेला, दुसऱ्याच्या दुःखाने व्याकुळ न होता उलट आनंदित होणारा, दुष्ट. सहृदयच्या विरुद्ध अर्थी हे विशेषण प्रचारात आहे. सहृदय हा संस्कृतातून मराठीने स्वीकारलेला तत्सम शब्द असला, तरी संस्कृतात या शब्दाचे अनेक अर्थ आहेत. संस्कृत अर्थ- दयाळू, सरळ मनाचा, विद्वान, रसिक, आवड असलेला. मराठीने या विविध अर्थांपैकी सुरुवातीला दिलेले अर्थच स्वीकारले आहेत.

निर्दय (वि.) अर्थ- दया नसलेला, कठोर, निष्ठुर, कठोर अंतःकरणाचा, दयाहीन.

या दोन्ही विशेषणांचे सहृदयी, निर्दयी अशी ईकारान्त रूपे करणे अत्यंत चुकीचे आहे. वरील वाक्ये- १) ‘माझ्या सहृदय मित्राने...तृप्त केले.’ २) ...निरपराध कामगारांना छळणारे निर्दय अधिकारी पाहिले... तडा जातो.

आता अशी काही अकारान्त विशेषणे पाहा-

निर्भय, दुर्बळ, जटिल, निष्प्रभ, निर्मळ, द्वैभाषिक, चिंतातुर, निस्सीम.

हृदयंगम, हृदयद्रावक, लक्षवेधक, अरसिक, सुरूप, कुरूप, सजीव, सगुण इ. अशा अकारान्त विशेषणांचे ईकारान्त रूप आपण कधीच करत नाही. मग सहृदय, निर्दय या अकारान्त शब्दांना अपवाद का? मराठी भाषकांनी मराठीतील इतक्या समर्पक शब्दांची अवहेलना करू नये.

**-यास्मिन शेख**





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# घरच्या चिंचेने दात आंबतात

**काही माणसांना** घरातले काहीच पसंत पडत नाही, पण बाहेरच्या गोष्टी मात्र त्यांना गोड लागतात. या माणसांचा स्वभावच असा असतो की घरची चिंच त्यांना आंबट लागते पण तीच चिंच बाहेरच्यांची असेल तर गोड लागते. वास्तविक सगळीकडची चिंच चवीला सारखीच. घरची ती नावडती आणि बाहेरची मात्र आवडती असा मथितार्थ!

चिंचेविषयीची ही म्हण आता घराघरातून वापरात आणावी लागेल अशी आहे. घराघरात आजकाल हा एक ठरलेला वाद असतो. आणि तो वाद बहुदा घरातली आई आणि तारुण्यात आलेली मुले यांच्यामध्ये विशेषत्वाने होतो. आईने काहीही करावे आणि मुलांच्या पसंतीला ते उतरू नये ही गोष्ट आता नित्याचीच झालेली आहे. आईच्या हातच्या थालीपीठाची जागा आता पिझ्झ्याने घेतलेली आहे. एक काळ असा होता, की दमून भागून घरी आल्यावर आजीने भरवलेला दहीभात खाऊन मन आणि क्षुधा दोन्ही गोष्टी तृप्त होत असत. पण आता तसे होत नाही. घराघरातून ती आजी आणि तिने कालवलेला तो दहीभात, दोन्ही गोष्टी कुठे गायबच झालेल्या आहेत. सगळ्या घरातून अशी स्थिती असेल असे नाही, पण बहुतेक घरातून



आज अशीच स्थिती आहे हे नाकारून चालणार नाही. घरी केलेली पुरणपोळी, कांद्याची भजी, त्यांचा तो खमंग वास, ते गरम गरम थालीपीठ... त्यावरचा तो लोण्याचा गोळा...ती लिंबाच्या लोणच्याची फोड, सारे सारे या नवीन पिढीच्या धावपळीच्या जीवनात हरवून जाणार की काय, अशी शंका घेण्यास भरपूर वाव आहे असेच म्हणावे लागेल. आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे, या वस्तू पैसे टाकून मिळतील हो; पण आईच्या, आजीच्या हाताची चव, ती लज्जत कशी मिळणार? मग एखाद्या नातवंडाच्या पाठीत धपाटा घालून आजी म्हणणारच ना त्याला, की बरोबरच आहे रे, 'घरची चिंच तुला आंबटच लागणार बाबा! घरचं ते आळणी आणि बाहेरचं ते मिठ्ठापाणी!'

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचार आणि वनस्पती



**सृष्टीतील विविध** घटकांना स्वतःत सामावून घेणारी भाषा विविध वनस्पतींमुळेही सहजपणे बहरत असते. 'तुळशीपत्र ठेवणे', या वाक्प्रचाराचा अर्थ आहे हक्क सोडणे, अर्पण करणे. एखाद्या वस्तूवर तुळशीचे पान ठेवून ती वस्तू कृष्णार्पण करण्याची पद्धत आहे. उदा. 'देशाच्या स्वातंत्र्यासाठी अनेकांनी आपल्या घरादारावर तुळशीपत्र ठेवले होते.'

'हरभऱ्याच्या झाडावर चढवणे' म्हणजे खोटी स्तुती करणे. हरभऱ्याचे झाड नाजूक असते, ही वस्तुस्थिती लक्षात घेतली की या वाक्प्रचारातील मर्म लक्षात येईल. आपला स्वार्थ साधण्यासाठी एखाद्याला हरभऱ्याच्या झाडावर चढवण्याचा उद्योग केला जातो. व्यक्ती चाणाक्ष असेल, तर ती त्या खोट्या स्तुतीला दाद देत नाही. म्हणजेच ती व्यक्ती हरभऱ्याच्या झाडावर चढत नाही!

'विडा उचलणे' या वाक्प्रचाराचा उपयोग ऐतिहासिक लेखनात आढळतो. विडा करण्यासाठी नागवेलीचे पान वापरतात. मुळात विड्यांना आपल्याकडे ऐतिहासिक आणि सांस्कृतिकदृष्ट्या महत्त्व आहे. पूर्वी दरबार बरखास्त करताना, मोहिमेवर जाणाऱ्यास निरोप देताना तबकात मांडलेले विडे देण्याची चाल असे. त्यातून विडा उचलणे हा वाक्प्रचार रूढ झाला. त्याचा अर्थ आहे कठीण आव्हान स्वीकारणे. पुढे प्रत्यक्ष तबकातील विडा न उचलताही या वाक्प्रचाराचा वापर सुरू राहिला. उदा. राम गणेश गडकरी यांनी 'एकच प्याला' या नाटकात या वाक्प्रचाराचा उपयोग करून श्लेष साधत विनोदनिर्मिती केली आहे, ती अशी : 'अमका म्हणतो आजपासून चहा सोडला, तमक्यानं विडासुद्धा न खाण्याचा विडा उचलला!'

'पळसाला पाने तीन' हा वाक्प्रचार वस्तुस्थितीदर्शक आहे. लालभडक पाने असलेला पळसाचा वृक्ष त्याच्या तीन पानांच्या वैशिष्ट्यपूर्ण रचनेमुळे उठून दिसतो. त्यामुळे स्थलकालनिरपेक्ष समान तत्त्व सांगण्यासाठी हा वाक्प्रचार वापरतात. कोकणात जास्त पाऊस पडतो, म्हणून तिथे पळसाला चार पाने फुटणार नाहीत! 'पळस गेल कोकणा, तीन पाने चुकेना' असे म्हटले जाते.

असे अनेक वाक्प्रचार आढळतील. अंगणातल्या तुळशीपासून जंगलातल्या वृक्षांपर्यंत नाना वनस्पती आपापला स्वभाव व संदर्भविश् उलगडत वाक्प्रचारांमध्ये रुजल्या आहेत.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.co





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# मराठीचा पोर्तुगीज शेजार...

**महिन्याचा पहिला** दिवस उजाडला की अर्थातच आठवण होते ती पगाराची! आपण 'मासिक वेतन' असं न म्हणता सहजी 'पगार' म्हणून जातो. ठरावीक मुदतीच्या श्रमाबद्दल मिळणारा मेहनताना याबद्दल वापरला जाणारा पगार हा शब्द पोर्तुगीज आहे! पोर्तुगीज शब्द आहे पागा म्हणजे वेतन आणि पगार म्हणजे पैसे देणे.

पंधराव्या शतकाच्या आरंभी पोर्तुगीज भारतात आले आणि १९७० पर्यंत त्यांची गोमांतकावर सत्ता होती. त्यातून पुष्कळ पोर्तुगीज शब्द मराठीत आले. ख्रिस्ती धर्मोपदेशकांसाठीचा 'पाद्री' हा शब्द पोर्तुगीजच.

अत्यंत गोड असणारं, लहानथोरांचं आवडतं फळ म्हणजे पपई. पोर्तुगीजांनी हे फळ भारतात इसवी सन १४९५ मध्ये आणलं. तसंच त्यांनी आणलेलं दुसरं फळ म्हणजे अननस हे होय. पपया आणि अननस हे दोन शब्दही मराठीला पोर्तुगीजांनी दिले आहेत. चहा पिण्याची चिनी मातीची गोल ताटली एवढं वर्णन करून सांगण्यापेक्षा बशी म्हटलं की पटकन कळतं. हा शब्दही पोर्तुगीज बसिया या शब्दावरून मराठीत आला आहे. पोर्तुगीज पाँपा या शब्दावरून बंब हा शब्द आल्याचं सांगितलं जातं. पाणी गरम करण्यासाठी वापरलं जाणारं, पाणी भरण्याचं मोठं पिंप या अर्थानेच तो आपण वापरतो.



भारतात सर्वत्र पसंत असणारी एक प्रकारची तिखट वनस्पती, जी खाऊ नये तरीही मळली जाते, ती म्हणजे तंबाखू! हा मूळ शब्द नळी किंवा चिलीम असा होता, नंतर वनस्पती आणि नंतर त्यापासून येणारा कैफ असा झाला. ही वनस्पती परक्या देशातून भारतात आली. तंबाखूचा प्रवेश इसवी सन १६०४ च्या सुमाराचा आहे आणि हा शब्दही त्याच वेळेचा आहे. कोलंबसने आपल्याबरोबर ही वनस्पती आणि तिचं नाव अमेरिकेहून युरोपात आणलं. युरोपातून पोर्तुगीज खलाशांमार्फत ही वनस्पती हिंदुस्थानात आली. आता हे शब्द इतके रुळलेले आहेत की त्यांना पर्यायी मराठी शब्द सुचविले तरी ते किती वापरात येतील ही शंकाच आहे!

–निधी पटवर्धन
nidheepatwardhan@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# इंडिया, हिंदुस्तान आणि विलायत

**आपल्यासाठी आपला** देश हा 'भारत' असला तरी जगभर त्याचा उल्लेख 'इंडिया' असाच केला जातो. हस्तिनापूरचा सम्राट दुष्यंत आणि शकुंतला यांचा पुत्र भरत याच्यावरून 'भारत' हे नाव पडले असावे असे म्हटले जाते. पण भारतीय राज्यघटनेत 'इंडिया दॅट इज भारत' असे दोन्ही शब्द आपल्या देशाचा उल्लेख करताना वापरले गेले आहेत. 'इंडिया' शब्दाचा उल्लेख ग्रीक इतिहासकार हिरोडोटस याने इसवीसनपूर्व पाचव्या शतकात प्रथम केला आहे.

तिबेटमधल्या मानसरोवरात उगम पावणाऱ्या इंडस नदीवरून 'त्या नदीच्या पलीकडे असणारा देश' या अर्थाने इंडिया शब्द वापरला गेला. अमेरिकेत पोहोचलेल्या कोलंबसचा उद्देश भारतात पोहोचणे हा होता व त्यामुळे तेथील स्थानिक लोकांना त्याने 'इंडियन' म्हटले. त्यांची अधिक लोकवस्ती असलेल्या अमेरिकेतील प्रांताला 'इंडियाना' हे नाव दिले गेले. पुढे परकीय व्यापारासाठी स्थापन झालेल्या युरोपीय कंपन्यांच्या नावातही 'इंडिया' हाच शब्द आहे. ईस्ट इंडिया कंपनी हे फक्त इंग्रजांच्या कंपनीचे नाव नव्हते; डच किंवा फ्रेंच लोकांच्या कंपन्यांचे नावही तेच होते! डच ईस्ट इंडिया कंपनी किंवा फ्रेंच ईस्ट इंडिया कंपनी! फ्रेंच भाषेत इंडिया शब्दाचे 'इंडिज्' हे रूप प्रचलित झाले आणि तेही जगभर पोहोचले. वेस्ट इंडिज किंवा इंडोचायना किंवा इंडोनेशिया या लांबलांबच्या प्रदेशांच्या नावांतही 'इंडिज'चा समावेश झाला. 'इंडिया दॅट इज भारत' या आपल्या देशाशी निदान नावापुरतेतरी हे परदेश जोडले गेले!

'हिंदू' हा शब्द सिंधू (इंडस) या नदीवरून आला. पर्शियन भाषेत 'स'चा उच्चार 'ह' असा होत असल्याने 'सिंधू'चे 'हिंदू' झाले आणि त्यांची वस्ती असलेला देश म्हणून हिंदुस्तान. अनेक देशांत आजही आपल्या देशाचा उल्लेख 'हिंदुस्तान' असाच होतो.

'विलायत' हा शब्द आपल्याकडे पूर्वीपासून 'युरोप' या अर्थी वापरला जाई. 'त्याने खास विलायती कपडे घातले होते', किंवा 'उच्च शिक्षणासाठी त्याने विलायतेला प्रयाण केले' वगैरे. या शब्दांची व्युत्पत्ती मजेशीर आहे. पूर्वी अफगाणी लोक स्वतःच्या देशाला 'विलायत' असे म्हणत.

पुढे 'मायदेश' या अर्थाने तो शब्द अरबांच्यामार्फत युरोपात रूढ झाला. स्वतःच्या देशाला युरोपीय राष्ट्रे 'विलायत' असे संबोधू लागले. भारतात मात्र फक्त युरोपलाच 'विलायत' म्हटले गेले.

– भानू काळे
bhanukale@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# ‘विमोचन’ या शब्दापासून मराठीला सुटका हवी !

**‘त्या लेखकाच्या** नव्या पुस्तकाचा ग्रंथविमोचन समारंभ एका श्रेष्ठ साहित्यिकाच्या हस्ते पार पडला.’

या वाक्यातील ‘ग्रंथविमोचन समारंभ’ ही शब्दयोजना सदोष आहे.

या शब्दातील मोचन (नाम, नपुसकलिंगी) हा संस्कृत शब्द आहे. या शब्दाचा अर्थ आहे- स्वतंत्रता, मोकळीक, मुक्तता, सुटका, मुक्ती. ‘मोचन’ या नामातील मूळ धातू आहे- मोच (सं)- मुच्- मोचणे. या क्रियापदाचा अर्थ आहे- मोकळा करणे, सोडणे, मुक्त करणे. मोचन या शब्दाला ‘वि’ हा उपसर्ग लागला की, सिद्ध होतो शब्द- विमोचन. विमोचन (नाम, नपुसकलिंगी) अर्थ- सुटका, मोकळीक, मुक्ती, मुक्तता. ‘वि.’ हा उपसर्ग लागल्याने ‘मोचन’ या शब्दाच्या अर्थात काहीही वेगळेपण नाही, हे आपल्या लक्षात येईल. उलट, मोचन या शब्दाच्या अर्थात भर पडते. ग्रंथविमोचन समारंभ या वरील वाक्यातील शब्दाचा अर्थ होईल- ग्रंथाची मुक्तता किंवा सुटका करण्याचा समारंभ. हा समारंभ नव्या पुस्तकाची सुटका किंवा मुक्तता करण्यासाठी नाही, तर या नव्या ग्रंथाचे (पुस्तकाचे) प्रकाशन करण्यासाठी आहे. ‘ग्रंथविमोचन’ हा शब्द अत्यंत दोषपूर्ण आहे.

प्रकाशन (संस्कृत नाम, नपुं.) अर्थ- प्रसिद्ध करणे, प्रकाशित करणे. प्रकाशक (नाम, पुल्लिंगी) अर्थ- प्रसिद्ध करणारा, पुस्तके, ग्रंथ इ. लिखित साहित्य प्रसिद्ध करणारा.

एखाद्या भाषेत प्रकाशनऐवजी विमोचन, ‘ग्रंथप्रकाशन’ ऐवजी ग्रंथविमोचन असा शब्द रूढ असला, तरी मराठी भाषेत ‘ग्रंथप्रकाशन’ हेच योग्य रूप आहे. परभाषेतील शब्दांचे मराठीत (संस्कृताप्रमाणे) वेगळेच अर्थ असतील, तर रूढ असलेले योग्य शब्द मराठी भाषकांनी, लेखकांनी का नाकारावेत ?

‘वि’ हा उपसर्ग लागून मराठीत अनेक शब्द उपलब्ध आहेत. मात्र ‘वि’ या उपसर्गामुळे प्रत्येक शब्दाचा विरुद्ध अर्थ होतोच असे नाही.

काही शब्द पाहा-

विरुद्धार्थी शब्द- विसंगत, विरस, विरूप, विवस्त्र, विवर्ण, विसंवाद, विस्मरण, वियोग, विधर्मी, विषम इ.

शब्दाला ‘वि’ उपसर्ग लागून त्याचा अर्थ थोडा अधिक व्यक्त करणारे- विविध, विशुद्ध, विकास, विख्यात, विनाश, विश्रुत, विजय, विघातक, विनम्र इ.

– यास्मिन शेख





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# म्हणींचे काव्य

नुकतेच 'म्हणींचे काव्य' हे एक जुने पुस्तक वाचनात आले. त्या पुस्तकाची प्रस्तावना प्रा. राम शेवाळकर यांनी लिहिली आहे. ते प्रस्तावनेत म्हणतात, 'म्हणी म्हणजे त्या त्या भाषेतील सूत्रमय लोकवाङ्मय. माणसाचे शहाणपण म्हणींच्या रूपाने शब्दांच्या संपुटात साठवलेले असते. म्हणींमुळे बोलण्यातील अनावश्यक पाल्हाळाला आपोआप आळा बसतो. अभिव्यक्तीचे सामर्थ्य सर्वांमध्येच असते असे नाही. अशांच्या सहायार्थ म्हणी आपुलकीने धावून येतात. घागरीमध्ये सागर भरावा तसा मोजक्या शब्दांमध्ये व्यापक आणि सखोल जीवनार्थ साठवणाऱ्या म्हणी प्रतिभावंतांच्याच मेंदूतून जन्म घेत असतात. यापैकी काही प्रतिभावंत सर्वज्ञात असतात तर असंख्य अज्ञात असतात. अशांची प्रतिभा म्हणींच्या रूपाने त्यांचे प्रतिनिधित्व करीत असते.'




'म्हणींचे काव्य' या पुस्तकात द. वि. गंधे यांनी काही म्हणींना 'आर्या वृत्ता'त बांधण्याचा खूप चांगला प्रयत्न केला आहे. त्यापैकी काही येथे उद्धृत करण्याचा मोह होतो आहे.

म्हण- *'झाकली मूठ सव्वा लाखाची'*

झाकली आहे तोवरी सव्वा लाखाची मूठ ती समजा.<br>
उघडी केल्यावरती तुमच्या टिकणार नाहीत हो गमजा

म्हण- *'म्हैस कोणाची आणि ऊठ बस कोणाला'*

आहे म्हैस कोणाची होते ऊठ बैस कोणाला<br>
दुनिया अशीच आहे, लाथ कुणाला अन् त्रास कोणाला

म्हण- *'सुपातले हसतात आणि जात्यातले रडतात'*

हसतात ते सुपातील जात्यामधलेच ते रडतात<br>
जाणीव काय तयांना जाणार सुपातालेही जात्यात

म्हण- *'आडातच नाही तर पोहऱ्यात कुठून येणार?'*

आडात नाही मुळीही पोहऱ्यामध्ये कुठोनि येणार<br>
डोक्यात बुद्धी नाही त्याला सांगून काय होणार

म्हण- *'साखरेचं खाणार त्याला देव देणार'*

खाणार साखरेचा त्याला देणार देव हे नक्की<br>
माती खाणाऱ्याच्या नशिबी मातीची ढेकळे पक्की

गंधे यांनी अशाप्रकारे पहिल्या ओळीत म्हण आणि दुसऱ्या ओळीत त्या म्हणीचा लाक्षणिक अर्थ काव्यात गोवून सांगितला आहे.

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# मराठीत रुळलेले इतर भाषांमधील वाक्प्रचार

**कोणतीही भाषा** प्रवाही असते. मराठी भाषाही याला अपवाद नाही. मराठीतही इतर भाषांतील काही वाक्प्रचार रुळले आहेत. त्याची ही काही उदाहरणे आहेत.

संस्कृत भाषेतील काही अवतरणे आपण आजही वाक्प्रचारासारखी वापरतो. उदा. 'यावच्चंद्रदिवाकरौ' याचा अर्थ आहे, जोपर्यंत चंद्र आणि सूर्य आहेत तोपर्यंत. मराठीत एखाद्या गोष्टीची शाश्वती देताना हा शब्दप्रयोग केला जातो. उदा. लता मंगेशकर यांच्या स्वराची मोहिनी यावच्चंद्रदिवाकरौ टिकून राहील!

'अमुक व्यक्ती दशमग्रहामुळे अडचणीत!' असे वाक्य कधीतरी दृष्टीस पडते. यात ज्योतिषाच्या कुंडलीतील ग्रह अपेक्षित नाही. एका संस्कृत श्लोकाचा संदर्भ यामागे आहे. तो श्लोक असा :

''सदा वक्रः, सदा रुष्टः, सदा पूजामपेक्षते कन्याराशिस्थितो नित्यं जामाता दशमो ग्रहः'' म्हणजे नेहमी वाकडा, नेहमी रुसलेला, नेहमी मानपानाची अपेक्षा असणारा जावई हा सतत कन्या राशीला लागलेला दहावा ग्रह आहे! यात थट्टेने आलेला 'दशमग्रह' हा शब्द मराठीत कसा रूढ झाला आहे, ते पाहा : पु. ल. देशपांडे यांचा 'अंतू बर्वा' त्यांना म्हणतोः 'जास्त दिवस जावई राहिला की तो दशमग्रह होतो!' (व्यक्ति आणि वल्ली). 'भवति न भवति' (चर्चा / वाद), 'नरो वा कुंजरो वा '(संदिग्ध उत्तर देणे) ही अशी आणखी काही उदाहरणे आहेत.

'सिंहाचा वाटा' (मोठा, महत्त्वाचा भाग) हा वाक्प्रचार 'लायन्स शेअर' या इंग्रजी वाक्प्रचाराचा अनुवाद आहे. इसापच्या नीतिकथेतील एका गोष्टीशी याचा संबंध जोडला जातो. इतर प्राण्यांबरोबर केलेल्या शिकारीतील सर्वांत मोठा भाग सिंहाला हवा असतो, अशा आशयाची ती गोष्ट आहे. सांघिक कार्यातील एखाद्या व्यक्तीचे महत्त्वाचे श्रेय नोंदवताना मराठीत हा वाक्प्रचार वापरला जातो.

हिंदी भाषेतील काही वाक्प्रचार मराठीत रूढ आहेत. १९६७मध्ये हरियाणातील आमदार गया लाल यांनी एका पंधरवड्यात तीन वेळा पक्षांतर केले. त्यांच्या नावावरून 'आयाराम, गयाराम' हा वाक्प्रचार रूढ झाला. मराठीत हा वाक्प्रचार आजही वापरला जातो. अशी आणखीही उदाहरणे आढळतील. अशा वाक्प्रचारांतून भाषिक सौहार्द जाणवते, हे नमूद केले पाहिजे.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





# इंग्रजीतून आलेले तत्सम, तद्भव

**तत्सम आणि** तद्भव या संज्ञा अनुक्रमे 'संस्कृतमधून मराठीत जसेच्या तसे आलेले शब्द' आणि 'संस्कृत शब्दांत काही बदल होऊन मराठीत रूढ झालेले शब्द' यासाठी योजल्या जातात. पण आता या संज्ञा इंग्रजीसारख्या इतर कोणत्याही भाषेतून मराठीत आलेल्या शब्दांसाठी विस्तारायला हव्यात असं वाटतं.

इंग्रजांशी संपर्क आल्यानंतर अनेक इंग्रजी शब्द मराठीत आले. इंग्रजीमधील अॅ, ऑ मराठीत नसल्याने पूर्वी ब्यांक, ब्याट, डाक्टर असे उच्चार आणि लेखन होत असे. तेव्हापासून आजपर्यंत मराठीत स्थिरावलेल्या इंग्रजी शब्दांचे तत्सम आणि तद्भव असे वर्गीकरण करून पाहू. तद्भव शब्दांमध्ये दोन प्रकार दिसतात. एक म्हणजे तिजोरी (ट्रेझरी), पलटण (प्लाटून), फलाट (प्लॅटफॉर्म), बाटली (बॉटल) असे रूपात बदल होऊन आलेले शब्द आणि दुसरा म्हणजे कप, टेबल, पेन, शर्ट वांसारखे रूपात बदल न होता पण मराठी पद्धतीने लिंग, वचन आणि सामान्यरूप होणारे शब्द. हे इंग्रजी तद्भव शब्द अनौपचारिक बोलण्याबरोबरच लेखननियम पाळून औपचारिक लेखनातही स्थिरावलेले दिसतात.

मराठीतल्या इंग्रजी तत्सम शब्दांचं उदाहरण म्हणजे बस, कुकर, फोन, कार, ई-मेल,



कॉम्प्युटर, ऑफिस, बिल्डिंग, हॉस्पिटल असे अनेक शब्द. यातले बहुतेक शब्द नंतरच्या काळात मराठीत आले. यांना तत्सम म्हणण्याचं कारण म्हणजे या शब्दांचं लिंग ठरवता आलं तरी पूर्वीच्या इंग्रजी शब्दांप्रमाणे आपण बहुतेक जण त्यांचं सामान्यरूप आणि अनेकवचन करत नाही. उदा. कार - कारी (अनेकवचन), कारी-ला (सामान्यरूप). थोडक्यात अशा इंग्रजी शब्दांमध्ये आता आपण मराठीचे नियम लावून बदल करत नाही. त्यामुळेच हे इंग्रजी तत्सम शब्द बोलण्यात मोठ्या प्रमाणावर स्थिरावले असले तरी औपचारिक लेखनात त्यांना कोणते लेखननियम लावावेत याबाबत संदिग्धता आहे. या नवतत्सम शब्दांना मराठी करून घ्यायला त्यांना मराठीचे नियम लावायला हवे का? की त्यांच्यासाठी वेगळे नियम किंवा अपवाद करावे लागतील? की त्यांची इंग्रजीतली कार्स, ई-मेल्स, कॉम्प्युटर्स अशी रूपे मराठीतही स्वीकारावीत? तुम्हाला काय वाटतं?

– वैशाली पेंडसे-कार्लेकर
vaishali.karlekar1@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# मवाळ-जहाल, डावे-उजवे

**राजकीय चळवळीतून** नवे शब्द निर्माण होतात. लोकमान्य टिळकांनी वापरात आणलेला एक शब्द म्हणजे 'जहाल'. स्वातंत्र्यासाठी लढणाऱ्यांमध्ये दोन प्रमुख गट होते. एका बाजूला ब्रिटिश राजवटीचा फायदा घेऊन हळूहळू सामाजिक सुधारणा करून घ्याव्यात असे मानणारा, गोपाळ कृष्ण गोखले आणि फिरोजशहा मेहता यांच्या नेतृत्वाखालील गट होता; तर दुसऱ्या बाजूला ब्रिटिशांना आमच्या समाजात ढवळाढवळ करू देण्याऐवजी, राजकीय सुधारणाच झटपट करून घ्यायला हव्यात, असे मानणारा लोकमान्य टिळक आणि लाला लजपत राय यांच्या नेतृत्वाखालील गट होता.

१९०७ साली सुरत येथे भरलेल्या इंडियन नॅशनल काँग्रेसच्या अधिवेशनात ही दुही विकोपाला गेली, तिला हिंसक वळणही लागले. या दोन गटांना 'मवाळ' आणि 'जहाल' म्हटले गेले.

'सौम्य' या अर्थाने मराठीत 'मऊ' हा शब्द पूर्वीपासून रूढ होता व त्यामुळे 'मवाळ' हा शब्द स्वयंस्पष्ट होता. 'मवाळ गटाच्या विरोधातील' या अर्थाने 'जहाल' हा नवा शब्द टिळकांनी केसरीतील अग्रलेखात वापरला आणि आपल्या समर्थकांसाठी रूढ केला. याचा शब्दकोशीय अर्थ आहे तीक्ष्ण किंवा तिखट. फारसीतील 'जहालीम्' किंवा 'जालीम्' या शब्दावरून तो आला.

'डावे' आणि 'उजवे' असे दोन गट आपण नेहमीच करत असतो. या शब्दांची व्युत्पत्तीही मजेशीर आहे. १७८९ साली फ्रेंच राज्यक्रांतीच्या दरम्यान त्यांच्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनात प्रचंड गोंधळ उडाला आणि कोणाचेच बोलणे इतरांना समजेनासे झाले. त्या वेळी सभापतींनी "जुन्या व्यवस्थेच्या समर्थकांनी उजव्या बाजूला बसावे आणि बंडखोरांनी डाव्या बाजूला बसावे," असा आदेश दिला. त्यानुसार सदस्यांची विभागणी झाली आणि कोण कुठल्या बाजूला बसला आहे यावरून त्यांची मते लगेचच स्पष्ट झाली. हीच परंपरा फ्रान्समध्ये आणि जगातील इतरही देशांत रूढ झाली. कालांतराने 'उजवे' म्हणजे परंपरा, सुव्यवस्था, राष्ट्रवाद, मुक्त अर्थव्यवस्था यांना प्राधान्य देणारे म्हणजेच 'प्रतिगामी' आणि 'डावे' म्हणजे नवता, न्याय, समाजवाद, नियंत्रित अर्थव्यवस्था यांना प्राधान्य देणारे म्हणजेच 'पुरोगामी' असे मानले जाऊ लागले. आज 'प्रतिगामी' आणि 'पुरोगामी' यांच्या व्याख्याच विवाद्य झाल्या आहेत; पण 'डावे' आणि 'उजवे' हे शब्द मात्र वापरात आहेतच.

– **भानू काळे**
bhanukale@gmail.com

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# ‘अनु’ आणि ‘अन्’मधला फरक!

**हे वाक्य** वाचा - ‘या सभागृहाचे बांधकाम जरी पूर्ण झाले असले, तरी इतर अनेक अनुषंगिक कामे अजून पूर्ण झालेली नाहीत.’ वरील वाक्यात एक चुकीचा शब्द योजल्यामुळे वाक्य सदोष झाले आहे. तो शब्द आहे- अनुषंगिक. मूळ शब्द आहे- अनुषंग. (संस्कृत, नाम, पुल्लिंगी) अर्थ- निकट, संबंध, संगती. या नामाला ‘इक’ प्रत्यय लागून विशेषण सिद्ध होते- आनुषंगिक. पहिले अक्षर ‘अ’ चा ‘आ’ होतो. आनुषंगिक या विशेषणाचा अर्थ आहे - तत्संबंधी, बरोबर येणारे, आवश्यक, आणखी, गौण. वरील वाक्यात ‘आनुषंगिक’ हे ‘कामे’ या नामाचे विशेषण आहे. सभागृहाचे बांधकाम पूर्ण झाले; पण इतर आनुषंगिक कामे- उदा. सभागृहाचे रंगकाम, सभागृहाची खुर्च्यांची मांडणी, पंखे, दिवे, व्यासपीठावरील सामान व त्याची योग्य मांडणी इ. सभागृहातील इतर आवश्यक कामे पूर्ण झाली नाहीत, असा अर्थ अभिप्रेत आहे. मराठीत ‘अनुषंग’ हे नाम स्वतंत्रपणे वापरले जात नाही. फक्त एकच अपवाद- उदा. ‘तू जो विचार सांगितलास, त्या अनुषंगाने मला थोडा वेगळा विचार सांगायचा आहे.’ अनुषंगाने असे ‘ने’ प्रत्ययान्त रूप मराठी भाषेत योजलेले आढळते. ‘लोकसत्ता’च्या १३ सप्टेंबर २०२२ च्या अंकात दोन बातम्यांत ‘अनुषंगाने’ हा योग्य शब्द वापरलेला मी वाचला. शीर्षक- ‘आदिवासी महिलेचा संशयास्पद मृत्यू’ आणि ‘‘ज्ञानव्यापी’च्या सुनावणीचा मार्ग मोकळा.’’

‘आनुषंगिक’ यासारखाच आणखी एक शब्द आहे. आनुवंशिक - अनुवंश. (संस्कृत, नाम, पुल्लिंगी) अर्थ- वांशिक, परंपरा, घराण्यातील परंपरा. या शब्दाला ‘इक’ प्रत्यय लागून ‘आनुवंशिक’ हे विशेषण सिद्ध होते. या शब्दातही ‘अ’ चा ‘आ’ होतो. अर्थ- वंशपरंपरागत चालत आलेला. संस्कृतात अशी काही विशेषणे आहेत. अनुभव-आनुभविक, अनुमान- आनुमानिक. मात्र मराठीत वरील दोन विशेषणेच रुढ आहेत.

‘अनु’ पूर्वपदी असलेले अनेक तत्सम शब्द मराठीत आहेत. मात्र या शब्दांना ‘इक’ प्रत्यय लागत नाही. उदा. अनुकंपा, अनुकरण, अनुक्रम, अनुनय, अनुराग, अनुरूप, अनुग्रह, अनुमती, अनुमोदन इ. मात्र ‘अन्’ हा नकारार्थी उपसर्ग अग्रस्थानी असून पुढील शब्दात पहिले अक्षर ‘उ’ असेल, तर ‘अनु’ असे रूप होईल. (उदा. अनुपस्थित, अनुचित, अनुपयुक, अनुदार इ.) पण या शब्दांचा वरील शब्दांच्या यादीत समावेश करता येणार नाही. हे वाचकांच्या लक्षात आले असेलच.

– यास्मिन शेख





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# बहुत देखिले टिळे टाळे पण चिखलास नाही डोळे

**नातवाने आजीकडे** 'आज्जी गोष्ट सांग ना!' असा आग्रह धरला. आजीने त्याला गोष्ट सांगायला सुरुवात केली. 'एकदा काय झालं... एक जंगल होतं. त्यात एक भली मोठी मगर आणि एक कोल्हा रहात होता. त्या दोघांची खूपच दोस्ती झाली. एकदा कोल्ह्याने मगरीला आपल्या घरी जेवायला यायचं निमंत्रण दिलं. मग मगर त्याच्या घरी जेवायला गेली. पण कोल्हा होता लुच्चा. तो बसला झाडावर चढून! आणि खूप प्रेमाने त्या मगरीला म्हणू लागला. 'ये ना गं मगरताई ! जेवायचा बेत तर तुझ्या वहिनीने इतका झक्कास केला आहे की विचारूच नकोस.' पण मगर बिचारी झाडावर कशी चढणार? ती म्हणाली, 'अरे कोल्हेदादा, मला नाही बाबा झाडावर चढता येणार. पण आपण असं मात्र करू शकतो की तूच ये माझ्याकडे जेवायला. चालेल? आणि माझं घरही काही फार लांब नाही, आहे थोडा चिखल पण तू येऊ शकशील. चिखलात एक बीळ आहे. तेच माझं घर.' त्यालाही अद्दल घडवायचीच असं मनात ठरवून मगर तिथून निघाली. कोल्होबा ठरलेल्या वेळी गेले तिच्या घरी. तो धूर्त कोल्हा कसला फसतो! त्याने ओळखलं चिखलातल्या बिळासारखा भासणारा आपला जबडा उघडून ही बया आपली वाट बघत बसलेली आहे आणि तिचा आपल्याला खाण्याचा बेत आहे, तो म्हणाला, ''मगरताई ! मला एक सांगशील का गं? अनेक जण कपाळाला टिळे लावतात पण मला तर तुझ्या कपाळावर दिसत आहेत दोन चमकते डोळे! हे कसं काय? बहुत देखिले टिळे टाळे पण चिखलास नाही डोळे ! नको रे बाबा ते जेवण!'' आणि कोल्होबा तिथून पळाला. नातू आजीला म्हणाला, ''कोल्हा भले बहाद्दर! त्याने हुशारीने आपला प्राण वाचवला!''



– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# प्रवासदर्शक वाक्प्रचार

**प्रवास या** अनुभवातील काही कंगोरे वाक्प्रचारांमध्ये टिपलेले आढळतात. प्रवास कशासाठी करावयाचा यावरूनही वाक्प्रचार बदलतात. उदा. युद्धात 'कूच करणे' म्हणजे इशारतीचा नगारा वाजला की सैन्याने चालायला सुरुवात करणे. मध्येच न थांबता मार्गक्रमण करणे, यासाठी 'मजल दरमजल' असा वाक्प्रचार कोशात नोंदवण्यात आला आहे. आपण आज तो टप्प्याटप्प्याने केलेला प्रवास या अर्थाने वापरतो. मजल (मूळ अरबी शब्द मंझिल) म्हणजे जेथे पोहोचायचे आहे, ते ठिकाण. त्याच्याशी संबंधित 'मजल मारणे' म्हणजे प्रगतीचा पल्ला गाठणे हा वाक्प्रचारही रूढ आहे. पूर्वी प्रवासाची वेगवान साधने उपलब्ध नसल्यामुळे पायी प्रवास करावा लागत असे. त्यात प्रवासी 'मेटाकुटीला येणे' या वाक्प्रचाराचा अनुभव घेत असत. मेट/ मेटे म्हणजे गुडघ्याचा सांधा. मूळ शब्द होते- मेटे खुंटीस येणे. याचा वाच्यार्थ आहे, घातलेली मांडी काढून गुडघ्यावर उभे राहणे, नेटाने खेचणे. (घोडा चालताना थकला की त्याच्या ढोपरासंबंधी हे शब्द योजतात.) लक्ष्यार्थ आहे, प्रयत्नांची शिकस्त करून कंटाळणे.

विष्णुभट गोडसेभटजी यांचे 'माझा प्रवास' हे पुस्तक वाचताना १८५७ च्या काळातील प्रवासाचे



चित्र समोर येते. काही वेळ‌ा प्रवासात गंभीर प्रसंग गुदरतात. गोडसे भटजी यांनी 'झाशीची वाताहत' वर्णन करताना लिहिले आहे की इंग्रजांनी पाठलाग केल्यामुळे 'काही काही घोडेस्वार जिकडे ज्यास वाट फुटली, तिकडे निघोन गेले.' वाट फुटेल तिकडे जाणे म्हणजे वेळ, प्रसंग येईल त्याप्रमाणे- अगोदर काही न ठरवता जाणे.

प्रवासात दिशादर्शक असे मैलाचे दगड असतात. आपले जायचे ठिकाण किती लांब आहे, रस्ता कोणता आहे, याची कल्पना त्यामुळे येते. 'मैलाचा दगड' या वाक्प्रचाराचा अर्थ आहे लक्षणीय, दखलयोग्य. प्रवास करताना प्रदेशाची सीमा ओलांडली जाते. त्यातून आलेल्या 'सीमोल्लंघन करणे' या वाक्प्रचाराचा अर्थ आहे, 'रूढ चाकोरी ओलांडणे.' धार्मिक कारणांसाठी केलेल्या प्रवासाला यात्रा असे म्हणतात. आयुष्याच्या वाटचालीला प्रवासाचे रूपक योजले जाते. एखाद्या व्यक्तीचा मृत्यू झाला, हे सांगताना इहलोकीची यात्रा संपणे, हा वाक्प्रचार वापरला जातो.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





कांचन कराई द्वारा संकलित

# उपसर्गाची उदाहरणे

**'गाडी सुटली,** रुमाल हलले... क्षणात डोळे टचकन ओले' आता या इतक्या हळव्या कवितेत रुमालाला मराठी पर्यायी शब्द द्या असे म्हटले, तर काय द्यायचा? हिंदीत म्हणे 'करपट' म्हणतात, संस्कृतात 'करवस्त्र'. रूक्ष पद्धतीने मराठीत 'फडके' म्हटले तर त्यात बरीच अर्थव्याप्ती येते, त्याला त्या नाजूक साजूक रुमालाची भावनाही येत नाही.

मराठीत हा शब्द दोन अर्थांनी वापरतात; एक म्हणजे तोंड पुसावयाचे फडके आणि दुसरे डोक्याला बांधावयाचे फडके! निरनिराळ्या काळात या फडक्याची लांबी-रुंदी वाढत गेली आहे. हा शब्द फारसी. 'रू' म्हणजे चेहरा आणि 'माल' म्हणजे फडके. हा शब्द आपल्याकडे आला आणि आपण त्याला आपलाच मानला. भाषेत शब्द कसे तयार होतात हे पाहणे नेहमीच रंजक ठरते.

मराठी भाषेत उपसर्गघटित, प्रत्ययघटित, समासघटित आणि अभ्यस्त असे साधित शब्दांचे चार प्रकार येतात. उपसर्गघटित प्रकारामध्ये इंग्रजी शब्द जवळजवळ नाहीत. मात्र उपसर्गघटित फारसी व अरबी शब्द पुष्कळच पाहावयास मिळतात. फारसी व अरबीमधून मराठीत आलेले काही उपसर्ग म्हणजे ऐन, कम, गैर, दर, ना, बंद,



ब, बर, बिन, बे, बेला, ला, सर आणि हर! आता एकेक करून या उपसर्गांचे अर्थ पाहू या. ऐन म्हणजे मुख्य, पूर्ण किंवा पुष्कळ. ऐनउन्हाळ्यात, ऐनभरात, ऐनरंगात. 'कम' या फारसी उपसर्गाचा अर्थ आहे कमी किंवा अपुरा. कमजोर, कमनजर, कमअक्कल, कमकुवत. हा उपसर्ग काही मराठी शब्दांना सुद्धा लागतो, जसे कमनशीब, कमजात. 'गैर' म्हणजे वाचून किंवा विन- गैरहजर, गैरसमज, गैरकायदा. हा उपसर्ग काही मराठी आणि संस्कृत शब्दांना लागलेला पाहावयास मिळतो, जसे की गैरप्रकारचा, गैरमान्य, गैरमार्ग, गैररीत, गैरवळण, गैरसावध, गैरसोय. 'गैर' हा उपसर्ग अरबी मूळ 'घैर' आहे. त्याचे बहुवचन घैरह असे आहे. गैरहजरला 'अनुपस्थित' म्हणू शकतो. गैरसमजला 'चुकीचा समज' ऐवजी काय पर्याय सुचतोय पाहा! आणखी काही उपसर्गघटित शब्द पुढच्या भागात!

– डॉ. निधी पटवर्धन

nidheepatwardhan@gmail.com





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# बँक आणि बजेट



**बँकेत गर्दी** असली तर कधी कधी बँकेतील बाकावर काही मिनिटे बसून राहावे लागते आणि असा प्रसंग बऱ्याचदा येतो. शब्दांच्या व्युत्पत्तीच्या दृष्टीनेदेखील बँक आणि बाक (ऊर्फ 'बेंच') यांचा घनिष्ठ संबंध आहे!

हे दोन्ही शब्द 'बांका' (banca) या लॅटिन शब्दावरून आले आहेत. प्राचीन इटलीमध्ये गावोगावी आठवड्याचे बाजार भरत. एका बाजूला आपापली बाके टाकून सावकार बसत. मालाच्या खरेदी-विक्रीचा व्यवहार करताना जुने कर्ज चुकते करणे किंवा नवे घेणे वगैरे व्यवहार तिथेच चालत. प्रत्येक सावकाराचे बसायचे बाक ठरलेले असे. तो सावकार त्या बाकावरूनच ओळखला जाई. त्यावरून कालांतराने त्या विशिष्ट बाकाला व सावकाराला लॅटिनमध्ये 'बांका' आणि पुढेपुढे इंग्रजीत 'बँक' म्हणायला सुरुवात झाली. जेवढे सावकार तेवढी बाके आणि तेवढ्याच बँका असत.

आधुनिक अर्थव्यवस्थेत सरकारतर्फे 'बजेट' सादर केले जाते. 'जमाखर्चाचा अंदाज' या अर्थाने 'बजेट' शब्द सगळ्याच भाषांत रूढ झाला आहे. सामान्य माणसेही आपापले बजेट करतच असतात. 'मी तो फोन घेतला नाही, कारण माझ्या बजेटमध्ये तो बसणारा नव्हता,' असे आपण खूपदा म्हणतो. सरकारतर्फे सादर होणाऱ्या बजेटची चर्चा वृत्तपत्रांतून बरेच दिवस चालू असते. पण प्रत्यक्षात 'बजेट' शब्दाचा जमा किंवा खर्च यांच्याशी काडीचाही संबंध नाही. 'बजेट' हा शब्द 'बोगेटे' (bougettes) म्हणजे 'कातड्याची लहान पिशवी' या अर्थाच्या लॅटिन शब्दावरून आला आहे.

मूळ लॅटिन शब्द 'बोगे' (ऊर्फ बॅग किंवा पिशवी) आणि त्याचे छोटे रूप म्हणजे 'बोगेटे'. गंमत म्हणजे आज 'बोगेटे' हा बायकांच्या पर्सचा खूप महागडा इटालियन ब्रँड आहे! पूर्वी व्यापारी आपले पैसे किंवा हिशेबाचे महत्त्वाचे कागद 'बोगेटे' नावाच्या छोट्या कातडी पिशवीत ठेवत. पुढे कायदेमंडळांत अंदाजपत्रक सादर करायची प्रथा सुरू झाली, तेव्हा संबंधित मंत्री अंदाजपत्रकाचे कागद अशाच छोट्या कातडी पिशवीत घालून आणत. 'बोगेटे'चे रूप बोलीभाषेत 'बोजेट' आणि नंतर 'बजेट' असे झाले. 'g'चा उच्चार 'ग'ऐवजी 'ज' असाच व्हावा म्हणून त्याचे स्पेलिंगदेखील budget असेच केले गेले. आजही जगभरचे अर्थमंत्री कातडी पिशवीत घालूनच बजेटचे कागद सभागृहात आणतात आणि 'काय काय दडले आहे त्या पिशवीत' याची चर्चा सुरू होते!

– भानू काळे
bhanukale@gmail.com

लोकसत्ता Fri, 07 October 2022
https://epaper.loksatta.com/c/70422018



**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# ‘सदृश’ मध्ये ‘य’ कुठेही नको !

‘**महाराष्ट्रात दोन** राजकीय पक्षांचे एकमेकांवरचे आरोप-प्रत्यारोप इतके वाढले आहेत, की राज्यात युद्धसदृश्य परिस्थिती निर्माण होईल की काय अशी भीती वाटते.’

आणखी एक वाक्य वाचा- ‘भारतात अनेक ठिकाणी पावसाच्या संततधारा कोसळत आहेत, त्यामुळे कितीतरी भागांत पूरसदृश्य वातावरण निर्माण झाले आहे.’ या. दोन्ही वाक्यांत शब्दांची चुकीची रूपे योजली आहेत. त्यामुळे वाक्यरचना सदोष झाली आहे. ते शब्द आहेत- ‘युद्धसदृश्य’ आणि ‘पूरसदृश्य’. या दोन्ही शब्दांतील ‘सदृश्य’ हा शब्दच चुकीचा आहे. असा शब्दच संस्कृतात व मराठी भाषेत अस्तित्वात नाही. सदृश (सदृश्य-श्य नव्हे) हा शब्द संस्कृतात आहे. हे विशेषण असून त्याचा अर्थ आहे- सारखा, योग्य, साजेसा, अनुरूप, तुल्य. संस्कृतात या शब्दाचे ‘सदृक्ष’ असेही रूप आहे. पहिल्या वाक्यात ‘युद्धसदृश’ परिस्थिती याचा अर्थ युद्धासारखी परिस्थिती असा आहे आणि दुसऱ्या वाक्यात ‘पूरसदृश’ वातावरण याचा अर्थ पुरासारखे वातावरण असा आहे. दृश्य म्हणजे देखावा. एक शब्द आहे- अदृश्य (विशेषण, अर्थ ‘दिसेनासा’ (नकारात्मक). आणखी एक शब्द आहे ‘सादृश्य’. हा संस्कृत शब्द आहे. त्याचा अर्थ आहे ‘सारखेपणा’.

नुकतेच ‘लोकसत्ता’त एका बातमीचे शीर्षक वाचले- ‘सिन्नरमध्ये ढगफुटीसदृश पावसामुळे हाहाकार.’ शीर्षकात ‘ढगफुटीसदृश’ आणि ‘हाहाकार’ हे दोन्ही शब्द अगदी अचूक योजले आहेत. (चुकीचे शब्द होतील- ढगफुटीसदृश्य आणि हाहाःकार) ‘स’ हा उपसर्ग असलेली काही विशेषणे पुढीलप्रमाणे-सकर्मक (वाक्यात कर्माप्रमाणे असलेले (क्रियापद), सकस (पौष्टिक), सखोल (फार खोल), सघन (दाट), सगुण (सत्त्व, रज, तम इ. गुणांनी युक्त) तसेच सदय, सटीप, सधन, सदोष, सरस, सविनय, सप्रेम, सशास्त्र, सज्ञान, सतेज, सलज्ज, सव्याज इ.

पुढील दोन शब्द आपण अगदी बरोबर उच्चारतो; पण बरेच जण ते शब्द चुकीचे लिहितात. ‘शृंगार’ या शब्दाऐवजी ‘श्रृंगार’ हे चुकीचे रूप. तसेच चतुःशृंगी या शब्दाऐवजी चतुश्रृंगी हा चुकीचा शब्द. असे चुकीचे शब्द लेखनात कटाक्षाने टाळावेत. पुनः एकदा लक्षात घ्या. आपण मराठी मातृभाषा कुरूप करू नये, तिची मोडतोड करू नये. तिचे स्वरूप जपणे, ती अधिकाधिक निर्दोष करणे हे मराठीवर प्रेम करणाऱ्या आपल्या सर्वांचे कर्तव्यच आहे.

**– यास्मिन शेख**

लोकसत्ता Mon, 10 October 2022
https://epaper.loksatta.com/c/70458688



# घर खाल्लं अन् अंगण तोंडी लावलं

**मुकुंदा तसा** उधळ्या स्वभावाचाच. तोंडात चांदीचा चमचा धरूनच जन्माला आला होता. वडिलांनी खूप कमावून ठेवले होते. मुकुंदानी नुसते घरी बसून सर्व सांभाळले असते, तरी खूप होते. पण त्याला तशी बुद्धी असावी लागते ना! आपल्या उधळ्या स्वभावामुळे आणि श्रीमंती दाखवण्याच्या हव्यासापायी त्याने वडिलांनी कष्टाने संपादन केलेल्या पैशांची उधळपट्टी करायला सुरुवात केली. हे न पाहवून घरातली कर्ती माणसे आणि त्यांच्या घराण्याचे काही सल्लागार यांनी त्याला वेळोवेळी समजावण्याचाही प्रयत्न केला. पण त्याला काही समजेल तर ना! शिवाय त्याच्या जोडीला काही टोळभैरव होतेच जे त्याच्या पैशावर फुकटची मजा लुटायला एका पायावर तयार असत. यालाही आपल्या संपत्तीचा असा कैफ चढलेला होता की बेफिकीरी वाढतच गेली. हवा तसा खर्च होत होता आणि पैसा घरात येण्यासाठी मात्र मुकुंदा काहीच कष्ट घेत नव्हता. त्याला अनेक व्यसनेही लागली.

मग काय घरातल्या लक्ष्मीने हळूहळू काढता पाय घ्यायला सुरुवात केली. मग कर्ज काढण्याचीच वेळ आली. ते फेडण्यासाठी घरचे दागिने, मौल्यवान वस्तू मोडीत काढाव्या



लागल्या. शेवटी घरावर येणाऱ्या जप्तीपासून घर वाचवण्यासाठी शेत, बागायत सर्व विकावे लागले. हाती पैसा नाही आणि खायला शेती, बागायतीचे उत्पन्नही नाही, असे झाले. ही स्थिती सावरण्यासाठी अंगी कर्तृत्व तरी असावे! ते ही नाही. एकदा सर्व बाबतीत घसरण सुरू झाली की भोवती जमलेली भुतावळ सोडून जाते. तसेच झाले. 'असतील शिते, तर जमतील भुते' ही म्हण अगदी खरी झाली. ही परिस्थिती सावरायला पुढे येणारे कोणी नव्हते. मुकुंदाची अवस्था 'घर खाल्लं आणि अंगण तोंडी लावलं' अशी झाली. मुकुंदासारखी अनेक उदाहरणे तुम्हाला तुमच्या अवती भोवतीही दिसत असतील. त्यांच्यासाठी ही म्हण आहे.

**– डॉ. माधवी वैद्य**
madhavivaidy@ymail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचारांमधील व्यवहारबोध

**आपल्या आतबाहेर** वास करणारी भाषा आपल्या अभिव्यक्तीसाठी जशी मदत करते, तशीच आपल्याला जगात वावरण्यासाठी व्यवहारबोधही करते. उदाहरणार्थ 'जसा चारा तशा धारा' हा वाक्प्रचार म्हणजे एक सूत्रच आहे. आपण गुरांना ज्या योग्यतेचा चारा देऊ, त्या योग्यतेनुसार दुधाच्या धारा आपल्याला मिळणार, हा त्याचा अर्थ आहे. 'पेरिले ते उगवते' यातही हाच अर्थ अभिप्रेत आहे.

व्यवहारात सुष्ट-दुष्ट अशा दोन्ही प्रवृत्ती अस्तित्वात असतात. अशावेळी नुसते आदर्शवादी तत्त्वज्ञान उपयोगी पडत नाही. त्यामुळे,'काट्याने काटा काढावा', असा वाक्प्रचार वैचारिक आयुध पुरवणारा वाटतो. एखाद्या अप्रिय व्यक्ती/ वस्तूचा त्रास दुसऱ्या अप्रिय व्यक्ती/वस्तूकडून नाहीसा करून घेण्याविषयीचा हा उपदेश 'पंचतंत्र' या प्राचीन ग्रंथातील आहे, हे नमूद करायला हवे.

काही वाक्प्रचार जीवनातील कटू सत्ये प्रकाशात आणून आपल्याला सावध करतात. 'भिंतीला कान असतात' (आपली गुप्त गोष्ट कोणास ऐकू जाईल, याचा नेम नसतो). 'देखल्या देवा दंडवत' (काही लोक निष्ठापूर्वक नव्हे, तर उपचार म्हणून चांगले वागतात). असे अनेक वाक्प्रचार शालेय जीवनापासून आपल्याला व्यवहाराला तोंड देण्यासाठी वैचारिक शिदोरी पुरवतात.



काही वाक्प्रचार आपल्याला विपरीत परिस्थितीतही आशावादी राहण्याचा मंत्र देतात .उदा. 'प्याद्याचा फर्जी होणे' हा वाक्प्रचार बुद्धिबळ या खेळातील परिभाषा वापरून तयार झाला आहे. बुद्धिबळाच्या पटावरचे प्यादे हे अत्यंत कमी योग्यतेचे असते. फर्जी (मूळ फारसी शब्द फर्झी) म्हणजे राजाचा वजीर होय. एखादे प्यादे जर आपल्या समोरच्या शेवटच्या घरापर्यंत पोहोचले, तर त्याचा फर्जी होतो. म्हणजे अत्यंत सामान्य मनुष्यदेखील यशस्वी वाटचाल करून मोठी योग्यता प्राप्त करू शकतो. हा वाक्प्रचार प्रेरणादायी आहे. काही चरित्रे याची प्रचिती देतात. 'रंकाचा राव होणे' (गरीब माणूस श्रीमंत होणे) हा वाक्प्रचारही रूढ आहे. आपल्याला जीवनातील आकस्मिकता, तसेच परिवर्तनशीलता याची जाणीव त्यातून होते.

एकंदरीत वाक्प्रचारांमध्ये सामावलेले असे कानमंत्र म्हणजे आपल्या परंपरागत भाषाव्यवहारातील सामूहिक प्रज्ञेचा स्फटिकरूप आविष्कारच ठरतात!

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





# साधित शब्दांमधील इंग्रजी

''**या विषयावर** लिहू इच्छिणाऱ्या दुसऱ्या कोणासही माझ्या या विचारांचा मनमुराद फायदा घेता यावा म्हणून मी मुद्दाम या विचारांचे १८३७ च्या २५ व्या आक्टान्वये सर्व हक्क राखून ठेविले नाहीत.'' खरंतर माझंही मत असंच असलं, तरी हे वाक्य मात्र माझं नाही. विसाव्या शतकाच्या सुरुवातीला प्रसिद्ध झालेल्या 'संपूर्ण बाळकराम' मधलं राम गणेश गडकरी यांचं हे वाक्य आहे. ॲक्टसाठी पूर्वी आक्ट, आक्टान्वये असेही शब्द वापरले जात. त्रिं. ना. आत्रे यांच्या 'गावगाडा' पुस्तकाच्या १९२५ सालच्या आवृत्तीतही सब-पोस्टमास्तर, फॉरेस्ट, रजिस्ट्रार, मनिऑर्डरी, देवीडॉक्टर, ढोर-डॉक्टर असे इंग्रजी किंवा इंग्रजीमिश्रित शब्द आढळतात.

मागच्या लेखांत इंग्रजी तद्भव आणि तत्सम शब्द पाहिल्यानंतर आज आपण साधित प्रकारातल्या उपसर्गघटित, प्रत्ययघटित आणि जोडशब्दांमधले इंग्रजी शब्द पाहू. उपसर्गघटित शब्दांमध्ये मुख्यतः मराठी, संस्कृत आणि फारसी-अरबी उपसर्ग मोठ्या प्रमाणात आढळतात. मात्र इंग्रजी उपसर्ग किंवा शब्द दिसत नाहीत. 'नापास' मध्ये 'पास' इंग्रजी असला तरी 'ना' फारसी आहे. मग आत्ताच्या मेगाउत्सव, मेगाभरती, मायक्रोबचत अशा काही शब्दांना इंग्रजी उपसर्गघटित म्हणता येईल? प्रत्ययघटितांमध्येही इंग्रजी प्रत्यय आढळत नाहीत. आपण वाचणेबल, परवडेबल, खाणेबल असे शब्द गमतीत तसेच काही औपचारिक लिखाणात वापरतो तेवढेच.



जोडशब्द या प्रकारात मात्र ई-पत्र, महापोर्टल, आगबोट, कृषिपंप, रेल्वेमार्ग, मोटारगाडी असे अनेक इंग्रजी-मराठी शब्द आढळतात. आयनीभवन, ऑक्सिडीकरण, पाश्चरीकरण अशा काही पारिभाषिक संज्ञांमध्ये इंग्रजी-मराठी मिश्रण दिसतं. अलीकडच्या काळात समाजमाध्यमांमध्ये नेटकर, व्हॉट्सपीय, विकान्त, लोक्स (लोक-अनेक वचन), पोस्टी (पोस्ट-अनेक वचन) क्लिकणे, मेलणे असे काही इंग्रजी-मराठी मिलाफाचे नवशब्द तयार होताना दिसतात. पण त्यांची दखल आणि स्वीकाराबाबत काय?

एकतर पूर्ण मराठी शब्द वापरा नाहीतर पूर्ण इंग्रजी शब्द वापरा, असे दोनच पर्याय समोर ठेवून आपण उलट इंग्रजीचंच पारडं जड करत आहोत का? अशावेळी आवश्यक तिथे इंग्रजी शब्दांचं आदान करून त्यांच्या मराठीकरणाचा मार्ग मोकळा करायला हवा. तुम्हाला काय वाटतं?

– वैशाली पेंडसे-कार्लेकर
vaishali.karlekar1@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# साहित्यातून आलेले शब्द

**अनेक रूढ** शब्दांची व्युत्पत्ती साहित्यातून झालेली आहे. उदाहरणार्थ, 'श्रीमंत पण लोभी आणि दुष्ट माणूस' या अर्थाने 'शायलॉक' किंवा 'संभ्रमावस्थेत असलेला माणूस' या अर्थाने 'हॅम्लेट' हे शेक्सपियरचे शब्द आजही वापरले जातात. 'शूर, शक्तिमान' माणसाला 'टारझन' म्हटले जाते. हा शब्द आला एडगर राइज बरो या इंग्लिश लेखकाच्या प्रचंड लोकप्रिय पात्रावरून. 'दिवसा सर्वसामान्य डॉक्टर पण रात्री भयानक खुनी' असे एक पात्र रॉबर्ट लुईस स्टीव्हनसन या लेखकाने 'डॉक्टर जेकिल अँड हाइड' या कादंबरीत रंगवले होते. तोच शब्दप्रयोग दोन अगदी भिन्न रूपे धारण करणाऱ्या ढोंगी माणसाला उद्देशून आजही केला जातो. 'जुलुमी श्रीमंतांना लुटून त्यांचे पैसे गोरगरिबांना वाटून देणारा लढाऊ पुरुष' या अर्थाने 'रॉबिन हूड' हा शब्द रूढ आहे. हे देखील असेच एक लोकसाहित्यातून आलेले पात्र.

आपल्याकडेही महाभारतातील 'कवचकुंडले काढून देणारा उदार कर्ण' किंवा 'दुष्ट दुर्योधन' आणि रामायणातील 'जीवाला जीव देणारी राम-लक्ष्मण जोडी' किंवा 'कुटिल मंथरा' ही अशीच काही पात्रे; ते-ते गुणविशेष असलेल्या व्यक्तीला उद्देशून वापरली जाणारी. राम गणेश गडकरी यांनी 'एकच प्याला' नाटकात एका दारुड्याचे नाव 'तळीराम' ठेवले होते. आजही दारुड्याला उद्देशून तो शब्द वापरला जातो. आचार्य अत्रे यांच्या 'कवडीचुंबक' नाटकात एक 'श्रीमंत पण अतिशय कंजूष' पात्र आहे. आजही त्याच अर्थाने 'कवडीचुंबक' शब्द वापरला जातो. पु. ल. देशपांडे यांचा बेरकी 'अंतू बरवा' किंवा भाबडा 'सखाराम गटणे' ही अशीच दोन पात्रे.



'चांदरात' हा असाच एक साहित्यातील शब्द. 'चांदरात पसरिते पांढरी, माया धरणीवरी, लागली ओढ कशी अंतरी' या अनंत काणेकरांच्या त्याच शीर्षकाच्या कवितेतील गूढरम्य ओळी. किंवा 'तुझे विजेचे चांदपाखरू दीपराग गात, रचित होते शयनमहाली निळी चांदरात' या बोरकरांच्या नादमधुर ओळी. 'चंद्रप्रकाश' या अर्थाने इथे 'चांदरात' शब्द योजलेला आहे. पण प्रत्यक्षात 'चांदरात' या फारसी शब्दाचा अर्थ अगदी वेगळा आहे. मुस्लीम राजवटीत महिन्याचा पगार ज्या दिवशी चंद्र दिसे त्या दिवशी, म्हणजे द्वितीयेला, वाटत. त्या पगाराच्या दिवसाला 'चांदरात' म्हणत ! त्याच्यात गूढरम्य काव्यात्मकता अजिबात नाही !

– भानू काळे
bhanukale@gmail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# ‘उत्’-युक्त शब्द आणि तत्सम शब्द कसे लिहायचे?

१) ‘**भूकंपात घरदार,** कुटुंबे उध्वस्त होऊन जी माणसे जिवंत राहतात, ती दुर्दैवी, असहाय माणसे पाहिली की, विलक्षण क्लेश होतात.’ असेच आणखी एक वाक्य पाहा. २) ‘एखाद्या व्यक्तीला विपत्तीनंतर येणारे वैफल्य, त्याचे उध्दवस्त झालेले भावविश्व, त्याच्या वाट्याला आलेले नैराश्य- हे सारेच अत्यंत वेदनादायी असते.’

ही दोन्ही वाक्ये योग्य आशय व्यक्त करतात, हे खरे. फक्त एका शब्दाच्या स्वरूपात चूक झाल्यामुळे वाक्यरचना सदोष झाली आहे.

तो शब्द आहे- पहिल्या वाक्यात **उध्वस्त** आणि दुसऱ्या वाक्यात **उध्दवस्त**. योग्य शब्द आहे- उद्ध्वस्त (विशेषण) अर्थ आहे- नष्ट केलेला, अस्ताव्यस्त केलेला. या शब्दाची फोड करू या- उत् ध्वस्त- उद्ध्वस्त. ध्वंस या नामापासून सिद्ध झालेले विशेषण आहे. ध्वस्त (संस्कृत, विशेषण) ध्वस्त म्हणजे नष्ट केलेले किंवा झालेले, लुप्त. ध्वंस या नामाचा अर्थ आहे नाश, ध्वस्त या शब्दाला उत् हा उपसर्ग लागून उद्ध्वस्त (विशेषण) सिद्ध होते. उत् ध्वस्त-ध् हे मृदू व्यंजन आहे. त्यामुळे त् चा द् होतो. उत् या उपसर्गापुढे कठोर व्यंजन आल्यास त् च राहतो. जसे- उत् तीर्ण= उत्तीर्ण, उत्थापन, उत्पत्ती, उत्कर्ष, उत्फुल्ल इ. उत् मृदू व्यंजन - उद्गम, उद्धार, उद्घाटन, उद्भट, उद्धृत, उद्युक्त, उद्वेग इ.

आणखी एक वाक्य पाहू या- ‘ब्रिटिशांचे राज्य भारतात येण्यापूर्वी संस्कृत शिकण्याची परवानगी शुद्रातिशुद्रांना नव्हती.’ या वाक्यातील ‘शुद्रातिशुद्रांना’ या शब्दातील **शु** हे ऱ्हस्व अक्षर चुकीचे आहे.

चातुर्वर्ण्य (सं.-नपुं.)= ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र या चार वर्णांचा समुदाय. शूद्र हा चौथा वर्ण. अतिशूद्र- शूद्रांतील खालचा वर्ण. शूद्र हा मराठीने संस्कृतातून स्वीकारलेला तत्सम शब्द होय. हा शब्द अकारान्त आहे. अकारान्त तत्सम शब्दास विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी लागल्यास व त्या शब्दात उपान्त्य (शेवटून दुसरे) अक्षर दीर्घ असल्यास ते उपान्त्य अक्षर दीर्घच राहते. - शूद्र - अकारान्त, आधीचे अक्षर दीर्घ (शू) विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी लागल्यास- शूद्राला, शूद्रावर- (चुकीचे शुद्राला) शूद्रातिशूद्रांना (चुकीचे- शुद्रातिशुद्रांना). मराठी शब्दांना हा नियम लागू नाही.

मराठी अकारान्त शब्दांत उपान्त्य अक्षर दीर्घ असल्यास त्याला विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी लागल्यास ते उपान्त्य अक्षर ऱ्हस्व होते. जसे- फूल- फुलात, फुलावर, गरीब- गरिबाला, गरिबासाठी इ.

मात्र तत्सम शब्दांतले उपान्त्य- रूप- रूपावर, शूर- शूराला, कीर्ती- कीर्तीमुळे इ. तसेच राहाते.

**– यास्मिन शेख**

# भाषासूत्र

कांचन कराई द्वारा संकलित

# अपुरा घडा, झोले खाई

**राधिका खूप** धाडसी मुलगी होती. धीट होती. तसे तिचे ज्ञान सखोल होते असे नाही. पण तिची मैत्रीण सानिका मात्र खरी हुशार, बुद्धिमान. तिचा अभ्यास चोख. पण ती स्वभावाने गरीब, जराशी लाजाळू. त्यामुळे राधिकाला ज्ञान कमी असूनही तिच्याच नावाचा उदोउदो जास्त होत असे.

त्या दोघींना शिकवणाऱ्या एका चाणाक्ष शिक्षिकेच्या ही गोष्ट लक्षात यायला वेळ लागला नाही. एकदा सानिका त्यांच्याकडे एक शंका घेऊन गेलेली असताना त्यांनी तिला विचारले, ''सानिका! एक विचारू तुला? अगं तू इतकी हुशार आहेस. सगळं ज्ञान तुला असतं. मग अशी मागे मागे का राहतेस? तू बोललं पाहिजेस. आपले विचार, आपलं ज्ञान लोकांसमोर येऊन मांडलं पाहिजेस. ती तुझी मैत्रीण राधिका बघ. खरं तर तिच्याकडे ज्ञान कमी, दिखाऊपणाच जास्त आहे. उद्या अनेक जण तू वरचढ असूनही तुला मागे टाकतील. तुझी 'झाकली मूठ सव्वा लाखाची आहे' हे कोणाला कळणारही नाही. यात इतरांचं फावेल आणि तू मात्र मागे पडत जाशील.''



हे बोलणे तिथे बसलेले आणखी एक शिक्षक ऐकत होते. ते म्हणाले, ''बाई! तुम्ही तिला लाख मोलाची गोष्ट सांगत आहात. खरं आहे तुमचं म्हणणं. उथळ पाण्याला खळखळाटच फार! घडा पूर्ण भरलेला असेल तर आतलं पाणी न डुचमळता तो माथ्यावर नीटपणे वाहून नेला जाऊ शकतो. घड्यातलं पाणी सांडत नाही की त्याचा आवाजही होत नाही. खरा ज्ञानी माणूस भरलेल्या घड्यासारखा स्थिर असतो. तो आपल्या ज्ञानाचं प्रदर्शन करत नाही आणि व्यर्थ बडबडतही नाही. कारण त्याने मिळवलेलं ज्ञान बावनकशी असतं.''

हा सारा संवाद सानिका फार लक्ष देऊन ऐकत होती. तिला वाटत होते 'अपुरा घडा, झोले खाई' हे राधिकाला केव्हा कळणार?

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# प्रादेशिक बोलींमधील वाक्प्रचार



**भाषा दर** १२ कोसांवर बदलते, असे म्हणतात. अर्थातच मराठीच्याही काही प्रादेशिक बोली आहेत. त्यांत वेगवेगळे वाक्प्रचार रूढ आहेत. 'महाराष्ट्र वाक्संप्रदाय कोश' या द्विखंडात्मक कोशात संपादक दाते- कर्वे यांनी काही प्रादेशिक बोलींमधील वाक्प्रचार समाविष्ट केले असून विशिष्ट बोलीचा उल्लेख पुढे कंसात संक्षेपाने केला आहे. त्यातील ही काही उदाहरणे आहेत.

'शेत खाल्लं लोधडीनं अन् मार खाल्ला गधडीनं' हा अहिराणी बोलीतील अनुप्रासयुक्त वाक्प्रचार आहे. लोधडी म्हणजे नीलगाय होय. त्यामुळे याचा अर्थ 'गुन्हा एकाने केला आणि शिक्षा दुसऱ्याला', असा होतो. 'भोके बुजणे' या अहिराणी बोलीतील वाक्प्रचाराचा अर्थ आहे, कर्जातून मुक्त होणे.

'कानात भेंडे घालणे' या वऱ्हाडी वाक्प्रचाराचा अर्थ आहे, बहिरेपणाचे सोंग घेणे, मुद्दाम दुर्लक्ष करणे. भेंड म्हणजे कानाच्या पाळीत दागिना घालावयाला पाडलेले छिद्र मोठे करण्यासाठी त्यात घातलेला बोरूचा तुकडा. तो तुकडा जर कानात घातला, तर कसे ऐकू येणार? असा त्याचा अर्थ दिसतो. 'घांटीवर येणे' हाही वऱ्हाडी वाक्प्रचार रूढ आहे. घांटी म्हणजे गळा, नरडे. या वाक्प्रचाराचा अर्थ आहे, जिवावर बेतणे.

'टापर वाजणे' या नागपुरी वाक्प्रचाराचा अर्थ आहे दिवाळे निघणे. टापर म्हणजे आघात. 'चाटूचा पऱ्या करणे' हाही नागपुरी वाक्प्रचार आहे. त्याचा अर्थ आहे, उधळपट्टी करणे आणि 'नाव डहाळ होणे', याचा अर्थ आहे, बदनाम होणे.

'गोंडा हालणे/ झुलणे' या कोकणी वाक्प्रचाराचा अर्थ आहे, सतत काम सुरू ठेवणे. हा वाक्प्रचार चेष्टेने बोलताना वापरला जातो. कुडाळ भागातील/ मालवणी बोलीतील 'कांडप काढणे' या वाक्प्रचाराचा अर्थ आहे, मारझोड करणे आणि 'कैंगटीला येणे' याचा अर्थ आहे, मेटाकुटीला येणे, त्रासणे!

मराठीमध्ये प्रादेशिक बोलीतील साहित्याला स्थान मिळत आले आहे. (उदा. बहिणाबाईंच्या कविता) त्यात वाक्प्रचारांचे नेटके उपयोजन केलेले असते. त्यातील वाक्प्रचारांची नाळ काही वेळा भू-सांस्कृतिक वैशिष्ट्यांशी जोडलेली असते. त्यांच्यामुळे मराठीचा परीघ विस्तार पावत समृद्ध होतो.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com

भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# मराठी शब्दसंग्रहातील फारसी उपसर्ग

*'आला आला रुखवत, त्यात होती बुगडी
विहीणी विहीणी घालतात मांडवात फुगडी'*

**या उखाण्यातील** रुखवत शब्द फारसी 'रुषमत्'वरून आला आहे, हे कोशात पाहिले तेव्हा गंमत वाटली. लग्नविधीत नवऱ्या मुलास द्यावयाचे भोजन वगैरे पदार्थ आणि मानसन्मान म्हणजे रुखवत. फारसी रु'षमत म्हणजे देणगी!

मराठीत कितीतरी फारसी शब्द येतात आणि उपसर्गाने तयार होणारे बरेच फारसी-अरबी शब्द आपण वापरतो. मागच्या भागात आपण काही उदाहरणे पाहिली. या भागात आणखी काही उदाहरणे पाहू- फारसी 'रोज' या उपसर्गावरून रोजकीर्द म्हणजे दिनचर्या, रोजगार म्हणजे धंदा, रोजगुदस्त म्हणजे कालचा दिवस आणि रोजा म्हणजे मुसलमानांचा उपवासाचा दिवस असे मराठी पर्याय उपलब्ध आहेत. 'बिन' म्हणजे शिवाय, खेरिज, वाचून. उदा. बिनदिक्कत, 'बे' म्हणजे सुद्धा विना, शिवाय. याचे सामासिक शब्द पुष्कळ आहेत. जसे बेअब्रू, बेइज्जत, बेईमान, बेकायदा, बेगुमान, बेडर, बेढब, बेपर्वा, बेशरम, बेशिस्त. अजून एक 'शिवाय' अर्थाचा उपसर्ग म्हणजे 'बेला'. त्याची उदाहरणे म्हणजे बेलाशक, बेलाकसूर. 'ला' उपसर्गाचे लाइलाज, लाजवाब असे शब्द आपण ऐकले आहेत. 'ला' उपसर्गाची



लावारिस, लाचार ही उदाहरणे आपण उपयोजितो. 'हर' म्हणजे प्रत्येक. हररोज, हरसाल, हरहुन्नरी, हरकाम्या ही त्याची उदाहरणे. 'दर' या उपसर्गाचा अर्थ 'प्रत्येक' हा आहे. दररोज, दरमहा, दरमजल, दरसाल, दरशेकडा, दरमुक्काम हे शब्द आपल्याकडे आलेले आहेत पण मराठीमध्ये दरदिवस, दररात्री, दरमाणसी, दरदिवशी असे प्रयोग आढळतात. 'ना' हा अभाववदर्शक आहे. नाउमेद, नापसंत, नादार नाखूश, नाराज, नाचक्की हे शब्द आपण वापरतो. 'सर' या उपसर्गाचा अर्थ आहे मुख्य. उदा. सरकार, सरहद्द, सरदार, सरमोकादम, सरनौबत, सरसुभा, सरपंच, सरकारकारकून. सरपेच यापासून मराठी 'शिरपेच' झाले आहे. सरजोर वरून 'शिरजोर' झाले आहे. आता आजच्या लेखातील शेवटचा उपसर्ग म्हणजे 'हम'. हम म्हणजे समान/ पूर्ण/ सर्व. उदाहरण द्यायचे तर हमरस्ता, हमरंग, हमजात. एकूणच मराठी शब्दसंग्रहात फारसी उपसर्गांनी शब्दसंग्रह वाढविला आहे.

**- डॉ. निधी पटवर्धन**
nidheepatwardhan@gmail.com





# पत्रकारितेतून आलेले शब्द

**भाषेच्या जडणघडणीत** पत्रकारितेचे योगदान मोठे आहे. साहित्यापेक्षा वृत्तपत्रांचा वाचकवर्ग मोठा असतो व त्यामुळे अनेक शब्द वृत्तपत्रांतूनच समाजात रूढ होतात. वृत्तपत्रांच्या एकूण स्वरूपामुळे हे शब्द वेधक पण सुस्पष्ट असावे लागतात. असे चपखल शब्द रूढ करायची मराठी पत्रकारितेला उज्ज्वल परंपराच लाभलेली आहे. नोकरशाही किंवा जहाल हे शब्द लोकमान्य टिळकांनी 'केसरी'मधून रूढ केले. गोलंदाज, फलंदाज, क्षेत्ररक्षक, षटक इत्यादी शब्द अच्युत बळवंत कोल्हटकर यांनी 'संदेश'मधून रूढ केले. आजच्या काळातही असे अनेक नवे शब्द वृत्तपत्रांनी रूढ केले आहेत.

उदाहरणार्थ, गेल्या काही वर्षांत देशात मोठ्या प्रमाणावर रस्तेबांधणीचे काम झाले आहे. त्या संदर्भातील बातम्या देताना महामार्ग (हायवे), द्रुतगती मार्ग (एक्स्प्रेस वे), गतिरोधक (स्पीडब्रेकर), दुभाजक (डिव्हाइडर), बाह्यवळण (बायपास), घाटमार्ग (हिल रोड) वगैरे शब्द वापरले गेले आणि लोकांच्या तोंडवळणी पडले. पदावर नसूनही सत्तेवर नियंत्रण ठेवणाऱ्या व्यक्तीला उद्देशून 'रिमोट कंट्रोल' हा शब्द वृत्तपत्रांनीच रूढ केला. विधिमंडळात निवडून गेलेल्या पण कुठल्याच प्रश्नावर ज्यांनी कधीच तोंड उघडले नाही अशा लोकप्रतिनिधीला वृत्तपत्रांनीच 'मौनीबाबा' म्हटले. दारूच्या नशेत गोंधळ घालणारा 'मद्यधुंद' किंवा पैशाच्या जोरावर माज करणारा 'धनदांडगा' ही तशीच काही



उदाहरणे. गृहनिर्माण, संकुल, सदनिका, चटईक्षेत्र, वाहनतळ, महाआरती, चक्काजाम, भूखंडाचे श्रीखंड, बेरजेचे राजकारण, घरवापसी, आयाराम-गयाराम हे शब्द म्हणजे वृत्तपत्रांचीच देणगी.

ब्लॅक मनी (काळा म्हणजे हिशेबात न दाखवला जाणारा पैसा) आणि व्हाइट मनी (पांढरा म्हणजे हिशेबात दाखवला जाणारा पैसा) हे शब्द तसे मराठीत रूढ झालेले होते. काळा पैसा पांढरा करायची 'मनी लाँडरिंग' ही छुपी यंत्रणादेखील अस्तित्वात होती. अलीकडेच त्यासाठी 'धनधुलाई' हा शब्द एका वृत्तपत्रात वाचला. एखाद्याची 'धुलाई' करणे म्हणजे त्याला बदडणे हे ठाऊक होते, पण त्या शब्दाला 'धन' जोडून एक नवाच समर्पक शब्द तयार झाला.

आजच्याच एका वृत्तपत्रात विनासामंजस्य मालकी मिळवणे (होस्टाइल टेकओव्हर), कर्जसाहाय्यित विस्तारपथ (कर्जाच्या बळावर होणारी व्यवसायवृद्धी), मेंदूमृत (ब्रेन डेड) हे पूर्वी कधी न वाचलेले शब्द माझ्या वाचनात आले. वृत्तपत्रे हा नवशब्दांचा अक्षयस्रोत आहे.

– भानू काळे
bhanukale@gmail.com

भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# अर्थपालटानंतरही शब्दाचे लेखन ‘तत्सम’च असावे !

‘**काही रुग्णांना** रक्ताची इतकी आवश्यकता असते, की रक्तदानासाठी सणासुदीचा मुहूर्त पाहूनच रक्तदात्यांनी रक्तदान करावे, तत्पूर्वी करू नये, असा अट्टाहास नेत्यांनी का करावा?’

या वाक्यात ‘अट्टाहास’ हा चुकीचा शब्द आहे. मराठीने संस्कृतातून स्वीकारलेला ‘अट्टहास’ हा तत्सम शब्द आहे. ट्ट-योग्य, ट्टा-चुकीचा. संस्कृतात या शब्दाचे जे अर्थ आहेत, ते सगळेच मराठीने स्वीकारले नाहीत. अट्टहास (सं. नाम, पुल्लिंगी) अर्थ- भारी, मोठा प्रयत्न, मोठ्याने हसणे, मोठा स्वर, आक्रोश असे अनेक अर्थ आहेत. मराठीत या शब्दाचा अर्थ ‘जोराचा पण चुकीचा आग्रह’ दुराग्रह, हट्ट, हेका असा वेगळा अर्थ रुढ झालेला आहे. वरील वाक्यातील ‘अट्टाहास’ असा शब्दच मराठीत किंवा संस्कृतातही नाही. अट्टहास (ट्ट-बरोबर, ट्टा-चूक) हाच निर्दोष शब्द आहे. वरील वाक्यात रक्तदान सदासुदीच्या सुमुहूर्तावर करावे, तत्पूर्वी किंवा त्यानंतरही रक्तदान करू नये, हा नेत्यांचा दुराग्रह आहे. त्यामुळे ज्या रुग्णांना रक्ताची निकड आहे, त्यांच्यावर अन्याय होईल, त्यांचे प्राण वाचवणे अशक्य होईल, याची जाणीव नेत्यांना नाही. दुराग्रहात (अट्टहासात) आपलेच म्हणणे खरे, दुसऱ्या कोणाचे म्हणणे ऐकायचेच नाही असा अर्थ अनुस्यूत आहे; हे लक्षात घेऊन योग्य शब्द ‘अट्टहास’ असून मराठी भाषकांनी बोलताना व लिखाण करताना याच शब्दाचा स्वीकार करावा ही विनंती.

केव्हा केव्हा संस्कृतातील शब्द आपण मराठीत स्वीकारतो. शब्दलेखनात चूक होत नाही. पण अर्थ मात्र अगदी वेगळा करतो. म्हणजे संस्कृतात त्या शब्दाचा जो अर्थ आहे, त्याच्या नेमक्या उलट अर्थाने आपण तो शब्द वापरतो. ते शब्द आहेत- परोक्ष आणि अपरोक्ष. या शब्दाचे संस्कृतात अर्थ आहेत- परोक्ष (विशेषण) अर्थ : (१) नजरेआड, अदृश्य, (२) गैरहजर, (३) गुप्त, गूढ, दृष्टिआड. परोक्ष - (क्रियाविशेषण) अर्थ : एखाद्याच्या पाठीमागे, गैरहजेरीत, डोळ्यांआड, असमक्ष.

मात्र आपण समक्ष या अर्थी परोक्ष या शब्दाचा वापर करतो व अपरोक्ष हा शब्द असमक्ष याकरिता योजतो.

वास्तविक अपरोक्ष- अर्थ -डोळ्यांदेखत, समक्ष आणि परोक्ष शब्दाचा अर्थ डोळ्यांआड. परोक्ष या शब्दाची फोड करू या. पर अक्षांसमोर म्हणजे दुसऱ्याच्या डोळ्यांसमोर म्हणजेच स्वतःच्या डोळ्यांआड (पर-अक्ष) पर= दुसरा, अक्ष= डोळा, पर- स्वतःच्या नव्हे. अ-परोक्ष- जे दुसऱ्याच्या डोळ्यांसमोर नाही ते. म्हणजे जे स्वतःच्या डोळ्यांदेखत असते किंवा घडते. मात्र मराठीत नेमक्या उलट्या अर्थाने हे शब्द रूढ आहेत.

– यास्मिन शेख





# आरती घेतल्यावर उष्ण, तीर्थ घेतल्यावर सैत

**कमलाबाई अतिशय** नाजूक शरीरयष्टीच्या. तब्येत म्हणजे अगदी तोळामासा. सतत आजारपण पाठीशी लागलेलं. देवदर्शनाला गेल्या नसतील इतक्या डॉक्टर दर्शनासाठी जायला लागे त्यांना! कुठल्याही कार्यक्रमाला त्यांना जाता येत नसे. 'तब्येत ठीक नाही हो. नाहीतर नक्की आले असते.' हे त्यांचे एक ठरीव उत्तर असे. त्यांची तब्येतच इतकी नाजूक की वारा आला तरी उडून जातील. त्यांच्या मैत्रिणी त्यांच्या तब्येतीवरून त्यांची खूप थट्टामस्करी करीत असत. एकदा त्यांना सोसायटीच्या हळदीकुंकवाला बोलवायला त्यांच्या एका मैत्रिणीचा फोन आला. ती त्यांना म्हणाली, ''कमलाबाई! उद्या आपल्या सोसायटीचं हळदीकुंकू आहे. पण बघा बाई तुम्हाला बरं असेल तर या. नाहीतर आम्ही तुम्हाला हळदीकुंकू लावायचो आणि ते नाकावर पाघळून तुम्हाला शिंका, सर्दी सुरू व्हायची! तुमचं काही सांगता येत नाही बाई!'' खरंतर कमलाबाई या मस्करीनेही दुखावल्या जायच्या.

शेवटी व्यथित होऊन त्या एकदा गेल्या डॉक्टरांकडे. त्यांना म्हणू लागल्या, ''डॉक्टर! मी मरेपर्यंत अशीच राहणार का हो? सतत आजारपणाचा मला खरंच आता कंटाळा यायला लागला आहे. माझ्या तब्येतीला केव्हा काय होईल



त्याचा काही अंदाजच लागत नाहीये मला. काही तरी जालीम उपाय करा आता.'' डॉक्टर हसले, त्यांना म्हणाले, ''अहो, इतकी नाजूक प्रकृती मी आजवर कोणाचीच बघितलेली नाही. दुपारच्या सावलीचा गारवाही तुमच्या तब्येतीला झोल द्यायला कारणीभूत होतो. तुमच्याकडे बघितल्यावर मला एक म्हण नेहेमी आठवते, 'आरती घेतल्यावर उष्ण आणि तीर्थ घेतल्यावर सैत' तशी आहे तुमची तब्येत! अहो, निरांजनाच्या ज्योतीवर हात धरल्याने तुम्हाला होते उष्णता आणि तीर्थ प्राशन केलेत की तुम्हाला वाजते थंडी! पंचाईतच आहे खरी! बघू काय करता येईल ते!''

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com

भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# पुराणकथांचा संदर्भ असलेले वाक्प्रचार

**रामायण, महाभारत,** तसेच पुराणे हे प्राचीन ग्रंथ भारतीय संस्कृतीचा अविभाज्य घटक आहेत. त्यांचा संदर्भ असलेले काही वाक्प्रचार आजही आपल्या जगण्याचा भाग झालेले दिसतात.

शिवधनुष्य उचलणे, हा वाक्प्रचार रामायणाशी निगडित आहे. जनक राजाची कन्या सीता हिच्या स्वयंवरातील पण होता तो असा, की जो शिवधनुष्य उचलेल, त्याला सीता वरमाला घालील! जनकाकडे असलेले शिवधनुष्य अतिशय अवजड होते. त्याला दोरी लावण्याचे काम अनेक राजपुत्रांना जमले नव्हते. रामाने मात्र सहजपणे ते धनुष्य उचलले. त्यामुळे या वाक्प्रचाराचा लक्ष्यार्थ आहे- अवघड जबाबदारी लीलया पेलणे.

'हा सूर्य, हा जयद्रथ' हा वाक्प्रचार महाभारतातील एका घटनेशी संबंधित आहे. चक्रव्यूहात वीरमरण आलेल्या अभिमन्यूला जयद्रथाने लाथ मारली होती. त्यामुळे चिडलेल्या अर्जुनाने दुसऱ्या दिवशी सूर्यास्त होण्यापूर्वी जयद्रथाचा वध करण्याची प्रतिज्ञा केली होती. ते शक्य न झाल्यास तो स्वतः अग्निकाष्ठ भक्षण करणार होता. दुसऱ्या दिवशी सूर्यास्त होत आला, तरी जयद्रथ दृष्टीस न पडल्यामुळे त्याने स्वतःसाठी चिता रचली होती. तेव्हा श्रीकृष्णाने सुदर्शनचक्र वापरून सूर्याला झाकून काळोख पाडला होता. त्यासरशी बाहेर आलेल्या जयद्रथाला पाहून श्रीकृष्णाने अर्जुनाला प्रतिज्ञापूर्तीसाठी म्हटले होते, 'हा सूर्य, हा जयद्रथ!' याचा अर्थ असा आहे : दोन्ही गोष्टी समोरासमोर आणणे, पुराव्यानिशी सिद्ध करणे.

यादवी माजणे, हा वाक्प्रचारदेखील महाभारतातील एका कथाभागाशी जोडलेला आहे. श्रीकृष्ण हा यदु वंशातील होता. यदुवंशात जन्मलेले ते यादव. श्रीकृष्णाच्या वंशजांचा- म्हणजेच यादवांचा- अंत त्यांनी मद्यधुंद अवस्थेत आपापसात केलेल्या युद्धामुळे झाला होता. त्यामुळे यादवीचा अर्थ आहे, गृहकलह.

सूतोवाच करणे, हा वाक्प्रचारही आपण वापरतो. सर्व पुराणे सूताने शौनकाला सांगितली आहेत. त्यांची सुरुवात 'सूतः उवाच' अशी आहे. त्यांचा संधी होऊन मराठीत 'सूतोवाच करणे म्हणजे प्रारंभ करणे/ कानावर घालणे' हा वाक्प्रचार रूढ आहे. हे आणि असे इतर वाक्प्रचार वाचताना भाषा ही 'सांस्कृतिक स्मृती' असल्याची प्रचीती येते.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# संदर्भाने होणारा अर्थबदल

**व्युत्पत्तीचा शोध** घेऊन शब्दांचा नेमका अर्थ स्पष्ट होऊ शकतो, पण कधी कधी संदर्भ बघितल्यावरच शब्दाचा त्या विशिष्ट ठिकाणी असलेला अर्थ लक्षात येतो. वाच्यार्थ, म्हणजे आपण त्या शब्दाचा नेहमी घेतो तो अर्थ एकच असला तरी त्याचा सूचित अर्थ (लक्ष्यार्थ) फार वेगळा असू शकतो. उदाहरणार्थ, 'राकट देशा, कणखर देशा, दगडांच्या देशा' या ओळीत दगड शब्दाचा अर्थ नेहमीचा (म्हणजे वाच्यार्थ) आहे. पण 'तो नुसता दगड आहे' म्हणताना दगड शब्दाचा 'बिनडोक' हा सूचित अर्थ (म्हणजे लक्ष्यार्थ) आहे. लक्षणा ही एक मोठी शब्दशक्ती आहे.

रोजच्या भाषेत हा अर्थबदल खूपदा होतो. अक्षता म्हणजे आपले साधे तांदूळच असतात, पण त्यांना लग्नविधीत हळद-कुंकू लावले की अर्थबदल होऊन त्यांना वेगळेच पावित्र्य प्राप्त होते. श्रद्धापूर्वक देवापुढे हात जोडले की मगच पाण्याचे तीर्थ होते; एरवी तीर्थ हेही नुसते पाणीच असते. श्रीफळ म्हणजे आपला नेहमीचा नारळच; तो खोवून आमटी-भाजीसाठी आपण वापरतोच; पण एखाद्याचा सत्कार करताना दिला जातो तेव्हाच त्याचे 'श्रीफळ' होते. अर्थात, एखाद्या कार्याचा शुभारंभ करताना फोडला जातो तोही नारळच असतो आणि एखाद्याला कामावरून काढून



टाकतानाही 'त्याला नारळ दिला' असेच म्हटले जाते; पण तो एक भाषाविशेष आहे आणि तोही संदर्भावरूनच कळतो.

उपोषण, उपास आणि लंघन हे तीन शब्द आपण वापरतो. तिन्ही शब्दांनी व्यक्त होणारा मूळ अर्थ एकच- तो म्हणजे न जेवणे. पण संदर्भानुसार तिन्ही शब्दांचा अर्थ किती पालटतो! उपोषण हे राजकीय किंवा सामाजिक विरोध करण्याचे हत्यार आहे; उपास हा धार्मिक कारणांसाठी केला जातो; तर लंघन हे आरोग्याला उपयुक्त म्हणून केले जाते.

आभाळ आणि आकाश दोन्ही तसे समानार्थी शब्द. पण त्यांतून सूचित होणारा वेगवेगळा भाव स्पष्ट करताना शान्ता शेळके म्हणतात, 'भरून येते ते आभाळ आणि मोकळे होते ते आकाश!' संदर्भामुळे अर्थ कसा बदलतो हे स्पष्ट करताना पु. ल. देशपांडे यांनी एक सुरेख उदाहरण दिले होते. ते म्हणाले होते, 'मत देते ती जनता आणि दगड मारते ते पब्लिक!'

**- भानू काळे**

bhanukale@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# ‘मोहन’ मराठीशी एकजीव झाले !

**अलीकडेच मला** आलेला एक गमतीदार पण उद्‌बोधक, माझ्या ज्ञानात भर घालणारा अनुभव सांगणार आहे.

माझी कन्या डॉ. शमा भागवत हिला भेटायला तिच्या दोन मैत्रिणी आल्या होत्या. मीही तिच्याकडे असल्यामुळे त्यांच्या गप्पात सामील झाले होते. एक जण म्हणाली, “अहो, आम्ही दोघी करंज्या करण्यासाठी स्वयंपाकघरात बसलो होतो. करंज्यांसाठी पीठ मळताना त्यात किती मोहन घालावं, असं मी हिला विचारलं. हिनं मला किती मोहन घालावं म्हणजे करंज्या खुशखुशीत होतील, हे सांगितलं. इतक्यात बाहेरच्या खोलीत बसलेला माझा नवरा धावत आला आणि म्हणाला, ‘मोहन, मोहन काय बोलताय? काय ग, माझ्यावर टीका करताय की माझ्या चुगल्या करताय?’ आम्ही दोघींनी त्याला समजावलं, ‘अरे पिठात किती मोहन घालायचं याविषयी आम्ही बोलत होतो, तुझ्याबद्दल नाही रे!’’’ तिच्या नवऱ्याचे नाव ‘मोहन’ असल्यामुळे त्याचा हा गैरसमज झाला होता.

हे ऐकत असताना माझ्या लक्षात आले की, ‘मोहन’ (मुलाचे नाव) हा शब्द पुल्लिंगी नाम आहे. पण कणीक किंवा पीठ मऊ होण्यासाठी आपण त्यात तेल, तूप किंवा इतर पदार्थ घालतो, त्याला आपण मराठी भाषक ‘मोहन’च म्हणतो. मात्र हा शब्द नाम, नपुंसकलिंगी आहे. (ते मोहन). हा शब्द एखाद्या शब्दाचा अपभ्रंश तर नाही ना? मी चटकन माझ्या खोलीत जाऊन अनेक शब्दकोश उघडून शोध घेतला आणि आश्चर्य म्हणजे माझ्या शंकांचे निरसन होऊन माझ्या ज्ञानात भर पडली. ती अशी - मोहन (नाम, नपुंसकलिंगी) हा शब्द मोहन नसून ‘मोवन’ आहे. ‘मोहन’ हा शब्द ‘मोवन’ या शब्दाचा अपभ्रंश आहे. त्याचे स्पष्टीकरण असे -



मोवन (नाम, नपुंसकलिंगी) - मूळ शब्द मोव (संस्कृत विशेषण) अर्थ आहे मृदू, मऊ.

त्यापासून सिद्ध झालेले नपुंसकलिंगी नाम आहे मोवाणा किंवा मोंवण - अर्थ - लोणी, मार्दव आणणारा पदार्थ. मोवाळणे (क्रियापद) अर्थ - मृदू होणे, वठणीस आणणे. मोंवण या शब्दातील मो अक्षरावरील अनुस्वार आणि ण चा न असा बदल झाला. आणि मधले अक्षर ‘व’ चा ‘ह’ झाला. मोहन (नाम, पु.) अर्थ - मोहून टाकणारा, भुरळ घालणारा. मराठीत ‘मोहन’ (नाम, नपु.) हा अपभ्रंश आपण स्वीकारलेला आहे. मोहन (नाम, नपु.) अर्थ आहे - कणीक वगैरे पदार्थ मृदू होण्यासाठी घातलेले तेल, तूप वगैरे. माझ्या अनेक संस्कृतज्ञ वाचकांना हे माहीत असेलच. पण काही वाचकांना हे नव्याने समजले असेल, असे वाटते. (जसे मला हे वरील अनुभवामुळे कळले.)

–यास्मिन शेख

लोकसत्ता
Mon, 31 October 2022
https://epaper.loksatta.com/c/70721546



# हाताचा जड आणि बोलून गोड...

**एक दिवस** माझ्या मैत्रिणीची लेक अगदी खूश होऊन माझ्याकडे आली आणि मला सांगू लागली, ''अगं, काय सांगू मावशी तुला! अगं, आपल्या त्या कसूरकर वहिनी आहेत ना, त्यांच्याकडे आज गेले होते. पेढे द्यायला. माझ्याशी इतकं छान बोलल्या. म्हणाल्या, 'थांब पोरी, इतके सुंदर मार्क्स मिळवले आहेस परीक्षेत तू! आधी तुझी दृष्टच काढून टाकते'. आणि असं म्हणून त्यांनी खरंच दृष्ट काढली माझी.'' मी म्हटलं, ''अगं बाई! खरंच का? आणि काय म्हणाल्या त्या?'' ती पुढे उत्साहाने सांगू लागली, ''आणि त्या म्हणाल्या, 'हे बघ, तू परवा ये बरं का माझ्याकडे. जेवायलाच ये. अगं, तू मला माझ्या नातीसारखीच. तुझं खूप कौतुक करायचं आहे मला. तुला काय आवडतं जेवायला? हवं ते गोडधोड करीन. आणि एक छानसं बक्षीसही देईन बरं का! मी काय देईन ते गोड मानून घेशील ना गं?' मला फारच आवडल्या त्या.'' मी हसले आणि गप्प बसले. मनात म्हटलं, वाट बघा! यांच्या हातून काय सुटणार? 'हाताची जड आणि बोलून गोड' अशी आहे ही बाई! कारण त्यांच्या अशा प्रकारे गोड बोलण्याने भारावून गेलेली ही पाचवी मुलगी मला त्यांचे गुणगान ऐकवत होती. पण आधीच्या चौघींपैकी कोणाच्याच पदरी काही पडलेले नाही अजून. ना जेवण, ना भेटवस्तू! नुसती बोलाचीच कढी आणि बोलाचाच भात!

काही व्यक्ती अशाच असतात. इतक्या गोड गोड बोलतात की समोरच्याला बोलणे ऐकूनच मधुमेह व्हावा. त्यांचे गोड बोलणे ऐकून विरघळून जायला होते, पण त्या बोलण्यात काही तथ्य नव्हते असे कालांतराने त्या व्यक्तीच्या लक्षात येते.

जो नुसतीच पोपटपंची करतो आणि काही देण्यासाठी मात्र आपली मूठ कधीच उघडत नाही, अशा स्वभावाच्या माणसासाठी 'हाताचा जड आणि बोलून गोड...' ही म्हण तंतोतंत लागू पडते.

अजून तरी कसूरकर वहिनींचे बक्षीस त्या भाचीला मिळालेले नाही. ती भाची बिचारी बक्षिसाची वाट बघते आहे...

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com





कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचार सांगतात जीवनाच्या अवस्था

**मानवी जीवनाच्या** मुख्य अवस्था म्हणजे बाल्य, तारुण्य आणि वार्धक्य. या अवस्था वाक्प्रचारांमधून टिपल्या गेल्या आहेत. लहानपणी मूल बोलायला लागते, तेव्हा अडखळत बोलते. तोंडात दात नसल्यामुळे त्याला काही अक्षरांचा उच्चार करता येत नाही. त्याचे हे 'बोबडे बोल' वाक्प्रचारामध्ये जागा पटकावतात. त्याचा सूचित अर्थ होतो, अधिकार नसताना बोलणे. यामागे अर्थातच विनम्र भाव असतो. उदा. संत तुकडोजी महाराज म्हणतात : 'जीवनाचे माझ्या बोबडे हे बोल / गोड करुनी घ्याल, वाटे जिवा'

पौगंडावस्थेतील मस्ती दर्शवणारा वाक्प्रचार म्हणजे 'शिंग फुटणे'. वासरे वयात आली की त्यांना शिंगे फुटतात. तो संदर्भ येथे अलंकरणाने येतो. या वयातल्या मुलांची जादा चौकस वृत्ती, बंडखोरी या वाक्प्रचारातून सूचित होते. 'मिशांना पीळ भरणे' हा वाक्प्रचार तरुण मुलातील धमक, प्रौढी मिरवणे सांगून जातो. मुलगी वयात येते, तेव्हा तिच्या शरीरातील महत्त्वाच्या बदलाची - मासिक पाळी सुरू होण्याची - दखल घेणारा वाक्प्रचार म्हणजे, 'मुका मुलगा होणे'. शारीरिक क्रियेचा स्पष्ट उल्लेख त्यामुळे टाळला जातो. 'गद्धेपंचविशी' हा वाक्प्रचार नेहमी वापरला जातो. त्यात जनावराशी माणसाचे असणारे साम्य गृहीत धरले आहे. गाढव निमूटपणे पाठीवर ओझे वाहत असते. त्याप्रमाणे संसाराच्या चाकोरीत दैनंदिन कामाची ओझी वाहणारा आणि स्वतःच्या मूढपणावर चरफडणारा तरुण जीव या वाक्प्रचारातून लक्षात येतो. 'पिकले पान' या वाक्प्रचारातून म्हातारपण नेमके कळते. झाडावरचे पान पिकले की गळून जाते. वृद्धत्व आलेली व्यक्तीही तशीच मरणाच्या वाटेवर असते, हे यातून सूचित होते. मृत्यूच्या वेळी वारस वा जवळची व्यक्ती मरणाऱ्या व्यक्तीचे डोके मांडीवर घेते, तेव्हा त्या व्यक्तीला निश्चितपणे मरण येते. त्यामुळे 'मांडी देणे' या वाक्प्रचाराचा अर्थ आहे, जबाबदारी घेणे.

वीचितरंगन्याय : पाण्यात एकामागोमाग एक लाटा निर्माण होतात. क्रमाक्रमाने त्या किनाऱ्यावर फुटतात. तोवर नव्या लाटा येत असतात. सातत्याने एकामागून दुसरी पिढी येत असते; ही जगण्याची रहाटी या दृष्टांतातून सूचित होते.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# कायद्याचं बोला मराठीत !

दरवर्षी मला जिल्हा न्यायालयात मराठी भाषादिनाला काहीतरी भाषण द्यावं असं आमंत्रण येतं. तेव्हा एकदा मी त्यांना विचारलं, ''आपल्या न्यायालयात मराठीतून किती व्यवहार केला जातो?'' यावर, ''आम्हाला मराठीपेक्षा इंग्रजी सोपं पडतं,'' असं उत्तर न्यायाधीश महोदयांनी दिलं, इतर दिवाणी न्यायाधीशांनी त्याला दुजोरा दिला. शासनाने दिनांक २१ जुलै १९९८ रोजी एक अधिसूचना काढून राज्यातील सर्व फौजदारी व दिवाणी न्यायालयांची भाषा मराठी असेल असे घोषित केले आहे. त्यासाठी भाषा संचालनालयाने तयार केलेला 'न्याय व्यवहार कोश' हा न्यायव्यवहाराची परिभाषा उपलब्ध करून देण्याच्या दृष्टीने टाकलेले पहिले पाऊल होते. भाषा संचालनालयाने सिद्ध केलेली विविध विषयांची परिभाषा रूढ आणि लोकप्रिय करण्याची जबाबदारी आपली सगळ्यांची आहे, होय ना!

अर्थात कोश उपलब्ध करून दिले म्हणजे लगेच सगळा न्यायव्यवहार मराठीतून होईल असे नाही, हे माहीत असूनही एक पाऊल उचलले गेले हे महत्त्वपूर्ण आहे. ज्या शब्दांना आपण सहज व नियमित इंग्रजीत उच्चारत असतो, त्याला पर्यायी काय शब्द उपलब्ध होऊ शकतात हे पाहू या. ॲबस्ट्रॅक्ट - संक्षिप्त उतारा /संक्षेप /गोषवारा /सारांश. ॲक्ट ऑफ लॉ - विधिक्रिया, अफेअर्स - कारभार/व्यवहार, ॲंबॅसडर - राजदूत, आर्बिट्रेशन - लवाद/लवाद निर्णय, असेट्स ॲंड लायबिलिटीज - मत्ता आणि दायित्व, ऑक्शन - लिलाव, ऑडिट - लेखापरीक्षा, ऑडिटर - लेखापरीक्षक, बार असोसिएशन - वकील अधिसंघ, बार कौन्सिल - वकील परिषद, बेस कोर्ट - तल न्यायालय, सिविल मॅटर - दिवाणी बाब, चीफ जज - मुख्य न्यायाधीश, चीफ जस्टिस - मुख्य न्यायमूर्ती, चीफ मॅजिस्ट्रेट - मुख्य दंडाधिकारी, क्लेम ऑफ ओनरशिप - स्वामित्वाचा दावा किंवा मालकीचा दावा, रिट- प्राधिलेख, क्लिअरिंग अ बिल - विपत्राचे समाशोधन, क्लीअरिंग हाउस - समाशोधन गृह, कोड - संहिता, कॉमन लॉ - प्रारूढ विधी, कंडिशनल पेमेंट - सशर्त प्रदान, कॉनकॉर्ड - तहनामा, कंडोन् - क्षमापित करणे

सुचवलेले पर्यायी शब्द कळायला अजिबात कठीण नाहीत, पण वापरण्यास अंगवळणी पडणे ही महाकठीण पण प्रयत्नसाध्य गोष्ट आहे.

- डॉ. निधी पटवर्धन
nidheepatwardhan@gmail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# हॅलो !

**एखाद्याचा फोन** आपण घेतो तेव्हा पहिला शब्द उच्चारतो तो म्हणजे 'हॅलो'. आपण फोन घेतलेला आहे आणि फोन करणारा आता बोलू शकतो असा संदेश त्यातून जातो. एखाद्याला भेटल्यावर देखील आपण प्रथम 'हॅलो' म्हणतो. त्याऐवजी आपल्याकडे काही जण 'नमस्कार' म्हणतात; 'राम राम' किंवा 'जय श्रीकृष्ण' म्हणायची पद्धतही कुठे कुठे आहे

आणि त्यात गैर काहीच नाही. 'हॅलो' म्हणण्याऐवजी 'वंदे मातरम्' म्हणावे असाही एक प्रस्ताव मध्यंतरी महाराष्ट्रातील एका मंत्र्यांनी आणला होता, त्याला शासनाने मंजुरीही दिली, पण तो प्रत्यक्षात अमलात आल्याचे दिसत नाही. पण हे अपवादस्वरूप वापरले जाणारे पर्याय सोडले तर जगभर सगळीकडे 'हॅलो' असेच म्हणायची पद्धत रूढ आहे.




'हॅलो' हा शब्द आला कुठून? ज्याने १८७६ साली टेलिफोनचा शोध लावला त्या अॅलेक्झांडर ग्रॅहम बेल याची इच्छा फोन उचलल्यावर 'अहोय' म्हणावे अशी होती. कारण 'अहोय' (Ahoy) हा, डच 'होय' (hoi) वरून आलेला शब्द एखाद्याला भेटल्यानंतर संबोधन म्हणून युरोपात प्रचलित होता. पण त्याचा स्पर्धक थॉमस एडिसन याला ते आवडले नाही. त्याने साधारण त्याच सुमारास अमेरिकेत सेंट्रल टेलिफोन एक्स्चेंजेस उभारायला सुरुवात केली होती व तिथे त्याने कुठलाही आलेला फोन उचलल्यावर 'अहोय'ऐवजी 'हॅलो' (इंग्लिश स्पेलिंग Hullo, तर अमेरिकन स्पेलिंग Hello) हा संबोधन म्हणून प्रचलित असलेला प्रतिशब्द वापरायला सुरुवात केली. टेलिफोन ऑपरेटर म्हणून तिथे काम करणाऱ्या मुलींना 'हॅलो गर्ल्स' असेच म्हटले जाऊ लागले. त्या काळात तंत्रविज्ञानात एडिसनचा सर्वाधिक प्रभाव होता व त्यामुळे 'हॅलो' हेच रूप अमेरिकेत आणि मग जगभर रूढ झाले. तरुण पिढीत आज प्रचलित असलेले 'हाय' हे संबोधन मात्र 'अहोय'चेच लघुरूप आहे. 'हॅलो' या अर्थाने स्पॅनिशमध्ये मूळ लॅटिनमधून आलेला 'ओला' (स्पेलिंग hola, पण उच्चार ओला) हा शब्दही वापरला जातो. याच नावाची टॅक्सी सर्व्हिसदेखील आज जगभर प्रचलित आहे. अशाच दुसऱ्या टॅक्सी सर्व्हिसचे नाव असलेला 'उबर' हा शब्द म्हणजे मात्र मूळ 'उच्च' आणि आधुनिक काळात 'सुपर' या अर्थाचा जर्मन शब्द आहे.

– भानू काळे
bhanukale@gmail.com





# 'सोबत' म्हणजे 'बरोबर'; पण शब्दयोजनेत चूक नको...

**पुढील वाक्ये** वाचा-

''माझ्या नवऱ्याने माझ्यावर आरोप केले आणि माझा अत्यंत छळ केला. असा अन्याय माझ्या बहिणी, मैत्रिणी यांच्यावर कधीच झाला नाही. मग माझ्यासोबतच असं का होतं?''

या वाक्यांचा आशय जरी सहज कळत असला, तरी या वाक्यरचनेत एका शब्दाच्या चुकीच्या प्रयोगामुळे सदोष वाक्य झाले आहे. ते वाक्य शेवटचे - 'मग माझ्यासोबतच असं का होतं?' हे आहे. किंवा असेही वाक्य प्रचारात आहे ... 'माझ्याबरोबरच असं का होतं?'

माझ्यासोबत आणि माझ्याबरोबर या शब्दांत शब्दयोगी अव्यय आहे - सोबत आणि बरोबर. अर्थ आहे - समान, सह, सारखा - वाक्य- 'तू माझ्याबरोबर चल' किंवा 'आपण एकमेकांसह सिनेमा पाहायला जाऊ या' ही वाक्ये आणि 'बरोबर', 'सह' ही शब्दयोगी अव्यये योग्य आहेत. सह (शब्दयोगी अव्यय) अर्थ - संगतीने. सोबत (शब्दयोगी) अरबी शब्द (सोहबत) अर्थ - संगत, बरोबर (सह) असणे.

वरील वाक्य 'माझ्यासोबतच असं का होतं?' ही वाक्यरचना म्हणजे हिंदीचा प्रभाव- 'मेरे साथ ऐसा क्यू होता है?' 'माझ्याबाबतीच असं का होतं?' असे वाक्य हवे. अशीच एक चुकीची वाक्यरचना मराठी भाषकांच्या बोलण्यातच नव्हे, तर लिखाणातही आढळते.

''माझी मैत्रीण मला म्हणाली, 'तुझा भाऊ सुरेश माझ्याबरोबर प्रेम करतो.''' याही वाक्यात 'बरोबर' हे शब्दयोगी अव्यय चुकीचे आहे. हे वाक्य असे हवे- 'तुझा भाऊ सुरेश माझ्यावर प्रेम करतो,' किंवा 'सुरेशचं माझ्यावर प्रेम आहे' अशा अर्थाच्या वाक्यांत 'वर' हे शब्दयोगी अव्यय मराठी भाषेत योजतात. उदा :- 'माझ्यावर, तुझ्यावर, मुलांवर, भाषेवर (प्रेम) इ. अशीच आणखी एक चुकीची वाक्यरचना- 'माझ्या भावाने माझ्या मैत्रिणीसोबत लग्न केले.' या वाक्यातही सोबत हे शब्दयोगी अव्यय चुकीचे आहे. हे वाक्य असे हवे - 'माझ्या भावाने माझ्या मैत्रिणीशी लग्न केले.' मराठी भाषेत अशी शब्दयोजना रूढ आहे, मान्य आहे. 'शी' तृतीया विभक्तीचा प्रत्यय आहे. मात्र वरील वाक्यांतील चुका न होण्याची खबरदारी आपण, मराठी भाषकांनी घेणे आवश्यक आहे.

–यास्मिन शेख





# जितेपणी देईना पाणी, मग बसला तर्पणी

**बापूसाहेब तसा** तालेवार माणूस. खूप सामाजिक कामे करणारा. गोरगरिबांसाठी मनात खूप कळवळा असणारा. पण किती दिवस शरीर तरी साथ देणार? वार्धक्याने त्यांना शेवटी गाठलेच. दोन मुले होती त्यांना. एक सद्शील पण परदेशी वास्तव्याला. आणि दुसरा त्यांच्याजवळच राहात असे, मात्र तो होता दुर्वर्तनी. सगळ्या गावाला बापूसाहेबांची काळजी असे, पण हा मुलगा त्यांच्याकडे अजिबात लक्ष देत नसे. आपल्या पित्याच्या चांगुलपणाची त्याला जाणच नव्हती जणू किंवा जिथे पिकते तिथे विकत नाही, हेच खरे! बापूसाहेब आता पूर्णपणे अंथरुणाला खिळले होते. त्यांना आता दुसऱ्याच्या आधाराची खरोखरीच गरज होती. पण हे चिरंजीव त्यांची काही विचारपूस करतील तर शपथ. परदेशातला मुलगा दुरून का होईना काहीतरी विचारपूस तरी करत होता, पण जवळ राहात असणाऱ्या मुलाला मात्र त्यांच्या तब्येतीविषयी काहीच सोयरसुतक नव्हते. सर्व लोक त्यांच्या या स्थितीबद्दल हळहळत होते, पण काही करू शकत नव्हते. अशा अवस्थेत बापूसाहेब मात्र देवाकडे रोज आपल्या मरणाची भीक मागत होते. पण मरण काय कोणाच्या हातात असते थोडेच. अखेर देवाने त्या पुण्यात्म्याची प्रार्थना ऐकली. त्यांना शांतपणे मरण आले आणि नंतर मात्र चिरंजिवांचे पितृप्रेम खूपच उफाळून आले. परदेशातल्या चिरंजीवांनी आपल्या भावाला कळवले,



'बापूसाहेबांचे सर्व मरणोत्तर विधी अगदी साग्रसंगीत कर. पैशाची काळजी करू नकोस. मी पैसे पाठवतो.'

मग काय दहाव्या, बाराव्याला गाव जेवणे घातली गेली. सारे कसे साग्रसंगीत आणि यथास्थित पार पडले. पण लोक मात्र कुजबुजू लागले, 'जितेपणी देईना पाणी, मग बसला तर्पणी' अशातली गत आहे यांची! काय बोलायचं? असला देखावा न मांडता वेळीच त्यांची सेवा मनोभावे केली असती तर जात्या जिवाला जरा बरे तरी वाटले असते! जीवनातले कटू सत्य सांगणारी ही म्हण आहे. बघा तुम्हाला या अर्थाच्या आणखी काही म्हणी आठवतात का?

– डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com





# वाक्प्रचारांमधील प्रादेशिक संदर्भ

**स्थळ आणि** काळ हे दोन संदर्भ जीवनाशी निगडित असतात. त्यापैकी वाक्प्रचारातील प्रादेशिक संदर्भ या लेखात जाणून घेऊ. 'अनागोंदी कारभार' हा वाक्प्रचार आपण सहज वापरतो. अव्यवस्था, खोटेपणा, पोकळ बडेजाव असा त्याचा अर्थ आहे. त्यामागचा प्रादेशिक संदर्भ असा आहेः अनागोंदी हे गाव तुंगभद्रा नदीच्या डाव्या तीरावर विजयनगरच्या विरुद्ध दिशेला वसलेले आहे. विजयनगरची स्थापना होण्यापूर्वी अनागोंदी ही राजधानी होती. ते राज्य लहान होते, मात्र खोटे जमाखर्च करून मोठेपणा मिरवत असे.

'राजापुरी गंगा' या वाक्प्रचाराचा अर्थ आहे, अकस्मात होणारी गोष्ट. कोकणातील राजापूर या गावी असणारी गंगा अकस्मात वाहू लागते आणि अकस्मात नाहीशी होते. या गूढ नैसर्गिक रूपाला वाक्प्रचाराचे कोंदण प्राप्त झाले आहे. 'धारवाडी काटा' या वाक्प्रचारामध्ये धारवाड शहराचे एक वैशिष्ट्य गोंदले गेले आहे. धारवाड शहर खऱ्या मापाविषयी प्रसिद्ध आहे. हा काटा बरोबर वजन दर्शवणारा असतो. त्यामुळे समतोल, निःपक्षपाती अशा वर्तनासाठी हा वाक्प्रचार वापरतात.

'जुन्नरी हरहुन्नरी' असाही वाक्प्रचार पूर्वी रूढ होता. यातून जुन्नर शहराचे ऐतिहासिक महत्त्व लक्षात येते. हुन्नर म्हणजे कला. पूर्वी जुन्नर शहर व्यापारासाठी प्रसिद्ध होते. बंदरातील मालाची वाहतूक



नाणे घाटाने जुन्नरमार्गे होत असे. तेथील लोक व्यापारात कुशल असत. त्यांच्याशी व्यवहार करताना सावध राहण्याची सूचना या वाक्प्रचारात अभिप्रेत आहे.

'द्राविडी प्राणायाम' या वाक्प्रचाराचा अर्थ आहे, सरळ मार्ग सोडून लांबचा मार्ग स्वीकारणे. प्राणायाम करताना सरळ उजव्या हाताने नाकपुडी न धरता डोक्याच्या मागून हात नेऊन नाकपुडी धरतात. दक्षिणेकडील प्रांतांना द्रविड असे म्हटले जाते आणि द्राविड याचा येथे अर्थ आहे 'चमत्कारिक'. उदा. संगणकाविषयी सुबोध जावडेकर लिहितात : 'याच्या अतर्क्य वेगामुळे द्राविडी प्राणायाम करून सोडवलेल्या गणिताची उत्तरेसुद्धा डोळ्याचे पाते लवते न लवते तोच आपल्यापुढे हजर होतात.' अशा वाक्प्रचारांमुळे जुन्या काळच्या मराठी भाषक समाजाचा नकाशाही समोर येतो.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# अनुवादावरील इंग्रजीचा प्रभाव

**'अगं, येताना** तू काही वस्तू आणू शकशील का?', मैत्रिणीचा संदेश पाहून मी लिहिलं, 'हो. शकेन, शकेन.' यातला गमतीचा भाग सोडा, पण विनंतीवजा वाक्यांसाठी मराठीत 'शकणे' हे सहायक क्रियापद वापरणं आता बरंच रूढ झालं आहे. इंग्रजीतल्या 'कॅन'चा हा प्रभाव आहेच, पण त्याचबरोबर या वाक्यरचनेमुळे आपल्या बोलण्यात किंवा लिहिण्यात सौजन्य व्यक्त होतं ही भावनाही आहे.

एखाद्या भाषेतील साहित्य दुसऱ्या भाषेत येताना फक्त शब्द घेऊन येत नाही, तर त्याबरोबर तिथली सांस्कृतिक वैशिष्ट्यंही घेऊन येतं. सद्य काळात मराठीच्या सर्वांत जास्त संपर्कात येणाऱ्या भाषा म्हणजे हिंदी आणि इंग्रजी. साहजिकच, या दोन्ही भाषांचा मराठीच्या विविध अंगांवर जास्त प्रभाव पडतो. भारतात इंग्रजी शिकायला सुरुवात झाल्यापासून इंग्रजीतून मराठीत मोठ्या प्रमाणावर साहित्य अनुवादित होत आहे. आताच्या काळात तर साहित्याबरोबर, वृत्तपत्रे, वाहिन्या, मनोरंजन, जाहिराती अशा अनेक क्षेत्रांमध्ये अनुवादाची प्रक्रिया मोठ्या प्रमाणावर घडते आहे. साहित्य वगळता बाकी क्षेत्रांमध्ये अत्यंत कमी कालमर्यादा असल्याने घाईघाईने केलेले अनुवाद, संपादन किंवा पुनर्तपासणीचा अभाव अशा अनेक कारणांनी बरेचदा शब्दशः भाषांतर होऊन इंग्रजीच्या धर्तीवर वाक्यरचना होते. 'तो मुलगा, ज्याचे केस लाल आहेत.' किंवा 'जर आपल्याकडे दूरदृष्टी असेल तर...' अशा 'जर...तर', 'ज्यामुळे ...त्यामुळे' असलेल्या वाक्यरचनांचं प्रमाण वाढलेलं दिसतं. 'मला खात्री आहे, की तुम्ही याल.' किंवा 'तो आला नाही, कारण पाऊस आला.' अशाप्रकारच्या मिश्र किंवा संयुक्त वाक्यरचनाही मोठ्या प्रमाणावर दिसतात. जाहिरातींच्या अनुवादात बरेचदा विभक्तिप्रत्यय आणि सामान्यरूपांकडे लक्ष दिलं जात नाही, शिवाय, विभक्तिप्रत्यय आणि शब्दयोगी अव्यय सुटे लिहिणं असंही घडतं. असा मजकूर सतत वाचून-लिहून या बदलांचा प्रभाव आता अनुवादाव्यतिरिक्त मूळ मराठी लेखनात आणि बोलण्यात दिसू लागला आहे.

'विद्यार्थ्यांकडून झेंडे लावले गेले.' अशा कर्त्याला 'कडून' प्रत्यय लागलेल्या वाक्यरचनेला पूर्वी आपण 'नवीन कर्मणी' अशा नावाने स्वीकारलं. आता सद्य वाक्यरचनांचाही नव्याने अभ्यास करण्याची गरज निर्माण झाली आहे.

– वैशाली पेंडसे-कार्लेकर
vaishali.karlekar1@gmail.com

लोकसत्ता Thu, 10 November 2022
https://epaper.loksatta.com/c/70815719



**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# कथा, कहाणी, किस्सा आणि काण्ड

**कथा किंवा कहाणी** या दोन्ही शब्दांचा अर्थ गोष्ट किंवा कथानक असा आहे. दोन्ही शब्दांचे मूळ 'कथिका' या संस्कृत शब्दात आहे. 'कथिका'वरून 'कथा' शब्द बनला आणि 'कथिका'चेच अपभ्रष्ट रूप 'कहिआ' या शब्दाला 'णी' हा प्राकृत प्रत्यय लागून 'कहाणी' शब्द तयार झाला. 'कथणे' म्हणजे 'सांगणे' या शब्दापासूनही 'कथा' शब्द बनला असेल असे कृ. पां. कुलकर्णी यांचा 'मराठी व्युत्पत्ति कोश' सांगतो. साहित्यात मात्र 'कथा' हा एक विशिष्ट प्रकार आहे. संपादक लेखकाकडे मागतो ती 'कथा'. 'साठा उत्तरांची कहाणी' अशा काहीशा पारंपरिक संदर्भात वापरल्या जाणाऱ्या 'कहाणी' शब्दाला ती विशिष्ट वाङ्मयीन अर्थच्छटा नाही.

'किस्सा' शब्दाचे मूळ मात्र अगदी वेगळे आहे. डॉ. यू. म. पठाण यांच्या 'फार्सी-मराठी अनुबंध' या ग्रंथानुसार 'किस्सा' हा शब्द 'भांडण' या अर्थाने फार्सीत रूढ आहे. 'किस्सा होणे' म्हणजे भांडण होणे, 'किस्सा सांगणे' म्हणजे आपली बाजू मांडणे, 'किस्सा घालणे' म्हणजे वाद होणे आणि 'किस्सा तुटणे' म्हणजे वाद मिटणे असे त्या शब्दाचे चार प्रयोग त्यांनी दिलेले आहेत. मराठीत मात्र त्यांपैकी कुठल्याच अर्थाने आपण 'किस्सा' शब्द वापरत नाही. हा शब्द छोटीशी रंजक कथा



किंवा विनोद या अर्थाने आपण वापरतो. जसे की, 'पुलंचे अनेक किस्से सांगून मिरासदारांनी भाषणात मजा आणली.' हिंदीत मात्र किस्सा शब्द फार्सी आणि मराठी या दोन्ही भाषांमधील अर्थच्छटांनी वापरला जातो. जसे की 'किस्सा कुर्सी का'. 'काण्ड' शब्द मूळ संस्कृतात 'खंड' किंवा 'तुकडा' या अर्थाने आहे. उसाचे 'कांड' हा त्याच अर्थाचा प्रयोग. पण ग्रंथाचे एक प्रकरण किंवा एखादा विशिष्ट कालखंड हाही अर्थ संस्कृतात आहे. उदाहरणार्थ, रामायणातील अरण्यकाण्ड किंवा बालकाण्ड. आज मात्र त्या शब्दाला 'फार मोठा गैरव्यवहार' असा अर्थ प्राप्त झाला आहे. कदाचित हिंदी पत्रकारितेच्या प्रभावामुळे. पण त्याच अर्थाने आज 'काण्ड' शब्द अधिक वापरला जातो. जसे की, 'वासनाकाण्ड' किंवा 'त्या व्यापाऱ्याने तिथेही मोठे काण्ड केले.' साधारण सारख्याच अर्थाचे शब्द असले तरी त्यांच्या प्रत्यक्ष वापरात अशाप्रकारे बराच फरक पडतो.

– भानू काळे
bhanukale@gmail.com

लोकसत्ता Fri, 11 November 2022
https://epaper.loksatta.com/c/70824282

 कांचन कराई द्वारा संकलित

# ‘त’ तेथे ‘थ’ आणि ‘थ’ तेथे ‘त’?

**हे वाक्य** वाचा- ‘‘मराठीतील प्रतिथयश साहित्यिक वि. स. खांडेकर यांच्या ‘ययाती’ या कादंबरीला सर्वश्रेष्ठ ज्ञानपीठ पारितोषिक मिळाले होते.’’ या वाक्यातील आशय लक्षात येतो; पण एका शब्दाचे सदोष रूप लक्षात येईलच असे नाही. तो शब्द आहे- ‘प्रतिथयश’ या शब्दातील पहिला शब्द ‘प्रतिथ’ याला काहीच अर्थ नाही. योग्य शब्द आहे ‘प्रथितयश’. प्रथित शब्दामध्ये धातू आहे प्रथ् (संस्कृत) अर्थ- पसरणे, प्रख्यात होणे. या धातूपासून विशेषण होते- प्रथित (सं.) अर्थ - प्रख्यात. यश (सं.) अर्थ-कीर्ती. प्रथितयश या शब्दाचा अर्थ आहे- ज्याची किंवा जिची कीर्ती प्रख्यात आहे असा किंवा अशी. प्रथ् या धातूपासून नाम (सं-नाम, स्त्रीलिंगी) होते - प्रथा - अर्थ - चाल, रूढी, प्रख्याती, प्रथितयश या शब्दाचा अर्थ योग्य आहे. आणि तोच शब्द वरील वाक्यात वापरणे आवश्यक आहे. ‘प्रतिथयश’ हा शब्द निरर्थक आहे. वरील वाक्य असे हवे - ‘मराठीतील प्रथितयश साहित्यिक वि. स. खांडेकर...’

अशाच आणखी एका चुकीच्या शब्दाची योजना आपण वारंवार करतो. वाक्य- ‘त्याच्या म्हणण्याचा मतितार्थ तुझ्या लक्षात आला का?’ मतितार्थ शब्द सदोष आहे; खरे म्हणजे अर्थशून्य आहे. निर्दोष, योग्य शब्द आहे- ‘मथितार्थ’. मथ् (संस्कृत धातू) अर्थ घुसळणे. मथ्पासून साधलेले विशेषण आहे - मथित. अर्थ आहे - घुसळून काढलेला. चर्चा, वाद किंवा परीक्षण यांतून निघालेला. ‘मथितार्थ’ या शब्दाचा अर्थ आहे- घुसळून काढलेल्या परीक्षणाचा निष्कर्ष, तात्पर्य. (‘अर्थ’ या शब्दाचा अर्थ आहे- चर्चेतून, परीक्षणातून निघालेला.) आणखी एक चुकीची पण रूढ असलेली वाक्यरचना अशी - ‘माझ्या मित्रावर इतकी संकटे आली, त्यामुळे त्याची झालेली दुरावस्था पाहवत नाही.’ या वाक्यात शब्दाचे चुकीचे रूप आहे- दुरावस्था. दुर किंवा दुः - शब्दाच्या आधी येणारा उपसर्ग. दुर अवस्था = दुरवस्था (दुः-वाईट) शब्दाचा अर्थ आहे - वाईट अवस्था. ‘दुरवस्था’ हा शब्द योग्य. असेच काही शब्द- दुर्दशा, दुर्दैव, दुर्बुद्धी, दुराचार, दुरात्मा, दुर्गंध, दुर्गुण, दुर्बोध (कळण्यास कठीण), दुर्मिळ- (मिळण्यास कठीण) इत्यादी.

| | |
|---|---|
| ~~प्रतिथयश~~ | प्रथितयश ✓ |
| ~~मतितार्थ~~ | मथितार्थ ✓ |
| ~~दुरावस्था~~ | दुरवस्था ✓ |

– यास्मिन शेख

लोकसत्ता Mon, 14 November 2022
https://epaper.loksatta.com/c/70854185



# जुने सूप शेणाने घट्ट तसा म्हातारा माणूस खाण्याने...

**पूर्वीच्या काळी** स्वयंपाकघरात सूप ही अतिशय आवश्यक अशी वस्तू होती. धान्य पाखडण्यासाठी, भाजलेल्या शेंगदाण्यांची फोलपटे पाखडण्यासाठी वगैरे अनेक गोष्टींसाठी त्याचा फार चांगला उपयोग गृहिणी करून घेत असत. पण ते सूप कधीतरी जुनेपुराणे होतच असे. मग गृहिणी ते सूप लगेच टाकून न देता त्याला शेणाचा मुलामा देऊन ते परत एकदा वापरण्यास योग्य करीत. आता हे जितके खरे तितकेच आपल्या जीर्ण होणाऱ्या शरीराची वेळच्या वेळी काळजी घेऊन ते शरीर जास्तीत जास्त कार्यक्षम ठेवणेही आवश्यक आहे. एकुणात काय तर प्रत्येक गोष्टीसाठी सध्याच्या भाषेत बोलायचे तर 'मेंटेनन्स' आवश्यक असतो. शरीर ही देखील परमेश्वराने निर्माण केलेली अत्युत्कृष्ट यंत्रणा आहे, हे आपण अनेकदा विसरतो. शरीराच्या कुरबुरी सुरू झाल्या की जीव एकवटून एकदम सारे प्रयत्न करू लागतो. वेळीच एक टाका घातला तर तो पुढील १० टाक्यांचे काम करीत असतो, ही मोलाची गोष्टही आपण विसरतो.

पण केळकर आजोबांचे तसे नव्हते. त्यांचे जगणे अतिशय आदर्श असे होते. आपला आहार, आपला व्यायाम, आपली विश्रांती ही निरोगी आयुष्यासाठीची त्रिसूत्री आहे हे त्यांना पक्के ठाऊक होते. त्यांचे वय सत्तरी ओलांडून पुढे गेलेले



असले तरी त्यांच्या सर्व शारीरिक तपासण्यांचे रिपोर्ट्स चाळिशीच्या तरुणाला लाजवतील असे होते. आणि त्यांचा काम करण्याचा आवाकाही तरुणांना लाजविणारा असाच होता. सर्वांनाच याबद्दल आश्चर्य वाटे.

त्यांच्या या उत्तम शरीर प्रकृतीचे रहस्य काय, असे एखाद्या तरुणाने विचारले तर ते सहजच म्हणत, 'तेवढे मात्र माझ्या गृहखात्याला म्हणजे तुमच्या केळकर आजींनाच विचारा! त्या सांगतील.' त्यावर केळकर आजी म्हणत, 'अरे, काही नाही रे! माझी आजी मला एक म्हण नेहमी सांगायची. जुने सूप शेणाने घट्ट होते आणि म्हातारा माणूस खाण्याने!'

**- डॉ. माधवी वैद्य**
madhavivaidya@ymail.com

**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचारांमधील कालमापन

**काल हे** जगण्याचे एक महत्त्वाचे परिमाण आहे. जीवनव्यवहारातील कालविषयक संवेदन वाक्प्रचारांतूनदेखील व्यक्त होते.

पंच पंच उषःकाली, असा वाक्प्रचार जुन्या साहित्यात आढळत असे. सूर्योदयाच्या पूर्वी पाच घटकांचा काळ असा त्याचा अर्थ आहे. घटका म्हणजे ६० पळांचा किंवा २४ मिनिटांचा काळ होय. 'पंच पंच उषःकाली रविचक्र निघो आले', असा अरुणोदय त्यातून कळतो.

तांबडे फुटणे हा वाक्प्रचार 'फुटणे' या क्रियापदाचा सर्जनशील अर्थ सुचवतो. सूर्योदयापूर्वी आकाश तांबड्या रंगाचे झालेले असते. या नैसर्गिक रूपाचे संवेदन यात आले आहे. तांबडे फुटणे म्हणजे उजाडणे.

कासराभर सूर्य वर येणे, या वाक्प्रचाराचा संबंध ग्रामीण जीवनाशी निगडित आहे. कासरा म्हणजे बैलांना बांधलेली लगामासारखी दोरी. कासराभर सूर्य वर येणे म्हणजे क्षितिजापासून कासऱ्याच्या लांबीइतका सूर्य वर येणे, साधारण सकाळी सात वाजण्याच्या सुमार. यातील कालमापन काटेकोर नाही. अष्टौप्रहर म्हणजे सतत, निरंतर. 'आई अष्टौप्रहर काम करते', असे शब्द कानी पडतात. प्रहर म्हणजे तीन तास. अष्टौप्रहर याचा शब्दशः अर्थ २४ तास असा आहे. वाक्प्रचारात लक्ष्यार्थ



अभिप्रेत आहे.

सटी सामाशी/ सठी षण्मासी असा वाक्प्रचार रूढ आहे. षष्ठ षण्मास अशी त्याची फोड करता येते. याचा अर्थ आहे, केव्हा तरी. पु. शि. रेगे यांनी 'गंधरेखा' या कवितेत काव्य-निर्मितीविषयी म्हटले आहे, 'एक आहे झाड माझे, राठ ज्याच्या जीर्ण शाखा/ सठी षण्मासी परंतु/ लाख येती त्या शलाका'

बारा वाजणे, हा वाक्प्रचार उतरती कळा लागणे, विनाश जवळ येणे, या अर्थी वापरतात. सूर्य बारा वाजता आकाशाच्या मध्यावर येतो आणि पश्चिमेकडे उतरायला लागतो. या निसर्गनिमावरून हा अर्थ रूढ झाला आहे. उदा. पद्मजा फाटक, माधव नेरूरकर यांच्या 'बाराला दहा कमी' या शीर्षकाच्या पुस्तकात वैज्ञानिक प्रगतीच्या वाटेवरील धोक्याची कल्पना दिली आहे.

काळाची गती पकडण्याचे काम वाक्प्रचार अशाप्रकारे समर्थपणे करतात.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# साधे-सोपे प्रतिशब्द

**जेव्हा आमच्याकडे** कामाला येणाऱ्या मावशी, कौतुकाने सांगतात की कष्टपूर्वक त्यांनी त्यांच्या मुलीला इंग्रजी माध्यमाच्या शाळेत घातले आहे, त्यांना इंग्रजी येत नाही म्हणून तिला शिकवणीही लावली आहे, तेव्हा त्यांना काही सांगायला जाणे म्हणजे त्यांच्या उत्साहावर विरजण पाडण्यासारखे असते. आणि त्या समाजाच्या ऊर्ध्वगामी गती प्रमाणेच वागत असतात, त्यांची तरी काय चूक?

इंग्रजी माध्यमातील अनेक विद्यार्थी मातृभाषेच्या ज्ञानापासून वंचित राहतात. एक कोरडे देवघेवीचे साधन म्हणून ते मराठी वापरतात. मराठीतील संदर्भ पोषणाची शक्ती त्यांना दिसत नाही, दिसत नाही म्हणण्यापेक्षा गवसत नाही. आणि अपुऱ्या भाषिक कौशल्यांनिशी ते आपला भाषा व्यवहार भागवतात. अगदी साध्या साध्या रोजच्या वापरातल्या परकीय शब्दांना पर्यायी मराठी शब्द कोणते देता येऊ शकतात पाहूया.

ॲलर्जी- वावडे, नोटीस- सूचना, दखल, जाणीव, नोटिफिकेशन- अधिसूचना, नोट- अधिटिप्पणी, चिठ्ठी, नोंद, ऑफिस- कार्यालय, ऑर्डर- आदेश, ओरिजनल- मूळचा, ओरिजिन- मूळ, अदरवाइज- अन्यथा, ऑर्डिनरी- सर्वसामान्य, सामान्य, साधारण, पेपर्स- कागदपत्रे, पेपर करन्सी- कागदी चलन, पेटंट- एकस्व, स्वामित्व. पार्टनर- भागीदार, पार्शिॲलिटी- पक्षपात, प्लेट- ताटली, थाळी, प्रिमिअम- अधिमूल्य, विम्याचा हप्ता, प्रोबेशन- परिवीक्षा, पब्लिक स्ट्रीट- सार्वजनिक रस्ता, क्वालिफिकेशन- अर्हता, विशेष, क्वालिटी- दर्जा, कोटेशन- दरपत्रक, रिमार्क- शेरा, अभिप्राय, राइट- अधिकार, हक्क, सॅलरी- वेतन, सबस्क्राईब करा- वर्गणीदार व्हा, लाईक- शेअर- कमेंट- आवडले, सामायिक केले, टिप्पणी केली असे साधे साधे शब्द रोजच्या वापरात आणले तर ते रुळू शकतात.

संदर्भानुसार शब्दाचे अर्थ बदलतात हे मुलांना खेळातून शिकवता येऊ शकते. सिस्टर हा शब्द चर्चमध्ये वेगळा, घरात वेगळा आणि दवाखान्यात वेगळा. नेहमीची पार्टी वेगळी आणि कायद्यामध्ये पार्टी म्हणजे पक्षकार, चित्रपटगृहात स्क्रीनिंग म्हणजे दाखवणे आणि न्यायव्यवस्थेत बचाव करणे किंवा लपवणे. मराठी भाषेची श्रीमंती अमाप आहे, ती भरपूर लुटली तर लुटणारा आणि पदरी पाडून घेणारा दोघेही सांस्कृतिकदृष्ट्या धनवान होतील, यात शंका नाही.

-डॉ. निधी पटवर्धन
nidheepatwardhan@gmail.com





भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# ‘भंगार’ आणि ‘कोहिनूर’

**मराठीप्रमाणे हिंदीतही** ‘भंगार’ हा शब्द ‘फेकून द्यायच्या बिनकामाच्या वस्तू’ याच अर्थाने वापरला जातो. नाशवंत या अर्थाच्या ‘भंगुर’ या संस्कृत शब्दावरून तो आला असावा. जसे की, क्षणभंगुर म्हणजे क्षणात भंग पावणारे. तशा गोष्टी विकत घेणारा तो ‘भंगारवाला’ हाही शब्द रूढ आहे. पण ‘भंगार’ शब्दाचा संस्कृतमधील दुसरा अर्थ ‘सोने’ असाही आहे; ‘भू+अंगार’ अशीही त्या शब्दाची फोड केली गेली आहे. म्हणजे आपल्याकडे प्रचलित असलेल्या अर्थाच्या अगदी विरुद्ध अर्थ! कन्नड भाषेतही सोने याच अर्थाने भंगार शब्द वापरला जातो.

एखादा शब्द एका भाषेतून दुसऱ्या भाषेत जाताना अर्थबदल अनेकदा होत असतो. जसे की, ‘चेष्टा’ या मूळ संस्कृत शब्दाचा अर्थ ‘प्रयत्न’ असा आहे आणि हिंदीत तो त्याच अर्थाने वापरतात. मराठीत मात्र ‘चेष्टा’ म्हणजे ‘थट्टा’ किंवा ‘मस्करी’. हिंदीतील ‘चाराघोटाला’ या वृत्तपत्रीय शब्दप्रयोगात ‘चारा’ शब्दाचा अर्थ मराठीप्रमाणेच ‘गाईगुरांनी खायचे गवत’ हाच आहे; परंतु सामान्यतः ‘चारा’ शब्द हिंदीत ‘उपाय’ या अर्थाने वापरला जातो. जसे, ‘उस के सामने और कोई चारा नही था.’ मराठीत मात्र ‘गाईगुरांनी खायचे गवत’ याच एका अर्थाने ‘चारा’ शब्द वापरतात. किंवा ‘कामात



व्यग्र’ या अर्थाने हल्ली वापरल्या जाणाऱ्या ‘व्यस्त’ या हिंदी शब्दाचा मराठीतील अर्थ मात्र ‘विषम’ असा आहे. तसा अर्थबदल अनेकदा होतो; पण ‘भंगार’ शब्दाच्या संदर्भात सोन्याचे रूपांतर केरकचऱ्यात होणे हे मात्र अर्थबदलाचे अगदी टोकाचे उदाहरण मानता येईल!

कोहिनूर हा अत्यंत तेजस्वी हिरा गोवळकोंडा येथील खाणीत सापडला होता आणि पुढे बऱ्याच हस्तांतरांनंतर तो इंग्लंडच्या तत्कालीन राणीकडे दिला गेला. मध्यंतरी जेव्हा राणी एलिझाबेथ यांचे निधन झाले त्यावेळी तो कोहिनूर ब्रिटिश सरकारने भारताला परत करावा, अशी मागणी काही जणांनी केली होती. कोहिनूर या मूळ फार्सी शब्दाची फोड कोह् इ नूर अशी असून त्याचा अर्थ ‘तेजाचा किंवा प्रकाशाचा पर्वत’ असा आहे. खोदलेल्या खाणीत सापडलेल्या हिऱ्याला पर्वताची उपमा दिली जाणे हीदेखील एक गंमत आहे!

– भानू काळे
bhanukale@gmail.com

# अर्ध्याच अक्षरातून अ(न)र्थ!




**पुढील वाक्य** वाचा- 'तुम्ही त्याच्यावर कोर्टात जे आरोप केले आहेत, त्या आरोपांच्या पुष्टर्थ आवश्यक ते पुरावे, कागदपत्रे तुम्हांला कोर्टासमोर सादर करणे आवश्यक आहे.'

आता 'पुष्टर्थ' या शब्दाचे नेमके स्वरूप काय आहे, ते पाहू या. या शब्दाची फोड अशी होईल- पुष्ट+र्थ? पुष्ट (संस्कृत विशेषण) अर्थ आहे- पोसलेला, जाडा, भरभक्कम. 'र्थ'ला काहीच अर्थ नाही! 'र्थ' असे अव्यय अस्तित्वातच नाही त्यामुळे हा शब्दच संस्कृतात वा मराठीत उपलब्धच नाही. पोसलेला (पुष्ट) हा शब्दही वरील वाक्यात चुकीचाच आहे, अर्थशून्य आहे. योग्य शब्द आहे- पुष्ट्यर्थ- पुष्टि अर्थ, पुष्टि हे संस्कृत नाम आहे. या शब्दाचा अर्थ आहे- दुजोरा. या शब्दाला अर्थ हे अव्यय जोडलेले आहे. या शब्दयोगी अव्ययाचा अर्थ आहे- करिता. पुष्टि अर्थ पुष्ट्यर्थ- या शब्दाचा अर्थ आहे- दुजोरा देण्याकरिता, सिद्ध करण्यासाठी. त्यामुळे पुष्टर्थ हा निरर्थक शब्द टाळणे अत्यंत आवश्यक आहे.

वरील वाक्य असे हवे- 'तुम्ही त्याच्यावर कोर्टात जे आरोप केले आहेत, त्या आरोपांच्या पुष्ट्यर्थ आवश्यक ते पुरावे, कागदपत्रे तुम्हांला कोर्टासमोर सादर करणे आवश्यक आहे.'

आणखी एका शब्दाची चूक मराठी माणसे लेखनात वारंवार करतात. 'अनावृत' या शब्दाऐवजी 'अनावृत्त'.

या दोन्ही शब्दांची फोड करून अर्थ पाहू या.

अनावृत (विशेषण) अन्+आवृत. हा शब्द संस्कृतातील मराठीने स्वीकारलेला तत्सम शब्द आहे. अर्थ आहे- झाकण नसलेले, उघडे. अनावृत्त (वि) अन्+आवृत्त अर्थ आहे- ज्याची पुनः आवृत्ती होणार नाही किंवा जे पुन्हा घडणार नाही ते.

अनावृत पत्र- जाहीररीत्या लिहिलेले, उघड पत्र (कोणीही वाचावे असे) जेव्हा एखाद्या प्रसिद्ध व्यक्तीतील दोष, चुका किंवा त्या व्यक्तीने केलेले अन्याय किंवा निरर्थक आरोप इ. उघड करणारे पत्र जाहीरपणे वृत्तपत्रात, साप्ताहिकात किंवा अन्यत्र आपण छापून आणतो, त्या पत्राच्या शेवटी 'अनावृत पत्र' असे लिहिणेच योग्य आहे. अनावृत्त (आवृत्ती नसलेले, पुनः न घडणारे) अशा अर्थी चुकीचा शब्द योजू नये.

– यास्मिन शेख





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# ताकाआधी म्हशीचे भांडण...

**खरे तर** अरविंदकुमारांना आता आपल्याला नोकरीत बढती मिळू शकते अशी जेव्हा कुणकुण लागली तेव्हापासूनच त्यांना अधिकारी म्हणून खुर्चीवर बसण्याची घाई झाली होती. खरे तर ती बढती मिळण्याचा काळ अजून दूर होता. त्याची स्वप्ने आत्ताच बघणे म्हणजे गुडघ्याला बाशिंग बांधण्यासारखेच होते. कोणत्याही व्यक्तीला योग्य वेळी योग्य ती स्वप्ने पडणे आणि त्या व्यक्तीनेही ती योग्य वेळीच बघणे हे अतिशय महत्त्वाचे असते. पण अरविंदकुमार यांना तेवढी कुठली सवड असायला? त्यातून त्यांना आपल्या आधी कोणी दुसराच अधिकारी ती जागा बळकावून तर नाही बसणार ना, अशी भीतीही वाटत होती. मग त्यांनी आपणच कसे या जागेसाठी योग्य आहोत आणि इतर कोणी तिथे अधिकारी म्हणून येणे कसे अनुचित आहे, अशी तजवीज करण्याचे अनंत घाट घातले. अती घाई संकटात नेते हे त्यांना बहुधा माहीत नसावे.

त्यांचा एक मित्र हे सर्व लांबून बघत होता. त्यावर तो आपल्या एका दुसऱ्या मित्राला म्हणाला, अरे! म्हशीच्या दुधाच्या धारा अजून काढायच्या आहेत, ती किती दूध देणार याचा काहीच अंदाज नाही. त्या दुधाचे नेमके काय करायचे ते अजून ठरलेले नाही. दुधाचे दही लावायचे का नाही तेही



अजून ठरलेले नाही. ताक घुसळायला अजून खूप अवकाश आहे. तरीही दारी बांधलेली म्हैस आणि ताक यावरून आत्ताच भांडणाला सुरुवात करायची? काय हा घायाकुता स्वभाव! याच अर्थाची आणखी एक म्हण आहे ती म्हणजे 'बाजारात तुरी आणि धनी धनिणीला मारी.' बाजारातल्या तुरी अजून घरी आलेल्या नाहीत पण त्या तुरीचे सारे वरण मात्र मीच खाणार, असे म्हणणाऱ्या भ्रतारासारखे हे झाले. नाही का? या म्हणीचा भावार्थ असा की अजून अस्तित्वात नसणाऱ्या गोष्टीवर हक्क दाखवत विनाकारणच तंटा बखेडा उभा करणे.

**- डॉ. माधवी वैद्य**
madhavivaidya@ymail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचारांमधील दृष्टांत

**मराठीमध्ये संस्कृतमधून** आलेले काही न्याय हे वाक्प्रचार म्हणून रूढ झाले आहेत. येथे 'न्याय' याचा अर्थ 'दृष्टांत' किंवा समर्पक उदाहरणातून सुचवलेला बोध होय. 'काकतालीय न्याय' याचा मराठीत रूढ अर्थ आहे, कावळा बसायला नि फांदी मोडायला एक वेळ येणे. 'बोलाफुलाची गाठ' हा वाक्प्रचारदेखील हाच अर्थ व्यक्त करतो. याचा सूचित अर्थ आहे, एखादी गोष्ट अचानक/कर्मधर्मसंयोगाने घडणे. घुणाक्षरन्याय याचाही अर्थ असंकल्पित घटना असा आहे; कारण घुण नावाचा कीटक लाकूड कोरतो, तेव्हा त्यात एखाद्या अक्षराची आकृती उमटल्याचा भास होतो.

शुकनलिकान्याय- पोपट पकडण्यासाठी पारधी एक नळी टांगून ठेवतात. ती नळी फिरत असते. पोपट त्या नळीवर बसतो नि नळी फिरल्यावर तो खाली येऊन उलटा टांगला जातो. पंख असल्याचे विसरून तो भीतीने नळी पायात घट्ट धरतो. एकंदरीत आपल्या क्षमतांचा विसर पडल्यामुळे येणारी असहायता यातून व्यक्त होते.

शलाकापरीक्षा करणे, हा वाक्प्रचारही दृष्टांतासारखाच आहे. शलाका म्हणजे सळई. कोश अथवा ग्रंथ असतो, तेव्हा त्यात एक सळई घालून, कोणतेही पान उघडून, ते वाचून त्याची परीक्षा करतात. यावरून याचा अर्थ होतो, थोडा अंश



पारखून एकूण अंदाज घेणे. 'शितावरून भाताची परीक्षा' याचा अर्थदेखील हाच आहे.

'हंसक्षीरन्याय' कधीतरी आपल्या वाचनात आलेला असतो. दूध आणि पाणी एकत्र असेल तर हंस हा पक्षी दूध तेवढे पितो आणि पाणी वेगळे काढतो, अशी समजूत आहे. बरे- वाईट एकत्र असताना त्यातील चांगले तेवढे निवडणे, यात अभिप्रेत आहे. 'नीरक्षीरविवेक' हा वाक्प्रचारही यातूनच आला आहे.

'देहलीदीपकन्याय' यात देहली (संस्कृत शब्द) म्हणजे उंबरठा. उंबरठ्यावर दिवा ठेवला असता त्याचा उजेड दोन्ही बाजूंना पडतो. त्यामुळे जेव्हा एखादा शब्द दोन्हीकडे सारखाच लागू पडतो, तेव्हा याचा वापर करतात.

असे विविध दृष्टांत लोकभाषेत रूढ होऊन वापरले जात असतात. त्यांतून अलंकरणाबरोबरच अनुभवातून आलेले शहाणपणही सूत्ररूपाने संक्रमित होत असते.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# मराठी विज्ञान परिभाषा

**शास्त्रीय ज्ञान** शक्य तितक्या सोप्या भाषेत विद्यार्थी आणि सामान्य वाचकांपर्यंत मराठीतून पोहोचवणं या हेतूने एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीला मराठी विज्ञान परिभाषानिर्मितीला सुरुवात झाली. मुख्यतः भाषांतर स्वरूपातल्या या लेखनाच्या गरजेनुसार लिहिण्याच्या ओघात सुचलेल्या नवनवीन अर्थवाहक संज्ञा लेखकांकडून वापरल्या गेल्या आणि पुढे त्या रूढही झाल्या.

'सिद्धपदार्थविज्ञानशास्त्रविषयक संवाद' या १८३३ मध्ये प्रसिद्ध झालेल्या हरि केशवजी पाठारे यांच्या भाषांतरित पुस्तकात इनर्शिया- जडत्व, पुली- कप्पी, पॉवर- उच्चालक, लेन्स- आर्शी अशा काही मराठी, तर अल्कली- आलकेली, लिगामेंट- लिगामेंट अशा काही इंग्रजी तद्भव संज्ञा आढळतात. १८३७ मध्ये बाळशास्त्री जांभेकर यांनी 'दिग्दर्शन' या नियतकालिकामध्ये गुरुत्व, गुरुत्वमध्य, आघात-प्रत्याघात, बिंदू, यांत्रिक शक्ती अशा चपखल संज्ञा सुचवल्या आहेत, तर नैत्रिक ॲसिड, हैड्रोजन, रेडिअम या संज्ञा अशाप्रकारे मूळ रूपातच ठेवल्या. १८६५ मधील 'औषधिविद्या' मध्ये नारायण दाजी यांनी सुचवलेले कंपाऊंडर- औषधमेलनकर्ता, प्रिस्क्रिप्शन- चिकित्सालेखन असे अनेक योग्यार्थवाहक शब्द आढळतात. (संदर्भ- मराठी विज्ञान परिभाषा - डॉ. मेधा उज्जैनकर)

पुढे शास्त्रीय ग्रंथ, 'सृष्टिज्ञान' सारखी नियतकालिकं, 'मराठी विज्ञान परिषदे' सारख्या संस्था, शासकीय मराठी परिभाषा समिती तसेच अनेकांच्या अथक प्रयत्नांमधून विज्ञान परिभाषा घडत गेली. आजपर्यंत शासनातर्फे विज्ञान विषयांबरोबरच इतर विषयांचे एकूण ४८ परिभाषा कोश प्रसिद्ध झाले आहेत. त्यांतले ३५ महाजालावरही उपलब्ध आहेत.

२०२० च्या राष्ट्रीय शिक्षण धोरणात भारतीय भाषांमधील शिक्षण आणि बहुभाषिकतेवर भर दिला असून शालेय तसेच उच्च शिक्षणासाठीही द्विभाषिक पद्धती सुचवली आहे. यात एक भाषा ही मातृभाषा/स्थानिक भाषा असेल असे स्पष्टपणे म्हटले आहे. मराठीतून लवकरात लवकर उच्च स्तरापर्यंतचं विज्ञानशिक्षण सुरू करण्यासाठी ही सुसंधी आहे. यात सद्य शब्द वापरले जातील, काही नवीन घडतील आणि काहींसाठी इंग्रजी तद्भवही येतील. यामुळे एकूणच परिभाषानिर्मितीच्या प्रक्रियेला पुन्हा उत्स्फूर्त वेग येईल. आधी परिपूर्ण परिभाषा घडवू, नंतर मातृभाषेतून शिक्षण अशी उलटी प्रक्रिया घडू शकत नाही, हे आपण आजपर्यंतच्या अनुभवातून शिकलो आहोतच.

– वैशाली पेंडसे-कार्लेकर
vaishali.karlekar1@gmail.com

लोकसत्ता
Thu, 24 November 2022
https://epaper.loksatta.com/c/70950031



भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# गनीम आणि गँगस्टर

**'गनीम' हा** मूळ अरबी शब्द फार्सीच्या वाटेने मराठीत आला. त्याचा अर्थ लुटारू. 'समोरासमोर न येता फसवून युद्ध करणारे' असाही त्याचा अर्थ शब्दकोशात आहे. पण मराठीत दुष्मन किंवा शत्रू या अर्थाने गनीम शब्द वापरला जातो. मोगल कागदपत्रांत मराठ्यांचा उल्लेख 'गनीम' म्हणून होई. पण डॉ. यू. म. पठाण यांच्या मते मराठे हे स्वत:साठीच कधी कधी 'गनीम' हा शब्द वापरू लागले! 'भाऊसाहेबांची बखर'मध्ये ''गनिमांस झाडाला बांधले तर ते झाड घेऊन निघून जातील'' अशा प्रकारची वाक्ये आढळतात. पुढे 'गनिमी कावा' हा एक वेगळाच अर्थ असलेला शब्दप्रयोग मराठीत होऊ लागला. उर्दू किंवा फार्सीत तो शब्दप्रयोग नाही. मूठभर मावळे बलाढ्य मोगल सेनेवर अचानक, शत्रूला पूर्ण गाफील ठेवून हल्ला करत व शत्रूपक्षाची बरीच हानी करत. मोगलांना अशा हल्ल्यांची खूप भीती वाटत असे. मराठ्यांचे संख्याबळ कमी असल्याने हा एक लष्करी डावपेचाचाच भाग होता. आधुनिक युद्धशास्त्रातही 'गनिमी कावा' हा युद्धनीतीचा एक प्रकार म्हणून अभ्यासला जातो. व्हिएतनामी सैनिकांनी बलाढ्य अमेरिकन फौजांशी लढताना याच गनिमी काव्याचा यशस्वी वापर केला होता आणि हल्लीही पॅलेस्टिनी स्वातंत्र्ययोद्धे इस्रायली फौजांविरुद्ध या रणनीतीचा प्रभावी वापर करतात.



'गँगस्टर' म्हणजे गँगचा सदस्य आणि 'गँग' म्हणजे 'गुंडांची टोळी' हे सर्वश्रुत आहे. पण 'गँग' शब्द मुळात गुंडांशी संबंधित नव्हता. एकोणिसाव्या शतकात एखाद्या खाणीत विशिष्ट भागात काम करणाऱ्या कामगारांच्या समूहाला 'गँग' म्हटले जाई. रेल्वेमध्ये आजही अशा कामगारांच्या समूहाला 'गँग' असेच म्हटले जाते. विशेषत: रेल्वे रुळांची देखभाल करण्याचे अत्यंत महत्त्वाचे काम अशा वेगवेगळ्या गँग्स करत असतात. गँग शब्द गुंडांशी प्रथम जोडला गेला तो १९०६ साली ए. एच. लेविस याने लिहिलेल्या 'कन्फेशन्स ऑफ द डिटेक्टिव्ह' या पुस्तकात. आपल्याकडेही प्रत्येक वेळी गँग शब्द वाईट अर्थानेच वापरला जातो असे नाही. उदाहरणार्थ, ''आमची आठ-दहा जणांची गँग चौपाटीवर खूप भटकायची.'' मात्र बहुतेकदा गँग म्हणजे गुंडांची टोळी असेच समजले जाते. जसे की, दाऊद गँग किंवा करीम लाला गँग.

– भानू काळे
bhanukale@gmail.com





# क्रियापदासाठी वाक्यातील शेवटचा कर्ता महत्त्वाचा !

**वाक्यात सर्वांत** आवश्यक असते ते क्रियापद. वाक्यातील क्रियापद हा वाक्यरचनेचा अत्यंत महत्त्वाचा घटक आहे. क्रियापद म्हणजे क्रिया दर्शविणारा आणि वाक्य पूर्ण करणारा शब्द. केव्हा केव्हा बोलताना व लिहितानाही आपण क्रियापद वगळतो. पण ते त्या वाक्यात अध्याहृत असते. उदा. 'तुझं नाव काय?' उत्तर येते 'सुहासिनी.' 'आणि आडनाव?' उत्तर- 'गोखले.' या चारही वाक्यांत क्रियापदाची योजना केलेली नाही; पण क्रियापद वगळले असले, तरी ते त्या वाक्यात असतेच. फक्त आपण ते उच्चारत नाही. ही वाक्ये अशी आहेत- 'तुझं नाव काय आहे?' 'माझं नाव सुहासिनी आहे.' 'आणि तुझं आडनाव काय आहे?' 'माझं आडनाव गोखले आहे.' अशा वाक्यांत क्रियापद जरी उच्चारले किंवा लिहिले नाही, तरी ते असतेच. क्रियापदाशिवाय वाक्य पूर्ण होणार नाही. एखाद्या वाक्यात फक्त क्रियापदच असते. उदा. 'उजाडलं', 'किती अंधारून आलं?'

नियम असा आहे- कर्तरी प्रयोगात एकापेक्षा अधिक कर्ते असल्यास क्रियापद अनेकवचनी राहते. सर्व कर्ते पुल्लिंगी असतील, तर क्रियापद पुल्लिंगी अनेकवचनी होते, स्त्रीलिंगी असतील, तर क्रियापद स्त्रीलिंगी अनेकवचनी होते. पण कर्ते भिन्न लिंगी असले, तर क्रियापद शेवटच्या कर्त्याप्रमाणे पुल्लिंगी किंवा स्त्रीलिंगी अनेकवचनी होते; किंवा शेवटचा कर्ता एकवचनी असेल तर क्रियापद एकवचनी राहते.

उदाहरणार्थ, 'दोन घोडे व दोन बैल रानात चरत होते.' 'एक बैल आणि दोन गायी रानात चरत होत्या.' 'त्याने पपई, आंबे व डाळिंब खाल्ले.'- कर्मणी. कर्मणी प्रयोगात 'त्याने एक घोडा व दोन बैल विकत घेतले.' किंवा 'त्याने दोन गायी व दोन बैल विकत घेतले.' 'त्याने दोन बैल व दोन गायी विकत घेतल्या.' वाक्यरचना करताना कर्तरी व कर्मणी प्रयोगातील कर्त्यावर व कर्मावर लक्ष ठेवून वाक्यरचना करावी. जसे- रस्त्यात दोन मित्र आणि तीन मैत्रिणी उभ्या होत्या. चुकीची रचना- 'माझ्या मुलाचे जेवण झाले असे वाटून त्याचे ताट उचलायला गेले, तर ताटात भाजी, आमटी, भात, दोन लाडू तशीच राहिली होती.' हे वाक्य असे हवे. '...ताटात, भाजी, आमटी, भात, दोन लाडू तसेच राहिले होते.'

मात्र कवीला कवितेतील वृत्ताप्रमाणे बदल करण्याचे स्वातंत्र्य असते. जसे- 'तुतारी' या कवितेत केशवसुतांनी 'भेदुन टाकिन सगळी गगनें.' असे 'गगन' या शब्दाचे अस्तित्वात नसलेले अनेकवचनी रूप योजले आहे! तसेच भेदून, टाकीन या शब्दांतील मधले अक्षर दीर्घ असले, तरी ऱ्हस्व अक्षर दीर्घ करण्याचे, दीर्घ अक्षर ऱ्हस्व करण्याचे स्वातंत्र्य कवीला असते.

– यास्मिन शेख





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचारांतील रंगतरंग

**रंग हे** आपल्या जीवनाचा अविभाज्य भाग असतात. वाक्प्रचारांमध्ये त्यांचे ठसे कसे उमटले आहेत, ते पाहू. वेगवेगळ्या क्रियापदांबरोबर वावरताना रंग शब्दच कसा रंग बदलतो, तेही पाहण्याजोगे आहे! रंग भरणे म्हणजे विशेष मजा येणे. आपण रांगोळीत रंग भरतो, तेव्हा रांगोळी उठून दिसते! तसेच येथे अभिप्रेत आहे. उदा. वादकांची उत्तम साथ मिळाल्यावर मैफिलीत रंग भरतो. रंग चढणे म्हणजे धुंदी येणे. रंग उडवणे म्हणजे चैन करणे आणि रंगात येणे म्हणजे तल्लीन होणे.

रंगरूपास येणे म्हणजे फलद्रूप होणे, सुरू झालेले काम पूर्णत्वास जाणे. उदा. माझ्या घराचा नकाशा तयार असला, तरी घर रंगरूपास यायला सहज एखादे वर्ष लागेल!

विविध रंगांच्या छटाही वाक्प्रचारांमध्ये आढळतात. उदा. काळ्या दगडावरची रेघ म्हणजे कधीही पुसले जाणार नाही असे लिखाण. याचा सूचितार्थ आहे दृढनिश्चय किंवा अक्षय गोष्ट. असाच आणखी एक वाक्प्रचार आहे- पांढऱ्यावर काळेकरणे. कागद पांढरा असतो, त्यावर पेन्सिलीने/ काळ्या शाईने खरडणे, हा त्याचा वाच्यार्थ आणि साक्षर होणे, हा त्याचा लक्ष्यार्थ. नवकवी बा. सी. मर्ढेकर लिहितात : 'काळ्यावरती जरा पांढरे/ ह्या पाप्याच्या हातुन व्हावे/ फक्त तेधवा : आणि एरव्ही/ हेच पांढऱ्यावरती काळे'



काळ्याचे पांढरे होणे म्हणजे केस पांढरे होणे, वृद्धावस्था येणे. यातील सूचितार्थ आहे- अनुभवांमुळे परिपक्वता येणे. उदा. आजोबा म्हणतात, 'माझं ऐका जरा पोरांनो! उगाच काळ्याचे पांढरे झालेले नाहीत.'

काही रंग आपल्या स्वभावामुळे कसे अर्थपूर्ण ठरतात, ते पाहण्याजोगे आहे. उदा. तांबडा रंग हा दुरून लक्ष वेधून घेणारा असतो. त्यामुळे वाहतूक नियंत्रण करताना लाल बावटा/ लाल दिवा धोक्याची सूचना देतो, वाहतूक थांबवतो. म्हणून 'कामात अडथळा आणणे' असा अर्थ त्याला प्राप्त झाला आहे. उलट 'हिरवा बावटा मिळणे' या वाक्प्रचाराला 'कामाला अनुमती मिळणे' असा अर्थ प्राप्त झाला आहे. एकंदरीत या वाक्प्रचारांनी आपल्या भाषेत नक्कीच रंग भरले आहेत!

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





# उर्दू-मराठी तहजीब

**कालौघात प्रत्येक** भाषेत अन्य भाषांच्या संपर्कामुळे विविध शब्द सामावले जातात. त्यामुळे मूळ भाषेतील लोकांच्या अभिव्यक्तीचा स्तर उंचावतो. मराठीत एका विशिष्ट काळात फारसी- अरबी आणि नंतर इंग्रजी या भाषांतून विविध शब्द सक्तीने आल्यासारखे आले. त्याला विरोध म्हणून काही शब्द शोधले गेले, जातात. प्राप्त परिस्थितीत माणसाची अभिव्यक्ती खुरटी राहू नये म्हणून विविध पर्यायांची उपलब्धता असायला हवी.

भारतीय मनावर हिंदी चित्रपटांचा पगडा बऱ्याच अंशी आहे आणि त्यातील उर्दू मिश्रित गाणी सर्वांना विशेष भावतात. अनेक शब्द आपल्याला माहीत नसतात. ते आपण भाषक जाणकाराला विचारू लागतो जसे 'इस अंजुमन मे आपको आना है बार-बार' हे गाणे ऐकल्यावर आपण 'अंजुमन'चा काय अर्थ असेल याची कल्पना करत राहतो. मूळ उर्दूतही आपल्याला अनोळखी 'अंजुमन'चा अर्थ संस्था, सभा, समिती कधीतरी अनमानधपक्याने समजतो, तसे मराठीतल्या उर्दू प्रचलित शब्दांचे होऊ नये, म्हणून काही उदाहरणे बघू. अरबी-फारसी असलेल्या आणि पर्यायाने उर्दू झालेल्या काही शब्दांना मराठी प्रतिशब्द असे सांगता येतील.

अंदाजला अटकळ/ अनुमान म्हणू शकू. 'गरजवंताला अक्कल नसते' त्यातली मूळ अकल म्हणजे बुद्धी. काही तरी 'अगर-मगर' करू नकोस म्हणजे टाळाटाळ/ टालमटोल करू नकोस. 'अजब तुझे सरकार' यातले अजब म्हणजे विलक्षण/ अद्भुत/ अनोखे/ विचित्र राज्य!

अजीबच आहे ही गुहा! यात अजीब-विलक्षण/ अद्भुत/ विचित्र/ चमत्कारिक होऊ शकतो. 'अफलातून' हा शब्द आपण अनेकदा वापरतो, त्याचा अर्थ आताच्या काळात 'फारच भारी' असा साधारपणे घेतला जातो, पण कोशगत अर्थ मात्र 'स्वतःला फार शहाणा समजणारा' किंवा 'घमेंडखोर' असा आहे. हाच शब्द सुप्रसिद्ध ग्रीक तत्त्वज्ञ प्लेटो याच्यासाठी वापरला गेला होता, असेही एका कोशात वाचले. नसत्या 'अफवा' पिकवू नका- इथे 'कंडी'/ 'आवई' वापरता येईल. तो 'अय्याश' आहे म्हणजे- 'विलासी' आहे, 'अलबेला' आहे म्हणजे 'छानछोकीचा', 'मनमौजी' आहे. ही चीज 'असली' आहे म्हणजे- ही वस्तू 'खरी' किंवा 'मूळची' आहे. एखादी गोष्ट घडायला हवी म्हणून 'आमीन' म्हणण्याऐवजी 'तथास्तु' म्हणू शकतो. आणखी काही शब्द पुढच्या भागात.

– निधी पटवर्धन
nidheepatwardhan@gmail.com





# मुसलमानी अमलातून पडलेला फार्सीचा प्रभाव

**अल्लाउद्दीन खिलजीने** १२९४ मध्ये देवगिरीचा पाडाव केला आणि तेव्हापासूनची जवळपास ५०० वर्षे बहुतेक मराठी मुलुखावर मुसलमानी अंमल टिकला. मुस्लीम राज्यकर्ते तुर्की, अफगाण, इराणी, पठाण, अरब, मुघल इत्यादी विभिन्न वंशांचे असले तरी सर्वांची राज्यकारभाराची भाषा मात्र फार्सीच राहिली. कारण प्राचीन काळात इराणचे (पर्शियाचे) साम्राज्य त्या परिसरात सर्वाधिक सामर्थ्यवान होते व फार्सी ही त्यांची भाषा होती. इतक्या प्रदीर्घ संपर्कानंतर मराठीवर फार्सीचा खूप प्रभाव पडणे स्वाभाविक होते. मराठी शब्दांच्या व्युत्पत्तीचा विचार करताना फार्सीकडे दुर्लक्ष करणे अशक्य आहे. मराठीत फार्सी शब्द किती मोठ्या प्रमाणावर होते, याचे उत्तम उदाहरण म्हणजे माधव जूलियन यांची कविता. तिचे विडंबन करताना अनंत काणेकर यांनी आपल्या 'शिवाजीचे बेगमेस उत्तर' या कवितेत लिहिले होते- 'जरि या मराठमोळ्या शिवबास बोध व्हावा, तरि फारशी-मराठी मज कोश पाठवावा'!

जबरदस्त, हरामखोर, सरदार, दिलगीर, तनखा, खुशामत, बेलगाम, आवाज, इशारा, एल्गार, खंजीर, गर्दी, इमारत, इनाम, तारीख, परवाना, तहसील, तपास, अर्ज, मोबदला, मिळकत, बिदागी, गुलाम, आजार, इलाज, पैदास, तमाशा, ख्याल असे असंख्य फार्सी शब्द मराठीने स्वीकारले. अनेक आडनावेदेखील फार्सीतून आली. उदाहरणार्थ, कारखानीस, किल्लेदार, चिटणीस, खासगीवाले, जकाते, जमादार, पागनीस, दिवाण, पोतदार, फडणीस, डबीर, मिराशी, मिरासदार, शिलेदार, सबनीस, हवालदार, सराफ. माधवराव पटवर्धन यांचा 'फार्शी-मराठी कोश' किंवा यू. म. पठाण यांचा 'फार्सी- मराठी अनुबंध' हा ग्रंथ याची साक्ष पटवायला पुरेसा आहे.

भाषाशुद्धी चळवळीचा परामर्श घेताना श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनी पुणे येथील १९२७ सालच्या साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून बोलताना ''जे शब्द मराठीशी एकरूप झाले आहेत, ते केवळ अन्य भाषांमधून आले म्हणून बहिष्कृत करण अव्यवहार्य आहे,'' असे म्हटले होते. न. चिं केळकर यांनीही सह्याद्री मासिकात लिहितान ''तत्त्वात जिंकाल, पण तपशिलात हराल'' अश शब्दांत चळवळीची मर्यादा नोंदवली होती. ''शब्द कुठूनही येऊ द्या, मराठीचा एकूण शब्दसंग्रह वाढण महत्त्वाचे आहे'' हे हरी नारायण आपटे यांचे मत आजही स्वीकारार्ह वाटते.

– भानू काळे
bhanukale@gmail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# ‘या’ अनेकवचनांमुळे गोंधळू नका...

**ही वाक्ये** वाचा- ‘आई आणि बाबा यांच्यात वाद झाले, की आई थोड्या वेळाने शांत होई. घरात जाऊन काहीतरी वाचत बसे. बाबा मात्र बाहेरच्या गॅलरीत अस्वस्थपणे येरझाऱ्या घालत.’

या वाक्यांतील शेवटच्या वाक्यात एक शब्द चुकीचा योजला आहे. तो शब्द आहे- येरझाऱ्या. आता या येरझाऱ्या या शब्दाचे मूळ रूप पाहू या. येरझाऱ्या- (नाम, स्त्रीलिंगी, अनेकवचन). या शब्दाचे एकवचनी रूप होईल- येरझारा- (नाम, स्त्रीलिंगी, एकवचन) म्हणजे येरझारा (एकवचन)-येरझाऱ्या अनेकवचन! हा शब्दच चुकीचा आहे. योग्य शब्द आहे- **येरझार** (नाम, स्त्रीलिंगी, ए.व.)- येरझारा (नाम, स्त्रीलिंगी, अ.व.)- येरझाऱ्या हा शब्दच चुकीचा आहे. मात्र हे चुकीचे रूप अनेकदा ऐकायला आणि वाचायलाही मिळते. येरझार हा अकारान्त शब्द आहे. मराठीतील काही अकारान्त स्त्रीलिंगी नामे पुढे देत आहे. त्या शब्दांचे एकवचन-अनेकवचन अशी रूपे आपण पाहू या- (हे मराठी शब्द आहेत, तत्सम शब्द नव्हेत.)

ा ा

*नामे- अकारान्त, स्त्रीलिंगी- एकवचन आणि अनेकवचन :*

चूक-चुका, झुळूक- झुळुका, जाणीव-जाणिवा, जीभ-जिभा, टीप-टिपा, तारीख, तारखा, नजर-नजरा, वाट-वाटा, नेमणूक-नेमणुका इ.- तसेच येरझार-येरझारा (ऱ्या-चूक)

*नामे- इकारान्त स्त्रीलिंगी- एकवचन आणि अनेकवचन :* बातमी-बातम्या, तबकडी-तबकड्या, नवरी- नवऱ्या, पालखी- पालख्या, परडी-परड्या, मेहुणी-मेहुण्या, पाटली-पाटल्या, फणी-फण्या, फुशारकी-फुशारक्या, बरणी-बरण्या, वाटी-वाट्या, पातळी-पातळ्या, पोळी-पोळ्या, पुरी-पुऱ्या इ. (येरझार हा शब्द आहे-येरझारी असा एकवचनी शब्द नाही,त्यामुळे येरझाऱ्या हे अनेकवचन संपूर्णपणे चुकीचे आहे.) मराठी भाषकांनी अशी चूक करू नये, असे माझे आग्रहाचे सांगणे आहे.

ी या

*तत्सम इकारान्त* एकवचनी नामांची रूपे पुढे दिल्याप्रमाणे (मराठीतील प्रचलित रूपांपेक्षा वेगळी) होतात, हेही लक्षात घ्यावे. उदा. मूर्ती (एकवचन) मूर्ती (अनेकवचन), अभिनेत्री-अभिनेत्री, अतिवृष्टी-अतिवृष्टी, अनुभूती-अनुभूती, स्मृती-स्मृती, व्याधी-व्याधी, व्यक्ती-व्यक्ती इ.

ि ि

**– यास्मिन शेख**





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# सारव भिंती तर म्हणते घराला कोपरे किती?

**माझी एक** आजी होती. मनाने स्वस्थ, आरोग्य मस्त. घरात सुनांचा सहभाग. घर नांदते होते. कसली काळजी नाही. घरात कामही जास्त नाही. आपले सारे आवरले की आजी एकदम मोकळी. मग हातात जपाची माळ घेऊन बसायची खिडकीत. खिडकी रस्त्याला लागूनच. रस्ता वाहता असायचा. बरेच दिवस आजीचा तिथेच संसार झाल्यामुळे त्या गल्लीतले घर अन् घर आणि माणूस अन् माणूस माहितीचे. आजीचे खिडकीत बसणे म्हणजे टोल नाकाच जणू. चार- दोन वाक्यांचा टोल दिल्याशिवाय आजीच्या तावडीतून कोणी सुटत नसे. सारे तिला 'खिडकीतली आज्जी' म्हणत.

येईल जाईल त्याच्याशी मनमुराद गप्पा. त्या बरोबरच प्रश्नांची सरबत्ती. एखादा माणूस समोर आला की आज्जी त्याला विचारी, 'काय ठकूताई! खूप दिवस दिसला नाहीत? कुठे गेला होतात? बरं आहे ना? घरची सगळी ठीक ना? शेजारचे अरुणभाऊ ठीक आहेत ना? त्यांना बरं नव्हतं म्हणे मध्यंतरी? नाही त्यांचंही तसं वयच झालंय म्हणा! काही त्रास न होता सुटका झालेली बरी असते हो! पण मरण का कोणाच्या हातात असतं? असो. असू देत. सांगा त्यांना त्यांच्या तब्येतीची विचारपूस करीत होते.' ठकूबाई आजीच्या तावडीतून कधी सुटका होते, त्याची वाटच पाहत



होत्या. जरा या चौकशीला कुठेतरी खबदाड पडले आहे, हे पाहून त्या सटकल्या आणि त्यांनी सुटकेचा निःश्वास सोडला.

काही व्यक्ती अशा असतात. या खिडकीतल्या आजीसारख्या. ना घेणे ना देणे, नुसते घालायचे उखाणे! खणत खणत त्या व्यक्तीची माहिती गोळा करायची आणि मग आपल्या खासगी वाहिनीवरून ती प्रसारित करीत बसायचं! जपाचा पडे विसर आणि सांगावे लागे 'अगं आजी, तुझे प्रश्न आता आवर!' या लोकांच्या स्वभावासाठी ही म्हण... 'सारव भिंती तर म्हणते घराला कोपरे किती?'

**– डॉ. माधवी वैद्य**
madhavivaidya@ymail.com

भाषासूत्र | कांचन कराई द्वारा संकलित

# लोकमानसातील समजुती आणि वाक्प्रचार

**आदिम काळापासून** लोकमानसात सभोवतालाविषयी- त्यातील गूढतेमुळे- काही दृढमूल समजुती होत्या. राक्षस, देव, पिशाच्च यांच्याविषयी काही धारणा होत्या. विविध भाषांमध्ये या संकल्पनांसाठी शब्द आहेत. साहजिकच यांच्याशी संबंधित वाक्प्रचार मराठीतही रूढ आहेत.

बारा पिंपळावरचा मुंजा, हा वाक्प्रचार अशाच प्रकारचा आहे. पूर्वी पिंपळाची मुंज करीत असत. पिंपळावर मुंजा राहतो, अशी समजूत असे. बारा पिंपळांवर एकच मुंजा असेल, तर तो नेहमी एकाच झाडावर बसणार नाही. तो या झाडावरून त्या झाडावर फिरत राहील! यावरून या वाक्प्रचाराचा सूचितार्थ आहे : अपरात्री हिंडणारा, एका ठिकाणी न राहणारा.

देव पावणे, या वाक्प्रचाराचा वाच्यार्थ आहे, देव प्रसन्न होऊन आपली इच्छा पूर्ण होणे. हा वाक्प्रचार आपण 'मनाजोगी गोष्ट घडणे' या अर्थाने वापरतो. तसेच देव्हारे माजवणे, हा वाक्प्रचारही रूढ आहे. देव्हारा म्हणजे देव ठेवण्याची जागा. देवामुळे देव्हारा महत्त्वाचा ठरत असतो. त्यामुळे या वाक्प्रचाराचा अर्थ होतो, प्रस्थ माजवणे, स्तोम माजवणे.

देवाप्रमाणे दानव ही संकल्पनाही आढळते. याचे एक उदाहरण पाहू. राहू-केतू मागे लागणे, हा वाक्प्रचार रूढ आहे. फलज्योतिष राहूला आठवा ग्रह मानत असले तरी तो इतर ग्रहांप्रमाणे प्रत्यक्ष दिसणारा ग्रह नाही.

एका पुराणकथेनुसार राहू हा दानव होता व त्याच्या एका अपराधामुळे त्याचे शिर विष्णूने धडावेगळे केले होते. त्याचे डोके म्हणजे राहू व धड म्हणजे केतू. त्यांच्यामुळे सूर्यचंद्र यांना ग्रहण लागते, अशी समजूत होती. त्यामुळे राहू-केतू मागे लागणे म्हणजे एखाद्याला सतावणे, एखाद्याच्या खनपटीस बसणे. विज्ञानाच्या आधारे ग्रहणामागची शास्त्रीय कारणे स्पष्ट झाली, तरीही हा वाक्प्रचार लक्ष्यार्थामुळे टिकून राहिलेला दिसतो.

भूत म्हणता भूत लागणे, या वाक्प्रचाराचा अर्थ आहे, एखाद्या गोष्टीचा सारखा ध्यास लागला, की ती गोष्ट मुळात नसली, तरी तिचा भास होऊ लागतो. कालांतराने यामागच्या समजुती समाजप्रबोधन होऊन कालबाह्य ठरल्या; तरीही असे वाक्प्रचार लक्ष्यार्थामुळे टिकून राहिलेले दिसतात.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





# मराठीतल्या बदलांच्या सहाव्या कालखंडात...

**भाषापरिवर्तन ही** प्रत्येक भाषेच्या दृष्टीने एक अपरिहार्य प्रक्रिया आहे. सन १२०० पासून मराठीचा ग्रंथित काळ विचारात घेतला तर या बदलांच्या टप्प्यांचे पाच कालखंड सांगतात- यादवकालीन, बहामनीकालीन, शिवकालीन, पेशवेकालीन आणि आंग्लकालीन.

'माझा मऱ्हाटाची बोलू कवतिके, परि अमृतातें हीं पैजेसीं जींके' ही १२९० मधली ज्ञानेश्वरीतली मराठीचा महिमा सांगणारी ओवी यादवकाळातली. यादवकालीन किंवा ज्ञानेश्वरकालीन मराठीत आढळणारी डोलेया, देयावा, लोकाचेया, तेया, तेयातें अशी रूपं पुढे एकनाथांच्या काळात डोळ्या, द्यावा, लोकांचिया, तया, तयाते अशी वापरली जाऊ लागली. याच काळात फारसीचा भाषा, व्याकरणाबरोबर मराठीतल्या उच्चारांवरही प्रभाव पडला. पुढेही फारसी, कधी संस्कृत आणि कधी इंग्रजी यांच्या प्रभावाने मराठीत नवीन शब्द येत राहिले. वर्ण, लिपी, विभक्तिप्रत्यय, विरामचिन्हं, सामान्यरूपं, वाक्यरचनेची पद्धत अशा व्याकरणिक घटकांमध्येही थोडेथोडे बदल होत गेले. बदलांच्या या चक्राचा सध्या सहावा कालखंड सुरू आहे, असं म्हणता येईल. एकूणच भाषेमध्ये बदल होणं हेच तिच्या जिवंतपणाचं आणि प्रगतीचं लक्षण आहे. त्यामुळेच मराठीसारख्या जिवंत भाषेत बदल घडत राहणार आहेतच. कदाचित आज 'चुकीच्या' मानल्या जाणाऱ्या वाक्यरचना किंवा शब्द काही काळाने 'बरोबर' मानले जातील. लिपीतले 'श' आणि 'ल' सारखे वाद विरून जातील. पण आज आणि भविष्यातही या सर्वांहून जास्त महत्त्वाचा प्रश्न हाच असेल की मराठी एक भाषा म्हणून सशक्त आणि प्रगल्भ असेल का? ती मराठी भाषकांच्या सर्व गरजा पूर्ण करणारं साधन ठरेल का?

ज्येष्ठ भाषावैज्ञानिक अशोक केळकर यांच्या मते, ''इंग्रजी भाषा मराठी भाषेपेक्षा प्रगल्भ आहे, याचा खरा अर्थ इंग्रजीभाषक मराठी भाषकांपेक्षा प्रगल्भ झालेले आहेत. जर आपण स्वतःच्य हिमतीवर मराठीतून प्रगल्भ विचार करायच विसरून गेलो, तर मराठी भाषेला सुतराम भविष् नाही.''

अशा वेळी भाषेच्या दृष्टीने क्षुल्लक प्रश्नांसाठी बुद्धी खर्चण्यापेक्षा नवीन पिढीला मराठीपासून दू जाण्यापासून थांबवणं आणि एक प्रगल्भ मराठ समाज घडवण्यासाठी हातभार लावणं हेच कोणत्याही मराठीप्रेमीचं कर्तव्य असेल ना?

**– वैशाली पेंडसे-कार्लेक**

vaishali.karlekar1@gmail.com





 कांचन कराई द्वारा संकलित

# पोर्तुगाल ते गोवा ते मराठी

**पोर्तुगीज १५१०** साली गोव्यात आले आणि १९६१ साली त्यांनी भारत सोडला. मुंबई-वसई भागावरही त्यांनी दीडशे वर्षे राज्य केले. या साडेचारशे वर्षांत त्यांचे बरेच संस्कार आपल्यावर होणे अपरिहार्यच होते. 'बॉम्बे' किंवा 'बम्बई' शब्दाची व्युत्पत्तीच बॉं बइआ (Buon Bahia) म्हणजे उत्तम बंदर या पोर्तुगीज शब्दावरून झालेली आहे.

पोर्तुगीज भाषेतून आलेले अनेक शब्द मराठीत पूर्णतः मिसळून गेले आहेत. उदाहरणार्थ, 'पाव'. ब्रेडसारखा इंग्लिश शब्द टाळून त्याला 'पाव' म्हणण्यात आपले मराठीप्रेम सिद्ध होत नाही, कारण 'पाव' शब्दही पोर्तुगीज आहे! अनेक नवीन वस्तू पोर्तुगीजांनी आणल्या आणि त्यांच्याबरोबरच वस्तुवाचक पोर्तुगीज शब्दही मराठीने स्वीकारले. बटाटा, कोबी ही भाज्यांची नावे किंवा अननस, हापूस, पायरी, पपई ही फळांची नावे मूळ त्यांचीच.

साबण, बशी, घमेले, व्हरांडा, अलमारी, चावी, बादली, पिंप, बिजागरी, इस्त्री, परात हे वस्तुदर्शक मराठी शब्दही मूळचे पोर्तुगीज आहेत. पाद्री, लिलाव, नाताळ हेही त्यांचेच शब्द. 'पगार' हा सर्वांचा आवडीचा शब्द! तोही 'पागा' म्हणजे वेतन या पोर्तुगीज शब्दातून आला आहे. 'केलेल्या कामाचा नियमित तारखेला मोबदला देणे,' ही संकल्पना 'पगार' या शब्दातून व्यक्त होते आणि 'किंमत', 'बक्षीस' किंवा 'इनाम' या रूढ शब्दांपेक्षा ती अगदी वेगळी आहे. जे लोक भाड्याच्या घरात राहतात, त्यांना आपली जागा सोडताना मूळ मालकाकडून बरीच मोठी रक्कम 'पागडी' म्हणून मिळते. या पागडी शब्दाची व्युत्पत्ती देखील 'पागा' शब्दाच्या 'मोबदला' याच अर्थच्छटेतून झाली असावी. कृ. पां. कुलकर्णी यांच्या 'मराठी व्युत्पत्ति कोशा'नुसार 'अय्या' शब्द तीन अर्थांनी वापरला जातो आणि त्यातील प्रत्येकाची व्युत्पत्ती वेगवेगळी आहे. मुलींच्या तोंडी (तो कोश बनला त्या काळात) येणारा उद्गारवाचक शब्द या अर्थाने तो 'अय्यये' या कानडी शब्दापासून बनलेला आहे. 'अय्या'चा दुसरा अर्थ आहे तमिळ भाषेत ब्राह्मण पुरुषाला उद्देशून वापरले जाणारे संबोधन. त्या अर्थाने तो शब्द 'आर्य' या संस्कृत शब्दाचे तद्भव रूप आहे. पण याहून अगदी वेगळा अर्थही 'अय्या' शब्दाला आहे व तो म्हणजे मुले सांभाळणारी बाई किंवा आया. आणि त्या अर्थाने तो शब्द 'aia' (उच्चार आया) या पोर्तुगीज शब्दापासून आलेला आहे!

– भानू काळे
bhanukale@gmail.com





# ‘मनःस्ताप’ नव्हे ‘मनस्ताप’

**ही वाक्ये** वाचा- ‘माझ्या मैत्रिणीला दम देणाऱ्या तिच्या नवऱ्याचा आवाज मला पुनःपुन्हा आठवत होता. तिच्या सासूबाई काही अपमानास्पद बोलून तिच्या मनःस्तापात भर तर घालणार नाहीत ना, अशी भीती मला वाटली.’

या वाक्यांतील दुसऱ्या वाक्यात योजलेला ‘मनःस्ताप’ हा शब्द सदोष आहे. योग्य शब्द आहे- मनस्ताप. नः असे विसर्गयुक्त अक्षर नसून (मनस्+ताप) मनस्- स् हे अक्षर आहे. संस्कृत मनस् हा तत्सम शब्द आहे. मनस्ताप- (नाम, पुल्लिंगी, ए.व.) अर्थ- मनाला होणारा त्रास किंवा मनाला होणारे दुःख. वरील वाक्यातील मनःस्ताप हा चुकीचा शब्द आहे. ते वाक्य असे हवे- ‘...तिच्या मनस्तापात भर तर घालणार नाहीत ना...’

मराठीने संस्कृतातून स्वीकारलेले अनेक तत्सम शब्द (ज्या शब्दांत पूर्वपदी मनस् असून त्यातील स् चा विसर्ग (ः) झाला आहे.) पाहू या. मनःपूर्वक, मनःशांती, मनःस्थिती, मनःकामना, मनःपूत इ.

काही शब्दांत ‘मनस्’ या शब्दाचे ‘मनो’ असे ओकारान्त रूप झाले आहे. पुढील शब्द पाहा- मनोरमा (म), मनोरथ, मनोभाव, मनोरंजक, मनोरंजन, मनोभंग, मनोगत, मनोधर्म, मनोनिग्रह, मनोदय, मनोव्यापार, मनोवृत्ती, मनोविकृती, मनोवेधक, मनोदेवता इ.

आणखी एक महत्त्वाची बाब लक्षात घ्यायला हवी, ती म्हणजे मराठीने संस्कृत शब्द मनस्चे ‘मन’ हे रूप स्वीकारले आहे आणि ‘मन’ पूर्वपदी असलेले काही सामासिक शब्दही मराठीत रूढ झाले आहेत. जसे- मनमुराद, मनमिळाऊ, मनकवडा, मनमोहक, मनधरणी इ. आणखी एक चुकीची वाक्यरचना पाहा-

‘मी एखादी चूक केली, तर बाबा मला रागवत नाहीत, उलट ते माझ्यावर हसतात.’ वाक्यात ‘ते माझ्यावर हसतात’ अशी वाक्यरचना मराठीत नाही. हिंदीच्या प्रभावामुळे ही वाक्यरचना अनेक मराठी भाषकांच्या तोंडी किंवा लेखनातही आढळते. एखादी व्यक्ती तुम्ही केलेल्या चुकीमुळे तुच्छते हसत असली, तर ते हसणे सुखदायक किंव समाधानकारक नसते. त्या हसण्याला आपण आपुलकीने हसून समाधान व्यक्त करू शकत नाही. उलट, ते हसणे वेदनादायक वाटते. मराठीत मात्र ‘माझ्यावर हसतात’ असे आपण म्हणणे चुकीचे आहे. मराठीतील योग्य वाक्यरचना अशी आहे- ‘मी एखादी चूक केली, तर बाबा मला रागवत नाहीत, **मला हसतात.**’ या वाक्यात हास्य हे उपहासदर्शक आहे, हे लक्षात घ्यावे.

– यास्मिन शेख

लोकसत्ता Mon, 12 December 2022
https://epaper.loksatta.com/c/71115394



# रिकाम्या देवळावर कावळ्यांची वस्ती

**धर्माशेठांची गडगंज** इस्टेट. म्हणजे आपली किती संपत्ती आहे, याची मोजदाद त्यांना तरी असेल की नाही कोणास ठाऊक. त्यांचे राहणेही परदेशातच. मूळ गावी त्यांचा खूप मोठा वाडा. पण तिथे ना कोणी राहत असे, ना कोणी येत असे. म्हणजे गावात जसे जुने देऊळ असते ना, तशी त्या वाड्याची अवस्था! देऊळ सुस्थितीत असेल तरच तिथे पूजाअर्चा होते, चार लोक जमतात. पण देऊळ जर भक्कम नसेल तर तिथे फक्त कावळेच जमतात. तशातली त्यांच्या त्या प्रशस्त वाड्याची गत!

त्या वाड्याचा राखणदारही म्हातारा होत चालला होता. एक दिवस त्या राखणदाराने आपल्या धन्याची आठवण काढत काढतच प्राण सोडला. आता त्या वाड्याची अवस्था भग्न मंदिरासारखी झाली. वास्तूची देखरेख राहिली नाही की त्याची अवस्था भूतवाड्यासारखी होते. पण धर्माशेठला त्याविषयी ना खेद ना खंत, अशी स्थिती होती. मग काय गावातल्या काही टोळभैरवांनी परिस्थितीचा भरपूर फायदा घेतला. तिथे अनेक प्रकारचे नको ते व्यवसाय सुरू झाले. गावातल्या रिकामटेकड्या लोकांसाठी मजा करण्याचे ते एक हक्काचे ठिकाण होऊन बसले. गावातले जुनेजाणते लोक धर्माशेठच्या वाड्याची



ही अवस्था बघून खूप हळहळत होते. त्यांच्यापैकी काहींनी धर्माशेठना कळवण्याचा प्रयत्न केलाही. पण त्यांच्या प्रयत्नांना यश आले नाही.

काही दिवसांतच त्या लोकांनी त्या वाड्याचा पूर्ण कब्जा घेतला. पण नको त्या उद्योगांना आणि नको त्या माणसांना अटकाव करण्यात गावातली बुजुर्ग मंडळीही यशस्वी झाली नाहीत. सर्व लोक हवालदिल झाले होते. पूर्वी जो वाडा सुसंस्कृत लोकांच्या भेटण्याचा एक 'सांस्कृतिक कट्टा' गणला जात होता, तो आता टोळभैरवांच्या कुकर्माचा अड्डा म्हणून गणला जाऊ लागला होता. हे सर्व बघून, गावची एक बुजुर्ग व्यक्ती इतकेच म्हणाली, ''काय बोलायचे? बोलण्यासारखे आता काही उरलेच नाही. 'रिकाम्या देवळावर कावळ्यांची वस्ती' झाली आहे झालं.''

**– डॉ. माधवी वैद्य**
madhavivaidya@ymail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# भाषाव्यवहाराशी निगडित वाक्प्रचार...

**बोलणे आणि** लिहिणे या भाषाव्यवहाराचा संदर्भ असलेले अनेक वाक्प्रचार आढळतात. 'बोल लावणे' म्हणजे नावे ठेवणे, दोष देणे. 'बोलबाला होणे' म्हणजे प्रसिद्धी मिळणे. 'बोलाचालीवर येणे' म्हणजे भांडणे, वर्दळीवर येणे, असे नेहमी कानावर पडणारे वाक्प्रचार बोलबोलता आठवतात!

'शब्द झेलणे' म्हणजे आज्ञेप्रमाणे वागणे. 'शब्द टाकणे' म्हणजे विनंती करणे. 'तोंडाची टकळी चालणे' म्हणजे सारखी बडबड करणे. टकळी हे हाताने सूत कातण्याचे यंत्र असते. ते चालू केले की सतत सुताचा धागा निघत राहतो. त्यावरून हा वाक्प्रचार रूढ झाला आहे.

'शालजोडीतील मारणे/ देणे', या वाक्प्रचाराचा अर्थ आहे 'दोन शालींमध्ये गुंडाळून (जोड्याने) मारणे' म्हणजे वरवर सभ्य सुरात टोमणे मारणे; कारण शाल हे उंची मुलायम वस्त्र असते. त्यातून मारलेला फटका उघडपणे दिसणार नाही; मात्र त्यात लपलेला फटका आहेच! मंगेश वि. राजाध्यक्ष यांनी आपल्या एका पुस्तकाचे शीर्षक 'शालजोडी' (१९८३) असे ठेवले आहे. त्यात त्यांनी तत्कालीन वाङ्मय क्षेत्रातील संकेतांची खिल्ली उडविली आहे. त्यातील मिश्कीलपणे केलेली टीका शीर्षकाला शोभून दिसते.

'अक्षरशत्रू' असणे म्हणजे निरक्षर असणे. 'बत्तिशी वठणे' म्हणजे बोललेले खरे होणे. जाहीर कार्यक्रमात कानी पडणाऱ्या 'चार शब्द बोलणे', या वाक्प्रचारात 'चार' या शब्दाचा अर्थ काटेकोरपणे घ्यायचा नसतो. येथे 'चार' याचा अर्थ मर्यादित संख्या असा अभिप्रेत आहे. त्यामुळे चार शब्द बोलणे म्हणजे थोडक्यात बोलणे होय.

मुद्रणकला अस्तित्वात आल्यावर नव्याने रूढ झालेला वाक्प्रचार म्हणजे 'मुद्राराक्षसाचा विनोद' हा होय. यात छापील लेखनात, मुख्यतः मुद्रितशोधन करताना राहिलेल्या चुका अभिप्रेत असतात. पूर्वी 'अमृत' या मासिकामध्ये या शीर्षकाचे सदर असे. त्यात वाचक आपल्या वाचनात आलेल्या हास्यकारक चुकांच्या नोंदी पाठवत. ते सदर खूप लोकप्रिय होते. चिं. वि. जोशी यांच्या 'चिमणरावचे चऱ्हाट' मध्ये मुद्राराक्षस विनोद करणार, हे गृहीत धरून लेखकाने केलेले शब्दनिष्ठ विनोद आहेत. असे इतरही वाक्प्रचार आठवत राहतील.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.





# भारदस्त भाषा

**भाषेत भारदस्तपणा** आणण्यासाठी उर्दू शब्दांची पेरणी केली जाते. 'भारदस्त' हा असाच फारसीवरून आलेला उर्दू शब्द. मराठीत 'धीरगंभीर भाषा' म्हणू शकू काय? मागील भागात आपण उर्दू शब्दांसाठी प्रतिशब्द पाहिले. या शेवटच्या भागात आणखी काही प्रतिशब्द पाहूया. ही कोणाची औज़ारे आहेत इथं? - औज़ारेला उपकरणे/ अवजारे म्हणूयात. माझे खेळायचे कंचे कुणी पाहिले का? इथं कंचा- काचेची गोटी म्हणूयात. गनीम मोठा, तरी आम्ही जाहंबाज- म्हणजे शत्रू/ प्रतिस्पर्धी मोठा तरी आम्ही हुषार, धाडसी. गद्दारी नको- कृतघ्नता/ देशद्रोह नको. काहीतरी गफलत वाटतेय- काही असावधानी/ निष्काळजीपणा वाटतोय. जास्त पैसे सांगू नका राव, वाजवी दरात द्या- योग्य/ रास्त/ न्याय्य भावात द्या.

फारसी 'सवारी' वरून मराठीत 'स्वारी' शब्द आला आहे. घोड्यावर बसणाऱ्या मनुष्यासाठी बहुतेक वेळेला हा शब्द वापरला जातो. याच्या अर्थाचे सामान्यीकरण आणि विशेषीकरण बरेच झाले आहे. कुस्तीतील स्वारी, राजाची स्वारी, वेताळाची स्वारी वगैरे प्रयोग रूढ आहेत. हैराणला म्हणूया व्याकूळ वा त्रस्त. आता काही नेहमीच्या वापरातले शब्द व प्रतिशब्द पाहू. गरीब- निर्धन, गर्मी- उष्णता, गर्म- कढत/ तापलेला, गुलाम- दास, घटिया- सामान्य प्रतीचा/ हलका, चस्का- चटक, गोडी, छैला - रंगेल, तंग - आवळलेला/ घट्ट, तंगी- टंचाई, चणचण, तय्यार- सुसज्ज, ताकीद- बजावून सांगणे, दंग- थक्क, दर्द- दु:ख/ पीडा.

अस्तराला काय प्रतिशब्द होऊ शकतो? 'कपड्याला आतून लावलेले कापड' असेच म्हणू या! नाहीतर फारफार तर 'खालचा, आतला पदर' म्हणू शकतो. पण हट्टाने प्रतिशब्द निर्माण करायलाच हवेत असे नाही. आता वाचकांसाठी काही शब्द, तुम्हाला याचे प्रतिशब्द माहीत आहेत का? - दुकान, नीलम, पंजर, पलीता, फ़ालूदा, बला, मुमताज़, राही, रोब, लहजा. बघा, जमतंय का? जेव्हा मराठी प्रतिशब्द उपलब्धच नसेल तेव्हा अन्य भाषेतील शब्द जसाच्या तसा (म्हणजे तत्सम पद्धतीने) अथवा त्यात काही बदल करून (म्हणजे तद्भव रीतीने) आपल्या भाषेत स्वीकारला जाऊ शकतो, स्वीकारला जावा आणि भाषाशास्त्रीयदृष्ट्या बोलायचे झाले, तर असे शब्द भाषेत सहजपणे स्वीकारले जातातच, असे आजवरचा भाषिक इतिहास आपल्याला सांगतो.

- डॉ. निधी पटवर्धन
nidheepatwardhan@gmail.com





# ल.सा.वि. आणि म.सा.वि.

**पुढील वाक्य** माझ्या वाचनात आले, ते असे - 'भारत-पाकिस्तान- सीमेवर एका पाकिस्तानी घुसखोराला काल पहाटे अटक करण्यात आले.' या वाक्यरचनेत '.... घुसखोराला काल पहाटे अटक करण्यात आले.' यातील 'अटक करण्यात आले.' यात चूक आहे. निर्दोष वाक्यरचना अशी आहे - '...घुसखोराला काल पहाटे अटक करण्यात आली.' आली हे क्रियापद 'अटक' या स्त्रीलिंगी नामाप्रमाणे हवे. 'त्याला' हे या वाक्यात कर्म आहे. 'शिपायांनी' हा वाक्याचा कर्ता अध्याहृत आहे. हा शब्द 'नी' हा तृतीयेचा प्रत्यय लागून सिद्ध झाला आहे.

कोणाला? याचे उत्तर 'घुसखोराला' असे आहे. घुसखोर या शब्दाला द्वितीयेचा प्रत्यय लागून घुसखोराला हा शब्द सिद्ध झाला आहे. काय केलं? याचे उत्तर 'अटक केली.' हे आहे. 'अटक केले' किंवा 'अटक करण्यात आले.' या प्रकारची सदोष वाक्यरचना करू नये.

असेच एक सदोष वाक्य वाचले. ते असे - 'आपले अधिकांश सिनेमे समाजाच्या लघुत्तम साधारण विभाजकाला केंद्रबिंदू ठरवून बेतलेले असतात.'

या वाक्यातील लघुत्तम हा शब्द सदोष आहे. (या शब्दाची फोड अशी होईल- लघुत्+तम= लघुत्तम हे रूप चुकीचे आहे. बरोबर शब्द आहे - लघुतम - लघु+तम= लघुतम. गणितातील दोन संज्ञा अशा आहेत - महत्तम साधारण विभाजक आणि लघुतम साधारण विभाजक. महत्तम हे शब्दाचे लेखन बरोबर आहे. फोड करू या - महत् तम - महत्तम. या उच्चाराला अनुसरून लघुत्तम असा उच्चार आणि उच्चाराप्रमाणेच 'लघुत्तम' असे लेखन केलेले आढळते. या दोन्ही संज्ञा गणितातील आहेत. त्यांचे अर्थ असे - **महत्तम साधारण विभाजक** (संक्षिप्त रूप- म.सा.वि.) अर्थ- दिलेल्या सर्व संख्यांना नि:शेष भाग जाईल अशी मोठ्यात मोठी संख्या.

**लघुतम साधारण विभाजक** (संक्षिप्त रूप- ल.सा.वि.) अर्थ - ज्या संख्येला दिलेल्या सर्व संख्यांनी नि:शेष भाग जाईल अशी लहानात लहान संख्या. गणितातील या संज्ञाचा वापर मराठीतील विधानामध्ये, इतर विषयांवरील लेखनामध्ये केल्यास त्या संज्ञेमुळे वाक्याचा अर्थ समजणे मला तरी कठीण वाटते, अशा (अर्थाच्या दृष्टीने अतिशय अवघड वाटणाऱ्या) संज्ञा गणिताव्यतिरिक्त इतर विषयांसाठी योजणे टाळावे, असे वाटते.

**– यास्मिन शेख**

लोकसत्ता Mon, 19 December 2022
https://epaper.loksatta.com/c/71179660



**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# ज्ञान धावते पण शहाणपण रांगते

**आज स्नेहाला** राष्ट्रीय स्तरावरील पुरस्कार प्राप्त झाला. ती या पुरस्काराला काय उत्तर देणार याकडे अर्थातच सगळ्यांचे लक्ष लागलेले होते. डॉ. स्नेहा हे ज्ञानक्षेत्रातील एक ज्ञानी, अनुभवसंपन्न आणि शहाणे व्यक्तिमत्त्व होते याबद्दल कोणाचेच दुमत असण्याचे कारण नव्हते. स्नेहाने आपल्या भाषणाला सुरुवात केली. आपल्याला ज्ञान देणाऱ्या सर्वच गुरुजनांबद्दल आदर व्यक्त करून ती म्हणाली, "आज हा पुरस्कार स्वीकारताना मला माझ्या आजीचे आभार मानायचे आहेत. कारण तिने माझे व्यक्तिमत्त्व समृद्ध केले. ज्ञान संपादन करताना मला जी 'माहिती' मिळाली ती मी आस्थापूर्वक वापरली. जे 'ज्ञान' मिळाले ते योग्य प्रकारे वापरले त्यामुळेच मला आजचा पुरस्कार प्राप्त झाला. पण या साऱ्यासाठी जे शहाणपण मला लाभले, ते मात्र आजीकडून. माझ्या आजीने ऐकवलेल्या कहाण्यांतून, गोष्टींमधून, म्हणींतून, अनुभवाच्या बोलांमधून मी सुसंस्कृत झाले. 'प्रयत्ने वाळूचे कण रगडिता तेलही गळे', 'घरोघरी मातीच्या चुली', 'प्रयत्नांती परमेश्वर', 'पुराणातली वांगी पुराणात', 'तेल गेले तूप गेले हाती आले धुपाटणे', 'दोघांचे भांडण आणि तिसऱ्याचा लाभ' अशा अनेक म्हणी आणि गोष्टी ऐकवताना तिने मला शहाणपणाचा वसा दिला. 'ज्ञान धावते पण



शहाणपण रांगते', असे ती मला नेहमी सांगायची. तू ज्ञानी होशीलच पण शहाणीसुद्धा हो. जगण्याच्या अनुभवातून आपल्याला शहाणपण येत असते. ज्ञान तुम्हाला समृद्धी, संपन्नता मिळवून देईल, पण शहाणपण त्याचा उपयोग, विनियोग चांगल्याप्रकारे कसा करावा याचे भान देईल. आज मला मिळालेला हा पुरस्कार मी माझ्या जाणत्या आजीला समर्पित करीत आहे. तिने मला कोणत्याही पुस्तकात न लिहिलेले ज्ञान सहजगत्या दिले. मी सुशिक्षित होतेच पण तिच्यामुळे सुसंस्कृतही झाले." स्नेहाचे हे भाषण ऐकल्यावर सर्वांनी टाळ्यांचा कडकडाट केला.

स्नेहाचे भाषण ऐकून समारंभासाठी आलेली आजी भारावून गेली. व्यासपीठावरून खाली भेटीसाठी आलेल्या आपल्या ज्ञानी आणि शहाण्या नातीला आशीर्वाद देत ती म्हणाली, "आज तुझ्यासारख्या सुसंस्कृत, शहाण्या व्यक्तींची देशाला खूप गरज आहे."

**– डॉ. माधवी वैद्य**

madhavivaidya@ymail.com

लोकसत्ता Tue, 20 December 2022
https://epaper.loksatta.com/c/71187081



**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# निरोपाची भाषा...

**वेगवेगळ्या प्रसंगी** काम संपून निरोप घ्यायची वेळ कधीतरी येते. त्यासाठी भाषेत त्या त्या प्रसंगाला अनुसरून वेगवेगळे वाक्प्रचार रूढ आहेत. उदा. 'समारोप करणे' हा वाक्प्रचार पाहा. सार्वजनिक समारंभात कार्यक्रम संपताना अध्यक्ष समारोप करतात, अशी प्रथा आहे. (या वाक्प्रचारामागेही मुळात एक विधी जोडलेला होता.) व्रत आदी धार्मिक कार्य असेल, तर 'सांगता करणे' असा वाक्प्रचार वापरतात.

लग्नसमाप्तीच्या एका विधीशी निगडित 'सूप वाजणे' हा वाक्प्रचार इतर प्रसंगीदेखील लक्षणेने वापरला जातो. त्याचा लक्ष्यार्थ आहे, मोठे कार्य निर्विघ्नपणे संपणे. अनेक दिवस चालणाऱ्या व्याख्यानमाला, संमेलने इत्यादी कार्यक्रमांबाबत हा वाक्प्रचार अगदी शोभून दिसतो.

'रामराम घेणे/ ठोकणे', हा वाक्प्रचारही निरोपासाठी वापरला जातो. 'आम्ही जातो आपुल्या गावा, आमचा रामराम घ्यावा' असे संत तुकाराम यांनी अभंगात म्हणून ठेवले आहे.

वर्तमानपत्रात एखाद्या विषयावर वादविवाद चालू होतो. त्यावर पत्र-व्यवहाराद्वारे होणारी चर्चा फार काळ रेंगाळत राहिली की संपादक हस्तक्षेप करून म्हणतात : 'आता आम्ही या चर्चेला पूर्णविराम दिला आहे.' येथे वाक्य संपताना येणारे 'पूर्णविराम' हे व्याकरणातील विरामचिन्ह लक्षणेने वापरून वैशिष्ट्यपूर्ण वाक्प्रचार रूढ झालेला दिसतो.

'भरतवाक्य' हा शब्दप्रयोगही वाक्प्रचारासारखा वापरला जातो. पूर्वी नाटक संपण्याच्या वेळी 'भरतवाक्य' म्हटले जात असे. नाटकातील नायकाच्या तोंडून ते सर्वांच्या कानी पडत असे. त्यात सर्वांना सौख्य लाभावे, अशी इच्छा व्यक्त केलेली असे. हा एक चांगला रिवाज होता. आजही भाषाव्यवहारात याचा वापर कधीतरी होत असतो.

छत्रपती शिवाजी महाराज पत्र संपवताना 'मर्यादेयं विराजते', ही लेखन-समाप्तीची मुद्रा वापरत असत. ऐतिहासिक पत्रे वाचताना ही भाषिक लकब लक्षात राहते. त्यातील शब्दांचा अर्थ असा होतो की येथे थांबणे शोभून दिसते.

खरे तर, केवळ पत्रामध्ये नव्हे, तर एकूणच सर्व व्यवहारांत, कोठे आणि कधी थांबावे, हे आपले आपल्याला कळणे फार महत्त्वाचे असते. जगण्याचा कस कायम राखण्यासाठी ते भान आवश्यक असते.

– डॉ. नीलिमा गुंडी
nmgundi@gmail.com





# मराठी भाषा मुमूर्षू आहे का?

''**मराठी भाषा** मुमूर्षू आहे का?'' असा प्रश्न १९२६ मध्ये वि. का. राजवाडे यांनी विचारला होता. अर्थात या प्रश्नातून त्यांना मराठी भाषा मुमूर्षू म्हणजे मरणासन्न आहे, असंच अप्रत्यक्षपणे सुचवायचं होतं. त्यानंतर मराठीच्या तब्येतीत अनेक चढउतार झाले. आज सुमारे १०० वर्षांनंतर हा मराठीतला लेख आपण एका मराठी वृत्तपत्रात, छापील किंवा ऑनलाइन स्वरूपात वाचत आहोत, तरीही या प्रश्नाला ठामपणे 'नाही' असं उत्तर द्यायला आपण चाचरतो.

ऑक्सफर्ड इंग्लिश डिक्शनरीची अद्ययावत प्रत प्रसिद्ध झाली की, यावर्षी 'ओईडी'ने किती नवीन शब्द घेतले अशी चर्चा आपण कौतुकाने वाचतो. तुलना नको, पण सहजच विचार केला तर गेल्या २५ वर्षांतल्या मराठीतल्या एखाद्या अद्ययावत कोशाचं नाव, अधिकृतरीत्या घेतलेले नवीन शब्द सांगता येतील?

गुगल भाषांतर ही इतर भाषांमधलं ज्ञान आपल्या भाषेत आणण्यासाठी जादूची किल्ली आहे. पण ही एक उपयुक्त सुविधा आज आपण केवळ विनोदाचं साधन म्हणून वापरतो. भाषांतराचे विनोद किंवा वृत्तपत्रीय मजकुरातल्या चुका पाहून मनोरंजन करून घेण्यापेक्षा त्यात दुरुस्त्या व्हाव्या म्हणून एकतरी पाऊल का उचलत नाही?

मराठीसाठी मुद्रितशोधन, संदर्भ उपलब्धता, शब्दनिधी संकलन अशा अनेक कामांमध्ये आधुनिक तंत्रज्ञानाची मदत होऊ शकते. यासाठी भाषाअभ्यासकांनी अभिनिवेश सोडून अशा भविष्यवेधी, कृतियुक्त कामांवर लक्ष केंद्रित करण्याची नितांत गरज आहे. विकिपीडिया या ज्ञानकोशाच्या व्यासपीठावरच्या भाषानोंदी पाहिल्या तर इंग्रजी- ६६ लाख, चिनी- १३ लाख, जपानी- १३ लाख, फिनिश- पाच लाख, कोरियन- सहा लाख आणि मराठी- ८८ हजार (संदर्भ- देशोदेशीचे शालेय शिक्षण- पान क्र. २६६) अशी दारूण परिस्थिती दिसते. इंग्रजी किंवा इतर भाषांची रेघ मोठी दिसते म्हणून विलाप करण्यापेक्षा मराठीची रेघ मोठी व्हावी याकडे पाहायला हवं. जोपर्यंत महाराष्ट्रात आणि जगाच्या पाठीवर मराठी समाज असेल, तोपर्यंत तो जी भाषा बोलेल ती मराठीच असेल. मात्र तेव्हा राजवाडे यांनी विचारलेल्या प्रश्नाला 'नाही' असं उत्तर द्यायचं असेल तर ती तयारी आजपासूनच करायला हवी.

**– वैशाली पेंडसे-कार्लेकर**
vaishali.karlekar1@gmail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# निरोप घेण्यापूर्वी...

वाचकहो, जानेवारी २०२२ पासून डिसेंबर २०२२ पर्यंत दर सोमवारी 'लोकसत्ता'तील 'भाषासूत्र' या सदरातील 'मराठी वाक्यरचनेतील वारंवार होणाऱ्या चुका' या विषयावरील माझे लघुलेख आपण वाचले असतील. आपला निरोप घेण्यापूर्वी आज या सदरातील हा शेवटचा लेख (२६ डिसेंबर २०२२) लिहीत आहे. मराठी भाषकांना आणि मराठी लेखन करणाऱ्यांना काही सूचना या लेखात करणार आहे.

भाषावार प्रांतरचनेच्या तत्त्वाला अनुसरून १ मे १९६० रोजी मराठी भाषकांचे राज्य म्हणून महाराष्ट्र राज्याची स्थापना झाली. मराठी भाषा आणि साहित्य यांच्यात एकवाक्यता यावी या संदर्भात शासनाने तज्ज्ञांची एक समिती स्थापन केली. तिचे 'मराठी साहित्य महामंडळ' असे नामकरण करण्यात आले. मराठी लेखनात एकसूत्रीपणा यावा व शासकीय व्यवहारात मराठीचा निर्दोष वापर व्हावा म्हणून मराठीचे लेखनविषयक नियम निश्चित करण्याचे काम या मंडळाकडे सोपविले. १९६२ साली सादर केलेल्या १४ नियमांत १९७२ साली आणखी चार नियमांची भर घालण्यात आली. हे सर्व नियम शासनमान्य असून प्रमाणभाषेचे (मराठी) लेखन करणाऱ्यांनी (पाठ्यपुस्तके, विद्यापीठीय संस्था, वृत्तपत्रे, मासिके, शासकीय व्यवहार इ.) या नियमांनुसार लेखन करणे आवश्यक आहे.

या नियमांपैकी नियम १ ते ४ अनुस्वारासंबंधी आहेत, नियम ५ ते ८ ऱ्हस्वदीर्घासंबंधी आहेत, नियम ९ ते १८ किरकोळ किंवा इतर शब्दांविषयी आहेत. (काही शब्द कसे लिहावेत, कवितेत कवीला स्वातंत्र्य द्यावे इ.) त्यानंतर २००९ साली म्हणजे जवळपास ४०-४५ वर्षांनी या विषयाकडे पाहण्यात झालेले बदल आणि संगणकीय सुधारणा या गोष्टी लक्षात घेऊन महाराष्ट्र शासनाने ६ नोव्हेंबर २००९ रोजी तज्ज्ञांच्या साहाय्याने नवा अध्यादेश काढला. 'प्रमाणीकृत मराठी आज्ञावली' (सॉफ्टवेअर) तयार करणे अत्यंत आवश्यक असल्यामुळे या नव्या अध्यादेशात मराठी भाषेची लिपी, वर्णमाला, वर्णक्रम इत्यादींचे प्रमाणीकरण केले आहे. देवनागरी लिपीतील प्रमाणीकृत वर्णमाला, अक्षरमाला व अंकांचा शासनाने स्वीकार केला आहे. विशिष्ट अक्षरांच्या लेखनासंबंधी सूचना, स्वरचिन्हे, जोडाक्षरे, वर्णक्रम, विरामचिन्हे, अंकलेखन इत्यादींविषयी सविस्तर विवेचन केले आहे. या अध्यादेशाप्रमाणे सर्व मराठी भाषकांनी लेखन आणि संगणकीय टंकनही करणे अपरिहार्य आहे. आपला कितीही विरोध असला, तरी लेखनात मनमानी करता येणार नाही. या सर्व नियमांनुसार लेखन करणेच योग्य आहे, ही विनंती.

– यास्मिन शेख





# मौखिक परंपरेचे संचित...

**आजवर आपण** अनेक म्हणी बघितल्या. त्यामुळे या सांस्कृतिक संचिताची उजळणीही झाली. तरीही म्हणींसंदर्भात काही तात्त्विक गोष्टी समजून घेऊ या. संस्कृत 'भण' धातूपासून अपभ्रंश होऊन 'म्हण' हा शब्द तयार झाला आहे. जी उक्ती लोकांच्या तोंडी सतत येते आणि म्हणून दृढ होते ती 'म्हण'. संस्कृतमधील 'लोकोक्ती' म्हणजे 'म्हण'. म्हणींचा कर्ता कोण हे सांगता येत नाही.

म्हणीची व्याख्या साहित्यसम्राट न. चिं. केळकर यांनी अशी केली आहे- 'चिमुकले, चतुरपणाचे, चटकदार असे वचन म्हणजे म्हण'. कोशकार वि. वि. भिडे म्हणतात, 'ज्यात काही अनुभव, उपदेश, माहिती, सार्वकालिक सत्य किंवा ज्ञान गोवलेले आहे, ज्यात काही चटकदारपणा आहे आणि संभाषणात वारंवार योजतात असे वचन म्हणजे म्हण होय.' डॉ. दुर्गा भागवत यांनी 'जनतेने आत्मसात केलेली उक्ती म्हणजे म्हण' अशी म्हणीची व्याख्या केली आहे. तर, वा. म. जोशी म्हणतात, 'थोडक्यात व मधुर शब्दांत जिथे पुष्कळ बोधप्रद अर्थ गोवला जातो, त्या वाक्यांना म्हणी असे म्हणतात.'

या म्हणी काही बोधप्रद संदेश देताना दिसतात. तो संदेश देताना कहाणीकर्त्यांनी मानवी जीवनाचे, निसर्गाचे सूक्ष्म निरीक्षण केलेले दिसते. सर्व जीवनांगांचे ज्ञानाचे कण म्हणीत सामावलेले असतात. अनेक जीवनानुभवांचे मंथन करून आपल्यासमोर ठेवलेल्या म्हणी म्हणजे भाषेची लेणी आहेत. त्या कोणत्याही भाषेला सौंदर्य आणि संपन्नता बहाल करतात. ती भाषेची आभूषणे आहेत. कमीत कमी शब्दांत जास्तीत जास्त आशय मांडणाऱ्या म्हणी आकाराने लहान, प्रासयुक्त, गेयतेचा गुण अंगभूत असणाऱ्या ठसकेबाज असतात. म्हणी या कधी कधी व्यंगचित्रांसारख्या असतात.

'म्हण' एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे पुष्कळदा मौखिक परंपरेने जात असते. नवीन पिढीकडे म्हणी जर समर्थपणे नेल्या गेल्या तर हे भाषेचे सांस्कृतिक धन त्यांना निश्चितपणे आकर्षित करू शकेल.

जुन्या म्हणींबरोबरच नवीन म्हणी रचल्यादेखील जातील. उदा. करोना आणि ओमायक्रॉनच्या साथीत एका मैत्रिणीने एक नवीन म्हण सांगितली, ती अशी, 'आपली ती सर्दी आणि दुसऱ्याचा तो करोना!'

- डॉ. माधवी वैद्य
madhavivaidya@ymail.com





**भाषासूत्र** कांचन कराई द्वारा संकलित

# वाक्प्रचार पालखीत बसले !

**'भाषासूत्र' या** सदरातील वाक्प्रचारांसंदर्भातील हा माझा समारोपाचा लेख आहे. वाक्प्रचार हा विषय शालेय पातळीवर अभ्यासक्रमात असल्यामुळे वरवर पाहता सोपा वाटतो; म्हणून खरे तर त्याविषयी वर्षभर लिहिणे, हे एक आव्हान होते. त्यासाठी प्रत्येक लेखाकरिता वाक्प्रचार निवडताना मी वेगवेगळी सूत्रे योजली. त्यामुळे सदरातील छोट्याशा लेखांना घाट येत गेला. तसेच वाक्प्रचार उलगडून दाखवताना त्यातील शब्दांची व्युत्पत्ती देण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे वाचकांना भाषेची मुळे कशी दूरवर, इतर भाषांमध्येही पसरलेली असू शकतात, याचा अंदाज येत गेला. मुख्य म्हणजे भाषा ही जीवनाच्या अनेक क्षेत्रांना कशी कवेत घेते, याचाही वाचकांना प्रत्यय येत गेला. क्वचित वाक्प्रचारांबरोबरच भाषाव्यवहारात वापरले जाणारे विशिष्ट असे काही शब्दप्रयोगदेखील यात आवर्जून समाविष्ट केले.

वाक्प्रचारांच्या उपयोजनासाठी मराठीतील विविध साहित्यप्रकारांची उदाहरणे देण्याचा प्रयत्न केला; कारण या सदराचा अंतःस्थ हेतू वाचकांना नवे भाषाभान देणे, वाचनव्यवहाराला चालना देणे हाच होता. या लेखनाला मान्यवरांप्रमाणे सर्वसाधारण वाचकही प्रतिसाद देत राहिले. काहीजण आपल्या काही शंका विचारत होते, काहीजण आपल्याकडील माहिती मला कळवत होते. त्यामुळे विचारांची देवघेव होत राहिली, लिहिताना हुरूप येत गेला. चुकीचा उल्लेख निदर्शनास आणणारे जागरूक वाचकही भेटले, हे नमूद करायला हवे ! भाषा ही बाब आजही आपल्या समाजासाठी दृढ भावबंधन या रूपात मानली जाते, याची जाणीव अशा उत्स्फूर्त प्रतिसादातून होत गेली.



'पालखीत बसणे' हा एक जुना वाक्प्रचार आहे. पूर्वी मोठ्या योग्यतेच्या व्यक्तीला पालखीत बसण्याचा मान मिळत असे. त्यामुळे पालखीत बसणे, याचा अर्थ 'महत्त्व/ योग्यता वाढणे' असा आहे. एकंदरीत या सदरामुळे 'वाक्प्रचार पालखीत बसले', असे म्हणावेसे वाटते ! सर्वांविषयी कृतज्ञता व्यक्त करून मी शेवटी इतकेच म्हणेन की आज भाषेची पालखी वाहण्यासाठी आपणा सर्वांनाच भोई होण्याची नितांत गरज आहे !

**– डॉ. नीलिमा गुंडी**
nmgundi@gmail.com





भाषासूत्र कांचन कराई द्वारा संकलित

# मराठीवरील अन्य भाषांच्या परिणामांची मीमांसा

**परकीय शब्दांचा** मराठी भाषेत शिरकाव, त्या शब्दांना पर्यायी मराठी शब्द आणि मराठीपुढची सद्य आव्हाने याविषयी या सदरातून वर्षभर माहिती देण्यात आली. या मंथनात वाचकांनीही भाग घेतला आणि प्रतिक्रिया दिल्या. अनेक पर्यायी शब्द सुचविले. आता या सगळ्याचे फलित आणि निष्कर्ष काय?

भाषा ही नित्य परिवर्तनशील असते. तीत शब्दसंग्रहाच्या बाबतीत त्वरेने तर व्याकरणाच्या बाबतीत कालांतराने परिवर्तन जाणवते. ऐतिहासिक, भौगोलिक, राजकीय, सांस्कृतिक, साहित्यिक, वैज्ञानिक, व्यक्तिवैशिष्ट्यात्मक अशा सर्व प्रभावांचा भाषेवर परिणाम होतो. मराठीशी फारसी, पोर्तुगीज आणि इंग्रजीचा जो संबंध आला त्याला ऐतिहासिक पार्श्वभूमी आहे. मात्र, इंग्रजीच्या आजच्या प्रभावामागे जागतिकीकरण आणि तंत्रज्ञानाची क्रांती दिसून येते. कानडी, तेलुगु, गुजराती, हिंदी या भाषा महाराष्ट्राला जवळच्या आहेत. या शेजारपणामुळे या भाषांचा मराठीवर आणि मराठीचा या भाषांवर देवाण-घेवाणीच्या रूपात कमी-अधिक परिणाम झालेला असणे स्वाभाविक आहे. मनोरंजनाच्या माध्यमातून हिंदी मराठीवर थेट धडकत आहे. कानडीचा परिणाम तर फार सखोल आणि सुस्पष्ट आहे. अक्का, अम्मा, उसळ, कोशिंबीर, आप्पा, अण्णा यासारखे शब्दऋण, होत-होय, पुरे-पाहिजे यांसारखे क्रियापद वापरलेल्या व्याकरणिक रचना आपण कानडीकडून स्वीकारल्या आहेत. या सर्वच भाषांचे आपल्यात मिसळलेले शब्द आता बरेचसे आपले होऊन गेले आहेत. सहजस्फूर्त अभिव्यक्तीची जी लकब मराठीत आलेली आहे ती या मराठीत एकजीव होऊन गेलेल्या परकीय शब्दांच्या वापरामुळे आलेली आहे.

शेवटी एका गोष्टीकडे लक्ष वेधणे आवश्यक वाटते. परकीय भाषेतले शब्द जर आपले वेगळेपण राखून न ठेवता मराठीच्या वळणाप्रमाणे चालले तर ते नक्कीच तिला अधिक सुदृढ आणि प्रगल्भ करतील. त्यामुळे भाषा 'बिघडत' नाही तर 'घडत' जाईल. एकूणच या सदरलेखनातून काही महत्त्वाचे विषय सर्वांसमोर मांडता आले याचे समाधान आहे. लेखनाच्या निमित्ताने आमचाही भाषाविषयक अभ्यास अधिक सखोल झाला आणि त्यासंदर्भातील जाणीव विस्तारली. तुम्हा वाचकांसह या प्रवासातील सर्वांचे मनापासून आभार.

**-निधी पटवर्धन, वैशाली पेंडसे-कार्लेकर**
nidheepatwardhan@gmail.com
vaishali.karlekar1@gmail.com





# शब्दांची व्युत्पत्ती- एक जागतिक वारसा

**आज मराठीत** वापरात असलेले अनेक शब्द आपल्याकडे कसे आले याविषयी या सदरात गेले वर्षभर बरेच काही सोदाहरण लिहिले गेले. त्यातून काही सैद्धांतिक मांडणी करता येईल का, याचा या शेवटच्या लेखात विचार करू. एखादा शब्द कुठून आला याचा शोध इतिहास, तंत्रज्ञान, भूगोल, अर्थकारण अशा अनेक घटकांना स्पर्श करतो. इतिहासाशी असलेला संबंध आजवरच्या अनेक उदाहरणांतून अगदी स्पष्ट आहे. फारसी, पोर्तुगीज, इंग्रज राजवटी येऊन गेल्या आणि त्यातूनच त्यांच्या भाषांशी संपर्क आला. तंत्रज्ञानातूनही अनेक शब्द, विशेषतः आधुनिक राहणीशी संबंधित शब्द मराठीत आल्याचे आपण बघितले.

भूगोलाचाही भाषेवर परिणाम होतो. बंगालीतून मराठीत भाषांतर करणारे अशोक शहाणे म्हणतात, ''महाराष्ट्रात खडकाळ जमीन, पाण्याचे दुर्भिक्ष्य. दगडाचा टणकपणा, ओबडधोबडपणा मराठीत आहे. महाराष्ट्रात पाण्याची पंचाईत आहे आणि तिथे बंगालमध्ये पाण्याच्या निचऱ्याचा प्रश्न आहे. वंदे मातरम् बंगालबद्दल लिहिलेले आहे. सोलापूर किंवा नगरमधील लोक आपली मातृभूमी सुजलाम् सुफलाम् आहे, असे कसे कबूल करणार?''

शब्दांचा उगम अर्थकारणदेखील सूचित करतो. जिथे पावसावर अवलंबून असल्याने शेतीचे उत्पन्न खूप कमी आहे, अशा महाराष्ट्रात विलासी राहणीला फारसा वावच नव्हता! दिमाख, लवाजमा, चैन, ऐष, मिजास, आलिशान, लाजवाब, रुबाब, शानदार, षौक, मुजरा यांसारखे विलासी जीवनाशी जोडलेले शब्द फार्सीतूनच मराठीत आले यात नवल नाही!

आपण फक्त घेवाण केली आणि देवाण केली नाही का? 'गुरू', 'नमस्ते', 'बंदोबस्त', 'जंगल' असे काही भारतीय शब्द परकीयांनीही आत्मसात केले, पण त्यांचे प्रमाण तुलनेने खूप कमी आहे हे एक कटू सत्य आहे. कारण भाषिक संस्कृतीही पाण्याप्रमाणे वरच्या पातळीवरून खालच्या पातळीकडे, जेत्याकडून जिताकडे नैसर्गिकरीत्या वाहात असावी. आजकाल भाषिक अस्मितेला आक्रमक स्वरूप प्राप्त झाले आहे. इंग्रजी पाट्यांना काळे फासणे हा मराठीप्रेमाचा आविष्कार बनतो. हिंदीभाषक रिक्षाचालकांना मराठीत बोलायची सक्ती केली जाते. आपल्या भाषेतला एखादा शब्द मुळात आला कुठून याचा शोध या अस्मितेतील आक्रमकता कमी करतो. आपली भाषा हा एक सामूहिक आणि काही प्रमाणात वैश्विकदेखील वारसा आहे, हे दाखवून देतो. समाजाची जडणघडण ही फक्त त्या विशिष्ट समाजाचीच निर्मिती नसते, हे एक तत्त्वही या शोधातून अधोरेखित होते. *(समाप्त)*

**– भानू काळे**
bhanukale@gmail.com



